# आस्तिकवाद

लेखक
**पं.श्री. गंगाप्रसाद उपाध्याय**

अनुवादक
**पं.श्री. गणेशदेव आर्य**

**श्यामलाल स्मारक शिक्षण संस्था, उदगीर - ४१३ ५१७**
**१९९१**

❖ आस्तिकवाद :

❖ प्रकाशक : श्यामलाल स्मारक शिक्षण संस्था,
उदगीर - ४१३ ५१७
(सर्वाधिकार प्रकाशकाधीन)

❖ लेखक : पं. श्री. गंगाप्रसाद उपाध्याय

❖ अनुवादक : पं. श्री. गणेशदेव आर्य

❖ आवृत्ती : पहिली

❖ प्रती : २,०००

❖ प्रकाशन तिथी : मंगळवार, दि.१७ डिसेंबर १९९१
हुतात्मा भाई श्यामलाल, ५३ वा बलिदान स्मृती दिवस
मार्गशीर्ष शुक्ल ११, वि.सं. २०४८
दयानंदाब्द : १६७
सृष्टी-संवत् : १९७२९४९०९५

❖ मूल्य : ४० रुपये

❖ मुखपृष्ठ : श्री. शशिकांत डोंगरे,
आंतर भारती,
औराद शहाजनी- ४१३ ५२२

❖ फोटो टाईपसेटिंग : संजीव मुद्रणालय
४६९, सदाशिव पेठ,
पुणे - ४११ ०३०

❖ मुद्रक : श्री. द्वारकादास वें. करमचंदानी
सुदर्शन स्टेशनरी मार्ट,
१७१०, सदाशिव पेठ, पुणे - ३०.

# संपादकीय

अध्यात्म, धर्म आणि विज्ञान ही मानव जीवनाची 'त्रिवेणी' आहे. या तीन्हींच्या समन्वयाद्वारे मानवाचे आंतरिक व बाह्य जीवन सर्वार्थाने समृद्ध होते. विज्ञानाची एककल्ली प्रगती मानवास इंद्रियाचा दास बनवीत आहे. केवळ बाह्यवस्तूंच्या संपादनाद्वारेच मानवजीवनातील पूर्णत्व साधता येऊ शकते असेच जणू सर्वांना वाटत आहे. ही मानवजीवनाची सर्वात मोठी शोकांतिका आहे. मानव जो स्वतः चेतनरूप आहे, एका महाचैतन्याच्या (परमेश्वराच्या) सान्निध्याने जीवनाची पूर्णता साधावयाची असताना अचेतनाच्या (पंचमहाभूतांच्या) संपादनामध्येच तो जीवन-सार्थक्याचा शोध घेत आहे.

धर्माच्या नावावर अंधश्रद्धा आणि अंधविश्वासाचे साम्राज्यच पसरले आहे. धर्म हे आज कर्तव्य-पूर्तीशी निगडित नसून केवळ पूजापाठ, वार-व्रत-वैकल्यापर्यंत मर्यादित झाले आहे. प्रत्येक जण 'भाव तोचि देव' अशा युक्त्या-प्रयुक्त्यांचा वापर करून वाट्टेल तशी कल्पना देवाच्या बाबतीत करीत आहे. त्यामुळेच पूजापद्धतीत टोकाचा विरोध सर्वत्र दिसून येत आहे. विज्ञानाच्या एकांगी दृष्टीमुळे मानव अंधश्रद्धांच्या विळख्यात जखडला गेला आहे. यामुळेच धर्म हे कालबाह्य, टाकाऊ समजले जात आहे.

आम्ही धर्म हा कालबाह्य, टाकाऊ आहे असे म्हणून कितीही पुरोगामी (Prigoessie) बनण्याचा प्रयत्न केला तरी धर्माच्या, ईश्वराच्या प्रभावातून बाहेर पडणे कठीणच नव्हे तर शक्यही नाही. कारण ईश्वर आणि धर्म ही आत्म्याची भूक आहे. शरीरासाठी उत्तम आहार, औषधी सेवन; मनासाठी विविध प्रकारच्या कला; बुद्धीसाठी तर्क, विज्ञान आणि तत्त्वज्ञान, हे जसे आवश्यक आहे तसे आत्म्यासाठी ईश्वर आणि त्याचा अनुभव करवणाऱ्या धर्माची अनिवार्य आवश्यकता आहे.

मानवजातीचे सर्वात मोठे दुर्दैव हे की, आज तर्काधारित, मानवमात्रात ऐक्य स्थापित करणारे, प्राणिमात्राचे कल्याण करू शकणारे अध्यात्म अणि धर्म शालेय पाठ्यक्रमातून तर शिकविले जातच नाही आणि परंपरेने जे मिळते त्यात वास्तविकतेचा लवलेशही नाही. यामुळे मानव साधनसंपन्न होत असूनही 'माणुसकी'पासून तो सातत्याने दूरच चालला आहे.

ईश्वर व जीव या दोन तत्त्वांसंबंधी विवेचन करणाऱ्या शास्त्रास 'अध्यात्मशास्त्र' असे म्हणतात. या दोन तत्त्वांच्या साक्षात्कारासाठी (अनुभवासाठी) अवलंबिल्या जाणाऱ्या मार्गास 'धर्म' असे म्हणतात. एकदा परमेश्वराच्या अस्तित्वासंबंधी निश्चय झाला म्हणजे अंतःकरणात ईश्वरासंबंधी श्रद्धा उदयास येते. तीच 'आस्तिकता' आहे. या श्रद्धेतून ईश्वरानुभवासाठी केले जाणारे आचरण 'धर्म' म्हटले जाते.

बहिर्मुखतेतून, अंधश्रद्धेतून मुक्त करण्यासाठी तर्काच्या आधारावर ईश्वरासंबंधी विचार मांडले

जाणे आवश्यक आहे. आधुनिक काळात महर्षी दयानंदांनी या क्षेत्रात सर्वार्थाने यशस्वी प्रयत्न केला. त्यांच्या विचारांना विस्तृत रूप देऊन, तर्काच्या सूक्ष्मतेत प्रवेश करून श्री पं. गंगाप्रसाद उपाध्याय यांनी 'आस्तिकवाद' हे पुस्तक लिहिले. हे पुस्तक आजच्या युवती-युवकांसाठी, बुद्धिजीवी वर्गासाठी अतिशय उपयोगाचे समजून श्री. पं. गणेशदेवजी आर्य यांच्या तर्फे भाषांतरीत करवून घेतले आहे.

श्या.स्मा.शि.संस्था १९५२ पासून अव्याहतपणे शिक्षणाच्या प्रसाराचे कार्य करीत आहे. कर्मवीर भाई बन्सीलालजींची व हुतात्मा भाई श्यामलालजींची मानव कल्याणाची चौफेर दृष्टी आजही आम्हा सर्वांना प्रेरणा देत आहे. ते सच्चे 'आस्तिक' होते. या आस्तिकतेच्या प्रबळ सामर्थ्याधारेच सामाजिक व राष्ट्रीय पातळीवरील संघर्षात त्यांनी नेत्रदीपक यश मिळविले आणि ते सर्वार्थाने अजरामर झाले. हुतात्मा भाई श्यामलालजींच्या अर्धशताब्दी पुण्यतिथीच्या निमित्ताने काही नवीन योजनांची आखणी करण्यात आली. त्यात पं. लेखराम प्रकाशन समिती एक आहे. त्या समितीद्वारे वैदिक विचारांच्या प्रचारासाठी उपयुक्त ग्रंथाचे, मासिकांचे, पत्रकांचे प्रकाशन करण्याचे संस्थेने ठरविले आहे. त्याचा शुभारंभ आम्ही 'आस्तिकवाद' या पुस्तकाचे प्रकाशन करून करीत आहोत.

या कार्यात पं. गणेशदेवजी यांचा वाटा फार महत्त्वाचा आहे. त्यांचे प्रयत्न 'आस्तिकवाद' या पुस्तकाच्या प्रकाशनाने सार्थक होत आहेत.

श्री. कृष्णचंद्रजी आर्य, प्रधान महाराष्ट्र आर्यप्रतिनिधी सभा हे महर्षी दयानंदांचे अनन्य भक्त आहेत. त्यांच्या विचारांच्या प्रसारासाठी ते सदैव प्रयत्नशील राहिले आहेत. हे पुस्तक आकर्षक व उपयुक्त होण्यासाठी त्यांनी घेतलेले श्रम उल्लेखनीय आहेत.

प्रा. नाणेकर एकनाथराव (एम.फिल) हे तळमळीचे कार्यकर्ते आहेत. यांनीही वेळोवेळी लक्ष देऊन भरीव असे मोलाचे सहकार्य केले आहे.

श्री. व्यवस्थापक, संजीव मुद्रणालय, पुणे यांनी परिश्रमपूर्वक अक्षरजुळणीचे कार्य सुबकपणे पार पाडले आहे.

श्री. द्वारकादास वे. करमचंदानी यांनी मुद्रण कार्य अतिशय काळजीपूर्वक, सुबक व द्रुतगतीने पूर्ण करून पुस्तक आकर्षक बनवले आहे.

या सर्वांचे हार्दिक आभार व्यक्त करतो.

वाचकांना हे पुस्तक निश्चितच आवडेल असा विश्वास आम्ही बाळगतो.

**स्थळ** : उद्‌गीर
**तिथी** : दयानंद निर्वाण दिन १९९१
आश्विन कृष्ण १०, वि. सं. २०४८
६ नोव्हेंबर १९९१, बुधवार

सदाविजय आर्य
सचिव
श्या.स्मा.शि. संस्था, उदगीर

# अनुवादकाचे दोन शब्द

धार्मिक व वैज्ञानिकामधील विरोध गेल्या दोन शतकापासून वरचेवर वाढत आहे. याचे कारण, धर्म हा विज्ञानविरोधी आहे, असे वैज्ञानिक (सुशिक्षित) व विज्ञान हे धर्मविरोधी आहे, असे धार्मिक समजत आहेत. या विरोधामुळे धर्म व विज्ञान यांच्या लाभापासून मानवजात वंचित राहिली आहे. एवढेच नसून यांच्या विरोधामुळे मानवजातीची अपरिमित हानीही झाली आहे. अज्ञान मानवांचा सर्वात मोठा शत्रू आहे. यामुळे इतरांचे तर दूरच राहो. स्वतःच्या सुखासाठी निरंतर धडपड करणाऱ्या व्यक्तीसही न कळत दुःख भोगावे लागते. धर्म आणि विज्ञानाचा जो विरोध अज्ञानातून जन्मला आहे तो संपुष्टात यावा म्हणून धर्म आणि विज्ञान यांचा परस्पर संबंध कोणत्या प्रकारचा आहे हे समजणे अत्यावश्यक आहे.

याच उद्देशाने मी 'आस्तिकवाद' (हे पुस्तक जे मूळ हिंदीत पं. गंगाप्रसादजी उपाध्याय M.A. यांनी लिहिले आहे) या पुस्तकाचा मराठी अनुवाद केला आहे.

आस्तिकता मानवजीवनाच्या सर्वांगीण उन्नतीसाठी अतिशय आवश्यक आहे. जीवनाची समग्रता, उदात्तता, परिपूर्णता आस्तिकतेद्वारेच साधली जाऊ शकते. दुर्दैवाने बुद्धिवादावर आधारलेली आस्तिकता जगात दिसून येत नाही. हिंदू, मुस्लिम, ख्रिश्चन वगैरे पंथांच्या आस्तिकतेपेक्षा नास्तिकता हजारपटीने श्रेष्ठ आहे. केवळ जन्माने, परंपरेने कुणीही आस्तिक होऊ शकत नाही. त्यासाठी वैचारिक व साधनेची पृष्ठभूमी आवश्यक आहे. म्हणून जगातील आस्तिकांनी 'ग्रंथप्रामाण्यवादाच्या' विळख्यातून मुक्त होऊन, सर्व प्रकारचा पूर्वाग्रह, दुराग्रह अहंकार सोडून, या पुस्तकात मांडलेल्या तर्काधारित आस्तिकतेचा अवलंब (किमान वैचारिक पातळीवर तरी) करणे, अनेक प्रकारच्या मतभेदांना, वैर-विरोध कलहांना मूठमाती देण्यासाठी आवश्यक आहे. निश्चितच, जसे मानवांचे विज्ञान एक आहे, एक राहणार आहे तसे 'आस्तिकता' ही मानवांसाठी एकच आहे आणि एकच राहणार आहे. या एकतेद्वारे मानवजातीचे ऐक्य साधले जाऊ शकते. मनुष्याची इतर मानवांशी व प्राण्यांशी जवळीक निर्माण करणारी बाब जर कोणती असेल तर ती 'आस्तिकता' आहे. 'परीस' असतो असे आम्ही ऐकतो: पण 'आस्तिकता' ही ऋषी-महर्षींनी अनुभवलेला अनुभवसिद्ध 'परीस' आहे. ज्याच्या स्पर्शाने मानवजीवनाचे सोने होते. आस्तिकताच मानवजीवनाच्या पूर्णत्वाचे साधन आणि साध्य आहे. अशा या आस्तिकतेची हेतुबद्धता, वैज्ञानिकता, व्यावहारिकता या सर्वांना एका सूत्रात गुंफणारे पुस्तक म्हणजे आस्तिकवाद आहे.

या पुस्तकात आस्तिकतेच्या सिद्धीसाठी प्रामुख्याने (Logic) तर्काचा वापर केला आहे. बरेच जण देव हा प्रत्यक्षाचा तर नाहीच, तर्काचाही विषय नाही, तो केवळ भावनेचा आहे. 'भाव तोचि देव' असे म्हणत असतात. पण या पुस्तकाच्या वाचन, मनन, चिंतनवरुन वाचकांना सहजच हे

कळून येईल की, एवढ्या सुदृढ तर्काद्वारे आस्तिकता सिद्ध केली जावू शकते की त्या तर्कास दुसरी तोड नाही.

या पुस्तकाचे हेही एक वैशिष्ट्य आहे की, आस्तिकतेवर आक्षेप करणाऱ्या, नावाजलेल्या प्लिण्ट, काण्ट, मिल या पाश्चात्य तत्ववेत्यांच्या आक्षेपांचेही उत्तर देण्यात आले आहे.

महर्षी दयानंदांच्या वैदिक, सत्य विचारांच्या प्रसारासाठी स्थापिलेल्या 'आर्यसमाज' संस्थेने भरीव असे कार्य केले आहे. कर्मवीर भाई बंसीलालजी व हुतात्मा भाई श्यामलालजी या दोघांनी प्रामुख्याने निजाम शासनाच्या अन्यायाच्या विरोधात सर्व स्तरावर विद्रोह केला. जनतेत ज्ञानदृष्टी, कर्तव्यतत्परता, स्वाभिमानाचे बीज रुजवले. त्यांच्या स्मृतीत उदगीर येथे शिक्षण संस्था १९५२ मध्ये अस्तित्वात आली. श्यामलाल स्मारक शिक्षण संस्थेत कार्य करीत असताना या संस्थेचे सचिव प्राचार्य श्री सदाविजयजी आर्य यांनी वेळोवेळी उत्साहित व प्रेरित केले आहे. या अनुवादाच्या प्रकाशनाची व्यवस्था संस्थेकडून करण्यात आली. त्याबद्दल मी त्यांचा, पदाधिकाऱ्यांचा व कार्यकारिणी सदस्यांचा नितांत आभारी आहे. अशा प्रकारच्या वैदिक तत्त्वज्ञानासंबंधीच्या ग्रंथांची सुशिक्षितांसाठी गरज आहे. वेळोवेळी अशा ग्रंथांचे प्रकाशन संस्थेकडून व्हावे. ही अपेक्षा आहे.

माझे वडील श्री लक्ष्मणराव आर्य हे महर्षी दयानंदांचे एकनिष्ठ अनुयायी आहेत. वैदिक तत्त्वज्ञानाचे 'बाळकडू' बालपणीच त्यांनी मला पाजवले. गुरूवर्य पूज्यपाद पं.गोपदेवजी दर्शनाचार्य यांनी प्रेमळपणे भारतीय षट्शास्त्र, संस्कृत व इतर वैदिक ग्रंथाची जाणीव करून दिली. या दोघांचे माझ्यावर अनंत उपकार आहेत. समाजप्रबोधनाची पात्रता माझ्या अंगी या दोघांनी बाणवली. त्याबद्दल मी यांचा सदैव कृतज्ञ आहे. माझ्या जीवनाच्या जडण-घडणीत आई सौ. ईराबाई, धर्मपत्नी सौ. उषादेवी आर्य व स्व. सोनाजीराव सूर्यान् यांचे सर्व कुटुंबीय, श्री.मारूतीराव बासरे, श्री वेंकटरेड्डी पुल्लागोर या सर्वांचा सिंहाचा वाटा आहे. यांच्या उदारतेमुळे समाजकार्य करण्यासाठी मोलाचे सहकार्य सदैव मिळत राहिले आहे. मिळत राहील अशी अपेक्षा आहे.

वाचकांसाठी हे पुस्तक जीवनामध्ये सदैव प्रकाशस्तंभासारखे कार्य करील असा विश्वास बाळगतो.

**स्थळ** : कर्मवीर भाई बंसीलालजी आर्य स्मारक, वसतिगृह,
श्यामलाल स्मारक शिक्षण संस्था, उदगीर
उदगीर - ४१३ ५१७ (महाराष्ट्र)

**तिथी** : ११७ वा, आर्य समाज स्थापना दिवस,
चैत्र शुद्ध १, संवत २०४८, गुढीपाडवा
१७ मार्च १९९१, रविवार

आपला
**गणेशदेव आर्य**

# दोन शब्द

सुशिक्षितांनी ईश्वर व धर्म यांचा बहिष्कार करणे हे जणू फॅशनच बनवले आहे. ईश्वराच्या स्वीकृतीमुळे मनुष्य नको त्या बंधनात गुरफटतो. धर्म वैर-विरोधाचे मूळ कारण आहे. धर्माचा स्वीकार करणे जणू कलहाला आमंत्रणच देणे होय, अशी सुशिक्षितांची समजूत झाली आहे. एकोणिसाव्या शतकात युरोपमध्ये बहुतेक अशाच प्रकारच्या व्यक्तींचे शिक्षित समाजावर आधिपत्य होते. त्या वेळी 'नीत्से'नी एकीकडे घोषणा केली, की या वैज्ञानिक युगात ईश्वराचा मृत्यू झाला आहे; तर दुसरीकडे 'मेकाइल वेकुनिन' ने दावा केला की "IF GOD REALLY EXISTED, IT WOULD BE NECESSARY TO ABOLISH HIM." ईश्वर जर खरोखरच असेल तर त्याचा नाश करणे आवश्यक आहे. बोल्शेविक विसाव्या शतकातसुद्धा घोषणा करीत आहेत, की सर्वसाधारण श्रीमंतापासून राजा आणि ईश्वरापर्यंतचे आधिपत्य नष्ट करणे हेच त्यांच्या साम्यवादाचे उद्दिष्ट आहे. अशा प्रकारचे भ्रामक विचार जनसमूहामध्ये का पसरले? याचे कारण मध्ययुगात युरोपमध्ये धर्माच्या नावावर तत्त्ववेत्यांचा व वैज्ञानिकांचा जो छळ झाला, त्यांच्यावर जे अमानुष, अनन्वित अत्याचार झाले, त्याच्या प्रतिक्रियेपोटी या विरोधाने जन्म घेतला. क्रिये-प्रतिक्रियेमध्ये थोडेसे अंतर असले तरी धार्मिक व वैज्ञानिकांच्या प्रतिक्रियेच्या गुणवत्तेत फारसे अंतर नाही. मध्ययुगात युरोपमध्ये काही अज्ञानी व्यक्तींनी धर्माच्या नावावर जे केले, तेच कार्य आज वैज्ञानिक म्हणवून घेणारे विज्ञानाच्या नावावर करीत आहेत, एवढाच फरक दोघांमध्ये आहे.

**विज्ञान, तत्त्वज्ञान आणि धर्म**

वैदिक आस्तिकवादाचे विवेचन करणाऱ्या उपनिषदांनी अतिशय उत्कृष्टतेने विज्ञान (Science), तत्त्वज्ञान (Philosophy) व धर्म (Religion) यांचे मूळ कारण व त्यांच्या मर्यादा दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. याज्ञवल्क्य आपली विदुषी पत्नी मैत्रेयीस उपदेश देताना म्हणतात, "आत्मा वा अरे द्रष्टव्यः श्रोतव्यो मन्तव्यो, निदिध्यासितव्यो; मैत्रेय्यात्मनो वा अरे दर्शनेन श्रवणेन मत्या विज्ञानेनेदं सर्वं विदितम्" (बृह. २.४.५). "हे मैत्रेयि! निश्चयाने आत्मा हाच द्रष्टव्य श्रोतव्य, मन्तव्य आणि निदिध्यासितव्य आहे. हे मैत्रेयि! निश्चितपणे आत्म्याच्या दर्शन व श्रवणाद्वारे, मननाद्वारे आणि विज्ञानाद्वारे हे सर्व जाणले जाते."

याज्ञवल्क्यांनी आत्म्यापर्यंत संपूर्ण ज्ञानासाठी तीन साधने सांगितली आहेत.

१. दर्शन आणि श्रवण : हेच विज्ञान (Science) आहे.

२. मनन आणि दर्शन : तत्त्वज्ञान (Philosophy) आहे.

३. निदिध्यासन (अनुभवः Realisation) धर्म (Religion) आहे.

विज्ञान, तत्त्वज्ञान आणि धर्माचा किती सुंदर समन्वय (गुंफण) करण्यात आला आहे! मनुष्य

दर्शन व श्रवणानंतरच मनन, मननानंतरच निदिध्यासन करण्यास पात्र ठरतो. म्हणूनच म्हटले जाते की, अनुभूत विज्ञान (Realised Science) फिलॉसॉफी आहे व अनुभूत फिलॉसॉफी (तत्त्वज्ञान) धर्म आहे. या तिन्हींची आपापल्या ठिकाणी किती आवश्यकता आहे व या तिन्हींमध्ये कितपत सहयोग आहे आणि कशा प्रकारे ही तिन्ही साधने जीवनाच्या उच्च उद्देशाच्या प्राप्तीची साधने आहेत. या सर्व बाबी याज्ञवल्क्याच्या एका लहान, पण सारगर्भित वाक्यातून प्रगट होतात.

भूर्भुवः स्वः : - भूः, भुवः, स्वः या तीन महाव्याहृतीद्वारे ही वरील समन्वित ज्ञानाची सुंदर अशी मांडणी करण्यात आली आहे.

१. भूः = सत् = प्रकृती = Material Manifestation

२. भुवः = चित् = आत्मा = Spiritual

३. स्वः = आनन्द = परमात्मा = Harmonious

'भूर्भुवः स्वः' म्हणा किंवा 'सच्चिदानंद' म्हणा हे ईश्वराचे लक्षण आहे. प्राकृतिक जग आणि आत्मिक जग या दोन्हींत सुंदर समन्वय घडवून आणणे हेच उद्दिष्ट या महाव्याहृतींत व्यक्त झाले आहे. यामध्ये आत्मिक जग हे धर्माचे बोधक असून प्राकृतिक जग विज्ञानाचे बोधक आहे.

१९व्या शतकातील युरोपने हा विचार स्वीकारला नव्हता; पण विसाव्या शतकातील विज्ञानास याचा स्वीकार करणे भाग पडत आहे. डॉक्टर फ्लेमिंग यांनी इ.स. १९१४ मध्ये भरलेल्या 'सायन्स वीक' मध्ये 'विज्ञान व धर्माचे ऐक्य या शब्दांत स्वीकारले आहे.:

"They are not opposed, they are not neutrals, they are allies."

(Science & Religian by Seven men of Science)

म्हणजे विज्ञान आणि धर्म एकमेकांचे विरोधी, एकमेकांची उपेक्षा करणारे नसून एकमेकांचे सहायक आहेत. कसे सहायक आहेत? डॉ.फ्लेमिंगनी ही व्याख्यासुद्धा केली आहे. त्यांचे म्हणणे आहे की, आम्ही जेव्हा एखाद्या वस्तूस जाणू इच्छितो तेव्हा आम्हांस 'कसे व का? (How and why)' या दोन प्रश्नांची उत्तरे आवश्यक असतात. उदाहरणादाखल : जगाकडे पाहा. जग कसे बनले, याचे उत्तर विज्ञान देईल; पण जग का बनले, याचे उत्तर विज्ञान देऊ शकत नाही. याचे उत्तर धर्म देईल. ईश्वराने जग कोणत्या उद्देशाच्या पूर्तीसाठी बनविले आहे, हे धर्म सांगू शकेल. या दोन प्रश्नांच्या उत्तरांशिवाय आम्ही एखाद्या वस्तूचे व कार्याचे ज्ञान प्राप्त करू शकत नाही. या दोन प्रश्नांपैकी एकाचे उत्तर विज्ञान व दुसऱ्याचे धर्म देतो, तेव्हा या दोन्हींना एकमेकांचे विरोधी कसे म्हणू शकतो? त्यांना परस्परसहायक, पूरक मानणे अनिवार्य आहे. जी चूक १९व्या व २०व्या शतकातील सुशिक्षित करीत आहेत, त्याचे कारण धर्माच्या मूळ तत्त्वाविषयी ज्ञान नसणे हेच आहे, असे आम्हांस आढळून आले.

आणखी एक बाब या प्रकरणात विचार करण्याजोगी आहे - ती म्हणजे, विज्ञानाचे शोध आहेत तरी काय?

काही तथाकथित तत्त्ववेत्त्यांचा बेकनने उल्लेख केला आहे. या श्रेणीचे नावापुरते वैज्ञानिक असलेल्या काही व्यक्ती वैज्ञानिक संशोधनाचे महत्त्व पटवून देत असताना मर्यादेचे उल्लंघन करतात व आस्तिकतेची अवहेलना (हिटाळणी) करतात. अशा विद्वानांनी हे समजून घ्यावे, की विज्ञानाची सर्व संशोधने मानवाच्या अल्पज्ञानाची, अज्ञानाची जाणीव करून देतात. सर्व संशोधने वैज्ञानिकांचे आजपावेतो असलेले अज्ञानच दर्शवीत नाहीत काय? न्यूटनने गुरुत्वाकर्षण सिद्धान्ताचा शोध लावला, हे खरे असले तरी गुरुत्वाकर्षणाचा गुण पृथ्वीमध्ये नेहमीपासूनच आहे. न्यूटनने त्याची उत्पत्ती केलेली नाही. न्यूटनपूर्वी या गुणाची ओळख वैज्ञानिकांना नव्हती, ती न्यूटनने करून दिली. केवळ एका नैसर्गिक नियमाच्या जाणिवेचे नाव संशोधन आहे. वृक्षाच्या मुळास पाणी दिले तर ते संपूर्ण वृक्षामध्ये टोकापर्यंत पोहोचते, हा निसर्गाचा नियम आहे. पण सर जगदीशचन्द्र बोस यांनी यासंबंधीच्या कारणाचे ज्ञान प्राप्त केले. हासुद्धा विज्ञानाचा एक आविष्कार झाला. अशा प्रकारे वाटेल तेवढ्या शोधांवर विचार करा. सर्वांच्या तळाशी विज्ञानाचे भूतकाळातील अज्ञानच सापडेल. ईश्वराने बनविलेल्या सृष्टीतील असंख्य नियमांपैकी काहींचे ज्ञान मिळविणे हीच विज्ञानाची पराकाष्ठा असेल, तर या आविष्कारावर एवढा अभिमान करणे उचित आहे काय, की आवेशामध्ये जगाच्या निर्मात्यासच विसरून बसावे? या गंभीर बाबीवर शांत चित्ताने प्रत्येक विद्वानाने विचार करावयास पाहिजे. अशा प्रकारे विचार केला तर प्रत्येकास आस्तिकतेच्या सिद्धांतासमोर झुकावे लागेल. हां, हे विचारणे योग्य आहे की आम्ही आस्तिक का व्हावे?

**मनुष्याने आस्तिक का व्हावे?**

या प्रश्नाच्या उत्तरादाखल असे म्हणू शकतो, की मनुष्यामध्ये सद्गुणांच्या वाढीसाठी यापेक्षा श्रेष्ठ असा दुसरा कोणताच मार्ग नाही. उद्दिष्टाच्या पूर्तीसाठी आदर्शाची आवश्यकता असते, हा एक सार्वत्रिक नियम आहे. परंतु अतिशय गुणवान व्यक्तीस आदर्श म्हणून स्वीकारले तरी त्या व्यक्तींमध्ये सद्गुणांबरोबर काही दोष किंवा अपूर्णताही आढळून येईल. पण ईश्वराचा आदर्श हा एक असा आदर्श आहे, की जेथे दोषाची व अपूर्णतेची मुळीच शक्यता नाही. उत्तम व्यक्ती काही प्रमाणात आदर्श बनू शकतात; पण पूर्ण आदर्श ईश्वराशिवाय दुसरा होऊ शकत नाही. मनुष्याचे अंतिम ध्येय पूर्ण स्वातंत्र्य म्हणजे मोक्ष मिळविणे हेच आहे. मनुष्याच्या या उद्देशाच्या पूर्तीसाठी आवश्यक आदर्श ईश्वरच असला पाहिजे. या आदर्शामुळे तो जेवढे गुण ग्रहण करील, त्याचे ध्येय तेवढे जवळ येत जाईल. हा प्रयत्न सातत्याने चालू राहिल्यास शेवटी अशी स्थिती येईल, की मनुष्य शक्य असलेले पूर्णत्व मिळवून सत् चित् न राहता सच्चिदानंद होईल. तो सृष्टिकर्ता, कर्मफलदाता, अनादि सच्चिदानंदसुद्धा होऊ शकत नाही; पण सादि सच्चिदानंद अवश्य बनू शकेल. याच सादि सच्चिदानंद होण्याचे नाव मोक्ष आहे आणि हेच मनुष्याचे ध्येय आहे. हाच अंतिम उद्देश आहे.

आनंदाची बाब आहे, की ज्या पुस्तकाच्या संबंधी हे दोन शब्द लिहिले जात आहेत, त्या

पुस्तकामध्ये वरील उद्देशाच्या पूर्ततेसाठी प्रत्येक बाबीवर योग्यतेने व विद्वत्तेने तात्त्विकदृष्ट्या प्रकाश पाडण्यात आला आहे. मी त्या सर्वांचे काय पण काहींचे सुद्धा विवेचन केले नाही. पण पुस्तक संपूर्णतः वाचल्यानंतर हे पुस्तक अत्यंत उपयोगी व आस्तिकतेच्या जिज्ञासूंसाठी अतिशय मोलाचे मार्गदर्शक आहे, अशी माझी खात्री झाली. जगाची रचना, जगाचे कर्तृत्व, ईश्वराचे गुण, विज्ञान व आस्तिकवाद, पाप-पुण्य, कर्मफळ इत्यादीविषयी जे काही विवेचन करण्यात आले आहे, ते सर्व वाचण्याजोगे व मनन करण्याजोगे आहे.

शेवटी, लेखक श्री. पं. गंगाप्रसाद उपाध्याय, एम.ए. यांनी हे पुस्तक लिहून जे यश मिळविले त्याबद्दल त्यांचे हार्दिक अभिनंदन करतो आणि अधिक संख्येने स्त्री-पुरुष यापासून आस्तिकतेसंबंधी वैचारिक दृष्टी मिळवतील, अशी आशा बाळगतो.

**— नारायण स्वामी**

# भूमिका

सर्व धर्मांचे (पंथांचे) केंद्र ईश्वर आहे, पण ईश्वराविषयी अनेकांची भिन्न-भिन्न मते आहेत. याच मतभेदांमुळे मनुष्याच्या वैयक्तिक व सामूहिक जीवनामध्ये वेगळेपणा आहे. हा वेगळेपणा वैमनस्य, कलह, शत्रुता, संघर्ष व युद्ध या स्वरूपात अनेक प्रकारे प्रगट होत असतो. वास्तविक पाहता जगात आस्तिकतेच्या सत्य स्वरूपाच्या जाणिवेद्वारेच शांती, समता, बंधुता या मूल्यांना प्रस्थापित केले जाऊ शकते, असे माझे मत आहे. हे यथार्थच परमार्थाची - अंतिम उद्दिष्टाची प्राप्ती करवून देते.

हे पुस्तक अनेक वर्षांच्या अध्ययन, मननानंतर लिहिले गेले आहे. वेद, शास्त्र, उपनिषद, गीता वगैरे धार्मिक साहित्याचे अध्ययन व मनन या दोहोंचा परिणाम आहे. माझ्या सामर्थ्यानुसार पाश्चात्य् व पौर्वात्य विद्वानांच्या आक्षेपांची मीमांसा करून उत्तरे देण्याचा मी प्रयत्न केला आहे. फ्लिण्टचे 'थीज्म' (Theism) वालेसचे 'वर्ल्ड ऑफ लाइफ' (World of Life) व अनेक ग्रंथांची पुष्कळ सहायता घेतली गेली आहे. अद्वैतवादासंबंधी श्री शंकराचार्यांच्या भाष्यातील उद्धरण देण्यात आले आहे. या विषयात आचार्य शंकरांपेक्षा अधिक प्रामाणिक इतर कुणास समजले जात नाही.

ईश्वराच्या अस्तित्वासंबंधी संभ्रम निर्माण करून आस्तिकतेपासून दूर सारणाऱ्या नवीन प्रवाहात नवयुवक वाहून जाऊ नयेत, या उद्देशाने मी येथे प्रयत्न केला आहे. या ग्रंथाद्वारे प्रेरणा मिळवून सर्व जण ईश्वराच्या सर्वंकष कृपेवर विश्वास ठेवून आपल्या जीवनाची, सच्चारित्र्याची उभारणी व शाश्वत सुखाची प्राप्ती केली, तर मला आनंदच होईल.

दया निवास, प्रयाग
कृष्ण जन्माष्टमी १९८३
**३० ऑगस्ट १९२७**

**गंगाप्रसाद उपाध्याय**

# अनुक्रमणिका

# आस्तिकवाद

## अध्याय : पहिला

### विषयाची व्यापकता

धर्म एव हतो हन्ति धर्मो रक्षति रक्षतः ।
तस्माद् धर्मो न हन्तव्यो मा नो धर्मो हतोऽवधीत् ॥

प्राचीन काळातील एके काळचा हा श्लोक त्या काळातील मानवांच्या भावनांचे उत्तम प्रदर्शन करतो. ''रक्षिला गेलेला धर्म माणसांचे रक्षण करतो, नाश केला गेलेला धर्म माणसांचा नाश करतो, म्हणून धर्माचा नाश करू नये,'' असाच आशय या श्लोकाचा आहे. प्राचीन काळातील मानवांचे असे मत होते की कल्याणाची इच्छा करणाऱ्यांनी धर्माचे रक्षण करावे. ही बाब स्वतःसिद्ध आहे, असे ते समजत. म्हणूनच भारतातीलच नव्हे, संपूर्ण विश्वातील प्राचीन ग्रंथांमध्ये 'धर्म काय आहे'? हा प्रश्न अनेक वेळा उचलला गेला आहे; पण 'धर्माची आवश्यकता काय आहे?' असा प्रश्न कुणीही विचारलाही नाही, मांडलाही नाही. स्मृती, तत्त्वशास्त्र, उपनिषद व इतर ग्रंथाचे परीक्षण करा. तेथे एवढीच चर्चा केली आहे की 'धर्म काय आहे?' किंवा 'खरा धर्म कोणता आहे?' पण तेथे 'धर्माचे आचरण का करावे?', 'धर्मात्मा का व्हावे?' हा प्रश्नच उद्भवला नाही.

त्या काळातील मानवांना हा प्रश्न का सुचला नाही? ते दूरदर्शी नव्हते काय? त्यांची बुद्धी कुंठित झाली होती काय? एका काळातील मानव दुसऱ्या काळातील मानवापेक्षा अधिक बुद्धिमान असू शकतात. आजच्या मानवांना न उद्भवणारे प्रश्न व त्यांची उत्तरे कदाचित उद्याच्या मानवास विनासायास मिळू शकतील. पण प्रश्न हा आहे की त्या काळातील मानवांच्या तीव्र बुद्धीचा परिचय करून देणारे अनेक प्रश्न प्राचीन ग्रंथांत सापडतात. त्यांची भौतिक व पारलौकिक विचारांची सूक्ष्मता, उदात्तता, असाधारणता व व्यापकता त्या प्रश्नांद्वारे प्रगट होते. अतिशय सूक्ष्मतेने विचार करणाऱ्या व आकाशाला गवसणी घालणाऱ्या बुद्धिमानांनी या लहान प्रश्नाचे उत्तर का दिले नाही? याचे कारण काय आहे? उत्तरादाखल असे म्हणू की, 'धर्माची काय आवश्यकता आहे?' हा एक मूलभूत प्रश्न आहे. 'धर्म काय आहे?' किंवा 'धर्म कशास म्हणावे?' हा एक गौण - दुय्यम प्रश्न आहे. मूळ प्रश्न दुय्यम प्रश्नांपेक्षा अधिक गुंतागुंतीचे असतात. बुद्धिमत्ता बाळगूनही त्या काळातील मानव मूळ प्रश्नापर्यंत पोहोचू शकले नाहीत, याचे हेच कारण असावे. पण 'धर्माच्या जाळ्यामध्ये मनुष्य कसा अडकला?' किंवा 'धर्म मानवाच्या गळी कसा पडला?' हा प्रश्न पुन्हा समोर उभा ठाकतो. विश्वातील सर्व सभ्य-असभ्य जमाती (समाज) या प्रश्नावर विचार करीत असलेल्या

दिसतात. मानवजातीच्या जीवनाचा अधिक भाग 'धर्म म्हणजे काय?' या विचारातच खर्च होत आहे. इतिहासाच्या विशेष घडामोडी, साहित्यातील मुख्य ग्रंथ, युद्धसभा, सामाजिक विप्लव, संधी-विग्रह या सर्व बाबी काही अंशाने का होईना धर्माशी संबंधित आहेत. त्या काळातील मानव धर्मरूपी वृक्षाची मुळे जाणू शकले नसावेत हे स्वीकारता येईल. पण त्यांना या वृक्षाचीं ओळख कशी झाली? त्यांचे वैयक्तिक व सामाजिक जीवन धर्मरूपी वृक्षाच्या प्रभावाने कसे आच्छादिले गेले? ज्या धर्मरूपी वृक्षावर मानव एवढा मोहित झाला त्याचे खरोखर अस्तित्व होते का? जर असेल तर त्याचे मूळही अवश्य असावयास पाहिजे. अशा स्थितीमध्ये 'धर्माची काय आवश्यकता आहे?' असा प्रश्न मांडणे 'मनुष्याची काय आवश्यकता आहे?' असा प्रश्न मांडण्याइतकेच विसंगत आहे.

आज विज्ञानाने अफाट प्रगती केली आहे. त्याच्या नवनवीन शाखा विस्तार पावत आहेत. वारेमाप साहित्य लिहिले जात आहे. प्रत्येक शाखेत अनेक उपशाखा निर्माण होऊन विशाल वटवृक्षाचे स्वरूप धारण करीत आहेत. समाजशास्त्र, अर्थशास्त्र, मानसशास्त्र, भूगोल, इतिहास वगैरे अनेक शास्त्रांची चर्चा होत आहे. त्यात मानव- समाज कसा बनला? त्याने उन्नती कशी केली? त्याची अवनती कशी झाली? भौतिक जगावर त्यांनी कोणता प्रभाव पाडला? पृथ्वीवर त्याने कोणते परिवर्तन केले? आज तो उन्नती कोणत्या पद्धतीने करू शकेल अशा प्रकारचे प्रश्न सापडतात. पण आजपावेतो 'मनुष्य कशासाठी?' किंवा 'मनुष्याची काय आवश्यकता आहे?' असा प्रश्न कुठेच आढळून आला नाही. या आधुनिक काळातील विद्वानांना आजपावेतो हा प्रश्न उद्भवला नाही किंवा जाणीवपूर्वक हा प्रश्न त्यांनी उचलला नसावा. हा प्रश्न उद्भवू शकेल किंवा शकणारही नाही. पण एक गोष्ट मात्र दिसून येते की 'मनुष्य आहे आणि तो राहील' ही बाब स्वतःसिद्ध म्हणून त्यांनी स्वीकारली होती. एखाद्याच्या मतानुसार हा प्रश्न आवश्यक असो की नसो; पण हा विषय 'स्वतःसिद्ध' असल्यामुळे त्याविषयी विचार करणे व्यर्थच आहे.

माझ्या मते, प्राचीन काळच्या मानवांनी धर्मास मनुष्याच्या गळयामध्ये 'बांधलेला' पाहिले. मनुष्य जन्माबरोबर हात, पाय, नाक, कान या अवयवांना जसे घेऊन येतो 'तसे' तो 'धर्म' ही घेऊन आला आहे. याच कारणामुळे, मनुष्याच्या शतकानुशतकाच्या अविरत प्रयासानंतरदेखील धर्माचा जगातून बहिष्कार करण्यात येऊ शकला नाही. एका रूपात तो नष्ट झाला असला तरी धर्माने दुसरे स्वरूप धारण केलेच. जणू हा हवेप्रमाणे चोहोकडे पसरलेला आहे. एका ठिकाणची हवा काढताच दुसऱ्या ठिकाणाहून हवा पहिल्या ठिकाणी येते. आधुनिक वैज्ञानिकांनी धर्माचे हातपाय बांधून जगाच्या बाहेर कुठे तरी फेकण्याची इच्छा केली, भस्म करून टाकण्याचे कसोशीने प्रयत्नही केले. धर्माच्या उच्चाटनासाठी जे जे शक्य होते ते सर्व त्यांनी केले. काही वैज्ञानिकांना जणू यश मिळाल्यासारखेच वाटले.

धर्मवृक्षाचा मुळासकट नाश करण्यात आला, असे ते समजले. आता पालवी कधीच फुटणार

नाही, असेही त्यांना वाटले. फ्रान्सचे विद्वान 'बर्थोले' यांनी इ.स. १९०१ च्या जानेवारी महिन्यात दिलेल्या व्याख्यानात ते म्हणाले, "आता धर्माचे दिवस ओसरले आहेत. आता धर्माच्या ठिकाणी विज्ञानाचे राज्य येईल."

"The day of Religion has passed and Religion must now be replaced by Science."

त्यांचे म्हणणे आहे की, "प्राचीन युगामध्ये मानवजातीवर प्रभाव टाकणाऱ्या दोन शक्ती अस्तित्वात होत्या. एक बळ आणि दुसरी धर्म. आज या दोन्ही अनावश्यक झाल्या आहेत. याचे कारण या दोन्हींचे स्थान विज्ञानाने घेतले आहे."

रशियाचे प्रसिद्ध विद्वान, तपस्वी **काऊण्ट लियो टालस्टॉय** यांनी या युगातील भावनांचे प्रकटीकरण खालील पद्धतीने केले आहे.

"धर्माचे युग संपुष्टात आले आहे. विज्ञानाशिवाय इतर बाबींवर विश्वास ठेवणे मूर्खता आहे. आम्हांस आवश्यक असलेली प्रत्येक बाब (वस्तू) विज्ञानाद्वारे प्राप्त होऊ शकते. मानवी जीवनाचे मार्गदर्शक केवळ विज्ञानच व्हावे."

वैज्ञानिक आणि त्यांचे अनुयायी अशा प्रकारचा उद्घोष करीत आहेत. या अनुयायांमध्ये विज्ञानाचे प्राथमिक स्तरावरचे ज्ञानही न बाळगणारे, केवळ वैज्ञानिकांची 'री' ओढणारेच अधिक आढळतात. जीवनाचे पथ-प्रदर्शक विज्ञानच व्हावे, असे म्हणणारे हे अनुयायी विज्ञानाचे प्राथमिक ज्ञानही बाळगत नाहीतं. विज्ञानच जीवनाचे पथ-प्रदर्शक व्हावे, याचाच अर्थ आमच्या जीवनासाठी कोणत्याही पथ-प्रदर्शकाची गरज नाही, असा होतो. कारण, विज्ञानाचा उद्देश जगातील वस्तूंचे, नियमांचे अध्ययन करण्यापुरताच मर्यादित आहे. म्हणून मानवी जीवनासाठी विज्ञान कधीच मार्गदर्शक होऊ शकत नाही.

"Religion is obsolete; belief in any thing, but science is ignorance. Science will arrange all that is needful and one must be guided in life by Science alone". This is what is thought and said both by Scientists themselves and also by those men of the crowd who though far from scientific, believe in the scientists and join them in acserting that religion is an obsolete superstition and that we must be guided in life by Science only; that is in reality by nothing at all. For Science, by reason of its very aim (Which is to study all that exists) can afford no guidence for the life of man.

('What is relision' by Count Leo Tolstoy)

धर्माचा बहिष्कार करून केवळ भौतिक विज्ञानास मानवी जीवनासाठी पथ-प्रदर्शक मानणारे फार मोठी चूक करीत आहेत, असे टॉलस्टॉयचे म्हणणे आहे. कारण भौतिक विज्ञान वस्तूंचे विश्लेषण, अध्ययन करते. आचरणासंबंधीच्या बाबींचा विचार विज्ञानाच्या कक्षेत येत नाही.

टॉलस्टॉय महोदयांनी 'धर्म काय आहे?' ('What Is Religion') या आपल्या ग्रंथात एका नावीन्यपूर्ण विषयाचे विवेचन केले आहे. "वैज्ञानिक व त्यांचे अंध अनुयायी यांनी जेव्हा धर्माचा बहिष्कार करण्याचा प्रयत्न केला तेव्हा धर्माचा बहिष्कार ते करूच शकले नाहीत. उलट एका खालच्या पातळीच्या (निकृष्ट) धर्माचे ते उपासक बनले. इतिहाससुध्दा याची साक्ष देत आहे. वर्तमानकाळात पाश्चात्त्य देशांमध्ये सभ्यतेच्या नावावर धर्माच्या बहिष्काराचा प्रयत्न चालू आहे. पण धर्मास अंधविश्वास म्हणणारे तेच मनुष्य उच्च कोटीच्या धर्माशी किंवा भौतिक विज्ञानाशी संबंध नसणाऱ्या अनेक प्रकारच्या पाखंडावर विश्वास ठेवीत आहेत. भारतामध्ये सुद्धा धर्मास ढोंग समजून धर्माचा तिरस्कार करणारी माणसे मृतात्म्यांना बोलावून भविष्य विचारणे, त्यांच्यावर विश्वास ठेवणे, अशा भ्रमजाळात फसत असलेली आम्ही पाहतच आहोत. यासंबंधी टॉलस्टॉयचे विचार उद्‌धृत करणे योग्य होईल. "यापूर्वी एखाद्या देशामध्ये किंवा एखाद्या काळामध्ये मनुष्य धर्माशिवाय जरी राहू शकला नसला तरी आजचे विद्वान आम्ही धर्मास सोडून राहू शकू, राहावयास पाहिजे, असे म्हणत आहेत; तसा विश्वासही बाळगीत आहेत. पण पूर्वीच्या काळाप्रमाणेच धर्म आजही विराजमान आहे. तो मानवजातीचा संचालक आहे. मानवजातीचे हृदयस्थान आहे. धर्माशिवाय मानवजातीचा विकास होणे अशक्यच आहे. शरीरात हृदय नसेल तर मनुष्यजीवन जसे असंभव आहे तसे धर्माशिवाय मनुष्यजीवन अशक्य आहे. प्राचीन काळी सुद्धा भिन्न-भिन्न देशांमध्ये, वेगवेगळया जातींमध्ये उन्नत अवस्था निरनिराळया प्रकारची असल्यामुळे ईश्वर किंवा देवी-देवतांच्या संबधात विचार बदलत जरी असले, तरी मनुष्य ज्ञानसंपन्न झाल्यापासून आजपावेतो तो धर्माशिवाय कधीच राहू शकलेला नाही व भविष्यकाळात राहू शकणार नाही."

(टॉलस्टॉय : धर्म काय आहे?)

'फ्लिण्ट' आपल्या 'आस्तिकता' नावाच्या ग्रंथात अशा प्रकारे लिहितात : "वस्तुतः धर्म ही एक विशाल शक्ती आहे. ती खरोखरच मानवी जीवनाच्या व मानवी इतिहासाच्या समानांतर चालते. एखाद्या देशामध्ये व एखाद्या काळामध्ये मनुष्य धर्माशिवाय राहिला आहे काय, हा एक संदेहास्पद प्रश्न आहे. एवढेच नव्हे तर मनुष्य राहत असलेल्या ठिकाणी कोणता तरी एखादा धर्म केवळ होताच असे नव्हे तर त्या धर्माने एक व्यापक प्रभाव तेथील नागरिकांवर टाकलेला आहे. कोणत्याही जातीची सभ्यता धर्माने प्रभावित झालेली असते आणि आहे. कला- कौशल, साहित्य, विज्ञान, तत्त्वज्ञान सर्वांवरच प्रत्येक वेळी धर्माचा प्रभाव दिसून आलेला आहे."

(फ्लिण्ट : थीज्म : पृ. ४)

धर्माच्या व्यापकतेवर काही जणांचा विश्वास नाही. असभ्य जाती- जमातीमध्ये कोणत्याही प्रकारच्या धर्म नव्हता, हे सिद्ध करण्याचा त्यांनी प्रयत्न केला आहे. मॅक्सम्युलर महोदयांनी आपल्या 'सायन्स ऑफ रिलीजन्स' या ग्रंथामध्ये उपयुक्त विषयासंबंधी काही साक्षी दिल्या आहेत. कॅप्टन गार्डीनरनी इ.स. १८३५ मध्ये जूलू (आफ्रिकेच्या जंगली) लोकांमध्ये जाऊन खालीलप्रमाणे

वार्तालाप केला.

**गार्डीनर :** जगाची निर्मिती करणाऱ्या शक्तीविषयी तुम्हांस काही माहीत आहे काय? सूर्याच्या उदयास्तास, वृक्षाच्या वाढीस पाहिल्यानंतर यांच्या निर्मात्याविषयी, यांच्यावर शासन करणाऱ्याविषयी तुम्ही काही विचार केला आहे काय? काही समजून घेतले आहे काय?

**टपाई नावाचा झुलू :** (थोडा वेळ विचार करून) नाही. आम्ही यांना पाहतो पण ते कसे येतात हे आम्हांस माहीत नाही. ते आपोआपच येतात असे आम्हांस वाटते.

**गार्डीनर :** युद्धामध्ये होणाऱ्या जय-पराजयाचे कारण कोणते असेल असे तुम्हांस वाटते?

**टपाई :** जेव्हा आम्ही पराजित होतो व पशूंना स्वाधीन करून घेऊ शकत नाही तेव्हा आमचे वडील इटोंगोंनी आमच्यावर कृपा केली नाही, असे आम्ही समजतो.

**प्रश्न :** तुमच्या वडिलांच्या आत्म्यांनी (अमाटोंगोनी) जग बनविले आहे, असे तुम्ही समजता काय?

**टपाई :** नाही.

**प्रश्न :** मनुष्याचा आत्मा शरीर सोडून कोठे जातो हे तुम्ही जाणता काय?

**टपाई :** आम्ही सांगू शकत नाही.

**प्रश्न :** तो नेहमीच असतो असे तू समजतोस काय?

**टपाई :** आम्ही सांगू शकत नाही. आम्ही युद्धासाठी जातो तेव्हा आमच्या पूर्वजांचे आत्मे आम्हांवर कृपा करतात, असा आमचा विश्वास आहे. पण इतर वेळी आम्हांस त्यांची आठवण येत नाही.

(मॅक्सम्युलर : सायन्स ॲण्ड रिलीजन पृ. ४४)

या संभाषणानंतर कॅप्टन गार्डीनर महोदयांनी आफ्रिकेच्या जूलू जातीमध्ये कोणताही धर्म नाही, असा निष्कर्ष काढला. हे जर खरे असेल तर धर्म सर्वव्यापक आहे, तो नेहमी मानवजातीशी निगडित असतो, असे आमचे म्हणणे चूक ठरेल. पण मॅक्सम्युलर कॅप्टन गार्डीनर यांच्या म्हणण्यास विश्वसनीय समजत नाहीत. "एक श्वेतवर्णी मनुष्य एकाकीपणे असभ्य जमातीत जाऊन त्यांच्या भाषेवर प्रभुत्व संपादन न करता केवळ दोन- तीन प्रश्न विचारून मिळालेल्या उत्तरांच्या आधारे एखादा निर्णय घेतो, हे समर्पक ठरू शकत नाही. कारण, असभ्य जमातीतील अनेकांना श्वेतवर्णी लोकांपासून भीती वाटते. एवढेच नव्हे तर त्यांनी विचारलेल्या प्रश्नांची उचित उत्तरेही ते देवू शकत नाहीत किंवा देवू इच्छीत नाहीत. हे उघड उघड दिसून येते. असभ्य व्यक्तीच नव्हे तर सभ्य समाजाशी निगडित असणाऱ्या एका ख्रिश्चनापेक्षा धर्माविषयी अधिक ज्ञान बाळगणारी भारतातील ग्रामीण माणसे आपल्या भावनांना श्वेतवर्णीयांसमोर व्यक्त करू इच्छीत नाहीत. साधारण संभाषणाचा कोण जाणे काय परिणाम होईल अशी भीती त्यांना वाटते", असे मॅक्सम्युलर म्हणतात.

मॅक्सम्युलरचे हे म्हणणे खरे होते. कारण रेवरंड डॉ. कौलवे नावाचा एक पादरी जूलू लोकांमध्ये बरीच वर्षे राहिला. त्यांची भाषा उत्कृष्ट प्रकारे बोलू आणि समजू लागला. तेव्हा जूलू जमात 'धर्मशून्य' नाही, असे त्यास आढळून आले. प्रत्येक वंशाचा आणि संपूर्ण मानवजातीचा

वेगवेगळा एक मूळपुरुष होता, असा त्यांचा विश्वास होता. मानवजातीच्या मूळपुरुषास 'उनकुलंकुलू' असे ते म्हणत असत. प्रपितामह - पणजोबा हा त्या शब्दाचा जूलू भाषेतील अर्थ. 'उनकुलंकुलू' या शब्दाशी संस्कृत भाषेच्या 'कुल' शब्दाचा दूरचा संबंध असावा असे वाटते. 'उनकुलंकुलू'चा बाप कोण होता? असे त्यांना विचारल्यावर तो वेळूतून उत्पन्न झाला, असे त्यांनी सांगितले. 'जूलू' भाषेत वेळूसाठी 'उथलङ्ग' शब्द आहे. मुले बापास 'उथलङ्ग' म्हणतात. कारण, ज्याप्रमाणे वेळूच्या फांद्या फुटतात तद्वतच मुलाची वडिलांपासून उत्पत्ती होते. 'उथलङ्ग' शब्दाचा वास्तविक अर्थ एखादा दुसराच असावा, असे कौलवेंचे म्हणणे आहे. आता जूलू नागरिक तो अर्थ विसरले आहेत. केवळ शब्द मात्र शिल्लक राहिला आहे. प्रो. मॅक्सम्युलर यांच्या मते संस्कृतचा 'वंश' शब्द 'वेळू', आणि 'कुळ' या दोन्ही अर्थांमध्ये वापरला जातो. 'उथलङ्ग' शब्दाविषयी असेच काही तरी झाले असावे.

डॉ. कौलवेंना एक जूलू असे म्हणाला की, "स्वर्गाच्या राजाविषयी पहिल्यांदा श्वेतवर्णीयांपासूनच आम्हांस ज्ञान मिळाले, हे म्हणणे चूक आहे. वर्षा ऋतूमध्ये जेव्हा मेघांचा गडगडाट होतो तेव्हा आम्ही म्हणतो की, 'राजा (ईश्वर) क्रीडा करीत आहे.' आम्हांपैकी कोणी भीत असेल तर वृद्ध पुरुष 'तू राजाचे काय खाल्लास? तू का भितोस?' असे म्हणतात."

दूसरा एक वृद्ध पुरुष असे म्हणाला, "आम्ही लहानपणी राजा स्वर्गामध्ये आहे असे ऐकत होतो. राजा वर असतो असे आम्ही लहानपणी ऐकले आहे. जगास उत्पन्न करणारा उदंबूको नावाचा राजा आहे जो वर असतो असे आम्ही ऐकले आहे."

एका वृद्ध स्त्रीने म्हटले - "अन्न(धान्य) कुठून येते असे विचारल्यावर 'जगास निर्माण करणाऱ्यानेच अन्न बनविले आहे; पण त्याचे नाव आम्ही जाणत नाही!' असे वृद्ध पुरुष आम्हांस सांगत असत. 'ईश्वर कुठे आहे? आम्ही त्यास का पाहू शकत नाही?' असे विचारल्यावर, 'तो स्वर्गात आहे, तो राजांचाही राजा आहे' असे उत्तर देत असत. जेव्हा एखादा पशू वीजेमुळे मृत्युमुखी पडत असे तेव्हा 'देवाने त्यास गावातून नेले' असे ग्रामवासी म्हणत असत.'

दुसऱ्या एका वृद्धेने आपले विचार पुढीलप्रमाणे प्रगट केले - "आमच्या पूर्वजांच्या मतानुसार 'उनकुलंकुलू' नावाचा एक मनुष्य आहे, जो पृथ्वीवर राहतो आणि एक राजा आहे जो स्वर्गामध्ये राहतो. जीवनाचे मूळ (आधार) स्वर्ग आहे. तेच मानवांना जीवन देते. 'राजा पाऊस पाडतो. सूर्यचंद्राचा उदयास्त त्याच्याच आधीन आहे. चंद्राचा प्रकाश रात्री शुभ्र असतो, ज्यामुळे मनुष्य सुखाने मार्गाक्रमण करतो', असा आमच्या पूर्वजांचा विचार होता.

एखाद्या प्राण्यावर वीज पडली तर मनुष्याने दुःख न करता असे म्हणावे की, 'राजाने स्वतःच्या जेवणासाठी या प्राण्यास मारले आहे. हे काय तुझे आहे? हे राजांचे नव्हे काय? तो उपाशी आहे म्हणून त्याने स्वतःसाठी मारले आहे,' असे म्हणत असत. माणसावर वीज पडली तर 'राजाने हा अपराधी आहे असे समजले आहे' असे म्हणत.

जूलू भाषेमध्ये जगत्कर्त्याचे 'इटोंगो' असे नाव आहे. एक जूलू म्हणाला, 'इटोंगो' या शब्दाचा

'मनुष्य' किंवा 'मरून जिवंत झालेला' असा अर्थ नाही, तर 'मनुष्य, पशू, पक्षी इत्यादींना आधारभूत असलेल्या पृथ्वीस धारण केलेली शक्ती,' असा अर्थ आहे. आम्हांस पृथ्वीचा आधार आहे. या पृथ्वीवर आम्ही निवास करीत आहोत. आम्हांस आधारभूत असलेल्या पृथ्वीस एक आधारस्थान आहे. तोच ईश्वर आहे.

यावर प्रो. मॅक्सम्युलर महोदय खालीलप्रमाणे स्पष्टीकरण करतात.

अशा प्रकारे ज्या जातींना धर्मशून्य, ईश्वराबाबतीत विचारशून्य समजत होतो, त्यांच्यामध्ये सुद्धा धर्माच्या अनेक आवश्यक अशा बाबी आहेत, असे आम्हांस दिसून आले. सर्वांना जन्म देणारा एक राजा स्वर्गामध्ये राहतो. तो पाऊस, गारा, वीज यांना पाठवतो. अपराध्यांना शिक्षा करतो. पर्वतात राहणाऱ्या अनेक पशूंपैकी काहींचा स्वतःसाठी बळी घेतो. अशा अगोचर ईश्वरावर त्यांचा विश्वास आहे.'' यावरून, अरण्यामध्ये राहणाऱ्या जमातींच्या धर्मशून्यतेबद्दल दिल्या जाणाऱ्या निषेधात्मक साक्षी स्वीकारताना किती दक्षता बाळगावी लागते, हे स्पष्ट दिसून येत आहे.

आतापर्यंतच्या स्पष्टीकरणाद्वारे मानवी इतिहासाच्या आधारे हे सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे की जगात कोणतीच जमात धर्मशून्य राहिली नाही. भविष्यकाळात राहू शकणार नाही. धर्माची भूक मनुष्याच्या हृदयात आहे. भुकेने व्याकुळ व्यक्ती ज्याप्रमाणे संकटप्रसंगी भक्ष्य-अभक्ष्य याचा विचार न करता अभक्ष्यभक्षणाद्वारे उदरनिर्वाह करतात त्याप्रमाणे केव्हा केव्हा व्यक्ती आणि समाज हे त्यांना हानिकारक असलेल्या पदार्थांचा सुद्धा स्वतःच्या क्षुधानिवृत्तीकरिता उपयोग करतात. आहार ग्रहण केल्याशिवाय मनुष्य जगू शकत नाही, त्याप्रमाणे धर्मास सोडून कोणताच समाज जगू शकत नाही. दुर्भिक्ष्यामुळे पीडित मनुष्य वाळूसुद्धा भक्षण करतात. भुकेचे कष्ट सहन न होऊन आयासुद्धा आपल्या मुलाचे मांस भाजून खातात. भुकेमुळे सभ्य समाजसुद्धा आप्तेष्टांना मारून खाण्यास मागेपुढे पाहत नाही. पण, उत्तम जेवण मिळाले असते तरी त्यांनी तसेच केले असते किंवा अनुचित जेवण हानिकारक ठरत नाही, असा विचार मात्र मुळीच करू नये. हानी ही होणारच; पण क्षुधेमुळे पीडित झालेल्यांनी सत्य धर्माच्या अनुपस्थितीमुळे विविध प्रकारच्या गैरमार्गांनी स्वतःच्या क्षुधेस शमविण्याची प्रयत्न केला आहे. त्यामुळे त्यांची अमर्यादित हानीही झाली आहे; होत आहे. पण ते अल्पकाळसुद्धा धर्मास सोडून जगू शकत नाहीत, यात मुळीच संशय नाही.

''पाण्याबाहेर मासा जसा जगू शकत नाही, अगदी तसे साधारणच नव्हे तर उच्चकोटीचे मनुष्य धर्मबाह्य होऊन, धर्मास सोडून राहू शकत नाही. हा मनोविज्ञानाचा अखंडनीय असा सिद्धांत आहे.'' असे मॅडम ब्लेवेट्स्की यांचे म्हणणे आहे.

"It is one of the most undeniable facts of Psychology that the average man can as little exist out of a religious element of some kind as a fish out of the water."

(मॅडम ब्लेवेट्स्की : इसिस अनव्हेल्ड भाग : २ पृ.२५)

आधुनिक काळात सुशिक्षितांमध्ये धर्माविषयी घृणा, चीड का वाढत चालली आहे? याची प्रामुख्याने दोन कारणे आहेत. एक तर धर्माच्या नावावर झालेला अत्याचार. दुसरे फॅशन किंवा अंधानुकरण. धर्माच्या नावावर अनेक उपद्रव होत आहेत. लोकांना जिवंत जाळले जाते. हजारो मूक पशूंची हत्या केली जाते. एकमेकांच्या रक्तासाठी आसुसलेली धार्मिक मंडळी आसुरी वृत्तीचे प्रदर्शन करीत आहेत. मानवी जीवनाची शांती भंग पावत आहे. धर्माविषयी चीड निर्माण होत आहे. पण ही चीड, वाळू भक्षण करणाऱ्या क्षुधार्तास पाहून अन्नाशी घृणा करण्यासारखी आहे. जेवणामुळेच अशा प्रकारचे उपद्रव होत आहेत म्हणून मनुष्याने जेवणच सोडून द्यावे, असे म्हणण्यासारखे आहे. खरे पाहता, वाळू भक्षण करणाऱ्यास तो आहार योग्य नाही, भाकरी खाणे योग्य आहे, असे मार्गदर्शन करणे योग्य ठरले असते. शांत चित्ताने, स्थिर बुध्दीने विचार केल्यास लक्षात येईल की आज धर्माच्या नावावर होणाऱ्या अत्याचारांचे कारण धर्म नसून अधर्मच आहे. हा अधर्म धर्माचा वेष धारण करुन एवढे अत्याचार करवीत आहे. समजा, मी माझ्या शत्रूस हरवू इच्छीत आहे. त्यासाठी माझा एक मित्र मला मदत करीत नाही. त्या वेळी त्याच्या अज्ञानाचा गैरफायदा घेऊन त्यास उत्साहित करून शत्रूस मारणे धर्म आहे असे त्यास पटवून दिल्यावर तो माझी सहायता करण्यास तयार होईल. साक्षीदाखल इतिहासाचे पुरावे देता येतील. दारा शिकोह हा औरंगजेबाचा मोठा भाऊ. त्यास मारावयाचे होते. 'दारा' हा धर्मशत्रू आहे हे लोकांना पटवून देईपर्यंत औरंगजेब स्वतःची इच्छा पूर्ण करण्यात यशस्वी होऊ शकला नाही. वास्तविक पाहता या बाबतीत धर्म कारण नसून स्वार्थ हेच कारण होते. स्पेन आणि पोर्तुगिजांची इच्छा होती की दक्षिण अमेरिकेच्या जंगलात राहणाऱ्या आदिवासींचा नाश करावा व तिथे जाऊन राहावे. यासाठी काहीतरी ढोंग करणे आवश्यक होते. एखादे कारण हवे होते. आदिवासींनी सर्व प्रकारे यांची सेवाशुश्रूषा केली. अतिथी- सत्कार केला. अशा सज्जनांच्या नाशासाठी एखादे कारण शोधणे आवश्यक होते. म्हणून एकदा एक पादरी आदिवासी जमातींपैकी 'इंका' जमातीच्या एका सरदाराजवळ जाऊन आपला धर्मग्रंथ इंजील (बायबल) त्याच्या हातात देऊन, "हे पुस्तक जसे सांगेल तसे तुम्ही वागावे" असे म्हणाला. त्या सरदाराने ते पुस्तक स्वतःच्या कानाजवळ नेऊन 'काहीच ऐकू येत नाही, हे काहीच सांगत नाही; मी काय करावे? कसे वागावे? असे म्हणून ते पुस्तक खाली फेकले. मग आणखी काय पाहिजे? त्यांना पाहिजे होते एक निमित्त. 'तू अपराधी आहेस,' असे म्हणून श्वेतवर्णी त्यांच्यावर तुटून पडले आणि आपल्या अस्त्रशस्त्रांद्वारे त्या जमातीचा समूळ नाश केला. या उपद्रवाचे कारण धर्म आहे की स्वार्थ? थोडासा विचार करून बुद्धिवंतांनी याचे उत्तर द्यावे. आजकाल भारतामध्ये सुद्धा धर्माच्या नावावर हिंदू-मुसलमानांमध्ये भांडण-तंटे होत असतात. "तुम्ही आमच्या मशिदीसमोर वाद्ये वाजविली तर आम्ही तुमचे डोके फोडू, वाद्यामुळे आमच्या नमाजामध्ये अडथळा येतो," असे मुस्लिम म्हणतात. या उपद्रवाचे

कारण नमाज आहे काय? मुळीच नाही. खरे पाहता, 'नमाजा'द्वारे ईश्वराची प्रार्थना करणाऱ्यांना मशिदी बाहेर वाहने जात आहेत की वाद्ये वाजत आहेत, हे समजणेच कठीण आहे. पण नमाजा अगोदरच हिंदूंच्या वाद्यांच्या शोधात असणाऱ्यांना ईश्वरचिंतनासाठी वेळ कसा मिळेल? मुळीच नाही. नमाज हे एक निमित्तमात्र आहे. बाकी स्वार्थ आणि हट्ट याशिवाय दुसरे काहीच नाही.

आये दिन मन्दिरों मस्जिद के हैं झगडे रहते।
दिल में ईंटे हैं भरी, लब पे खुदा होता है।।

जगात होणारे सर्व उपद्रव धर्ममुळेच होतात, असे समजणे चुकीचे आहे. राजकारणामुळेसुद्धा अनेक उपद्रव, अत्याचार होत आहेत. भाकरीसाठी दररोज होणारे कलह आम्ही पाहतोच. न्यायालय व कारागृहांचा शोध घेतला तर ९९ उपद्रवांचे कारण धर्म नसून दुसरेच आहे. मानवजातीशी संबंधित अनेक युद्धांचे कारण राजकारणच असते, धर्म नव्हे.

इ.स. १९१४ च्या पहिल्या महायुद्धात ज्या दोन पक्षांनी भाग घेतला ते दोन्ही एकाच धर्माशी निगडित होते. एकाच धर्माच्या अनुयायांमध्ये तुंबळ युद्धे झाली आहेत. धर्माच्या नावावर देवी-देवतांना हजारो पशूंचा बळी दिला जातो तर विज्ञानाच्या नावावर जीवशास्त्राच्या प्रयोगशाळांत लाखो प्राण्यांचा वध केला जातो तर जेवणासाठी, जिव्हेचे लाड पुरवण्यासाठी दररोज निर्दोष, हितकारक अशा कोट्यवधी मूक पशूंच्या मानेवर सुरी फिरविली जाते. पण एकाही सुधारकाने अशा घोर अत्याचारांसाठी कारणीभूत असणाऱ्या राजकारणास सोडण्याचा उपदेश का केला नाही? खरी राजनीती, राज्यशास्त्र या घोर अनर्थकारक अत्याचारांचा स्वीकार करीत नाही असे म्हणाल, तर वास्तविक धर्म अन्याय, उपद्रव यांना कसा स्वीकारील? म्हणून धर्माच्या नावावर होणाऱ्या अत्याचारांचे कारण अधर्म आहे, खरा धर्म नव्हे.

धर्माच्या अवहेलनेचे दुसरे कारण 'फॅशन' आहे. 'महाजनो येन गतः स पन्थाः' समाजातील श्रेष्ठ व्यक्तींच्या विधानाची सामान्यजन 'री' ओढणारेच असतात. एखाद्या माणसाने, "धर्माच्या खुळचट कल्पनांना मूठमाती द्या, यामुळे अनेक उपद्रव होत आहेत" असे म्हणताच, सामान्य व्यक्तीसुद्धा मोठे होण्याचा हाच उपाय आहे असे समजून त्याच गोष्टीची पुनरावृत्ती करण्यास प्रारंभ करतात. आजकालचे स्वतंत्र वैज्ञानिक धर्मासंबंधीच्या कोणत्याही बाबीवर टीका - टिप्पणी न करता, धर्म हा आपल्या अवाक्याबाहेरचा आहे, असे समजत आहेत. तरीपण पूर्वीच्या काही वैज्ञानिकांनी धर्मास तिरस्काराच्या दृष्टीने पाहिले होते, म्हणून कॉलेज व विद्यापीठ व इतरत्र तेथील प्रमुख त्यांचेच अनुसरण करीत आहेत. विद्यार्थीसुद्धा त्यांच्या म्हणण्यास दुजोरा देत आहेत. धर्माची अवहेलना करणे श्रेयस्कर समजत आहेत. एखाद्या कॉलेजमध्ये प्राचार्य किंवा प्राध्यापक ईश्वर-प्रार्थना ढोंग आहे, असे म्हणताच विद्यार्थीसुद्धा खऱ्याखोट्याचा विचार न करता त्यांच्या म्हणण्यास बरोबरच समजतात. म्हणून वरील दोन्ही बाबींच्या आहारी न जाता खऱ्या धर्माची जाणीव करून घेण्यासाठी पाऊल उचलणे आवश्यक आहे.

धर्म एक सर्वव्यापक तत्त्व आहे. हे दाखविण्याचा आम्ही आतापर्यंत प्रयत्न केला. तुम्ही

अजूनही धर्माची व्याख्या केलीच नाही, असे वाचक म्हणतील. खरे पाहता आम्ही जाणीवपूर्वक आतापर्यंत धर्माची व्याख्या (लक्षण) केली नाही. अति व्याप्ती व अव्याप्ती दोषरहित व्याख्या हेच 'लक्षण' समजले जाते. वस्तूच्या किंवा विषयाच्या दोषांच्या विवेचनापूर्वी वस्तूची ओळख आवश्यक आहे. म्हणून वाचकांना धर्माचा परिचय करून दिला. तीन- चार वर्षांच्या मुलास गाईविषयी जेवढे ज्ञान असते तेवढे तरी ज्ञान धर्माविषयी सर्वांनाच असते. मुलगा गाईस ओळखतो. न चुकता 'ही गाय आहे' असे तो सांगू शकतो. इतर विशेषणे- बाबी त्यास कळत नसाव्यात. अशाच प्रकारे प्रत्येक मनुष्य 'हा धर्म, हा अधर्म' असे सामान्यपणे समजतो. पण धर्माच्या बाबतीतील काही गुंतागुंतीच्या प्रश्नांचा उलगडा सहजासहजी होत नाही. म्हणूनच-

धर्मस्य तत्त्वं निहितं गुहायाम्।

धर्माचे तत्त्व सहजपणे आकलनीय नाही. 'धर्म' हा संस्कृत शब्द आहे. संस्कृत साहित्यामध्ये या शब्दाचे अनेक अर्थ आहेत. त्यांच्याशी आमचा काही संबंध नाही. उदाहरणादाखल योगशास्त्रात पतंजली मुनींनी धर्माविषयी –

योग्यतावच्छिन्ना धर्मिणः शक्तिरेव धर्मः।

''धर्मीची योग्यतारूप शक्ती हाच धर्म आहे. अग्नीची दाहक शक्ती हाच अग्नीचा धर्म. अग्नी नष्ट होऊन राख झाल्यावर त्या राखेस कुणीही अग्नी म्हणत नाही. येथे धर्माचा अर्थ आहे 'धारण करणारा' (धरतीति धर्मः)'' असे लिहिले आहे.

महाभारतामध्ये हा आशय एका ठिकाणी वर्णिला आहे.

धारणाद्धर्ममित्याहुः धर्मो धारयते प्रजाः।
यत् स्याद् धारणसंयुक्तं स धर्म इति निश्चयः।।

धारण करण्यामुळे धर्म ही संज्ञा दिली गेली. धर्म प्रजेस धारण करतो. सद्गुणांच्या धारणांमुळे 'धर्म' समजला जातो. धर्म शब्दाचा एवढा विस्तृत- व्यापक अर्थ घेत असू तर मनुष्यत्वसुद्धा धर्म होईल. अशा स्थितीत तुमच्या सिद्धान्तांचा स्वीकार न करता सुद्धा आम्ही धार्मिक होऊ शकतो, असे धर्माचे विरोधक म्हणू शकतात. त्यांचा हा आक्षेप बरोबर आहे. धर्माचा विरोध करणारेही मनुष्यत्वाचा विरोध तर करीतच नाहीत.

अशाच प्रकारे मनु महर्षींनी दिलेल्या धर्माच्या (व्याख्येस) लक्षणास नास्तिकसुद्धा स्वीकार करू शकतात.

धृतिः क्षमा दमोऽस्तेयं शौचमिन्द्रियनिग्रहः।
धीर्विद्या सत्यमक्रोधो दक्षकं धर्मलक्षणम्।।

धैर्य, सहनशीलता, इन्द्रिय- संयम, अचौर्य, पवित्रता, बुध्दिमत्ता, विद्या, सत्य, अक्रोध वगैरे लक्षणांचाही कोणीही विरोध करू शकणार नाही. पण प्रश्न जसाच्या तसाच राहून जातो. धर्माची खालील व्याख्या प्रश्न सोडवते का पाहू :-

वेदप्रतिष्ठितं कर्म धर्मस्तन्मङ्गलं परम्।

प्रतिषिद्धक्रियासाध्यः स गुणोऽधर्म उच्यते।।

"वेदनिर्दिष्ट शुभकर्म हेच धर्म आहे. याउलट केले जाणारे आचरण अधर्म आहे." अशी धर्माची व्याख्या केली. तर वेदांमध्ये विश्वास नसणारे याचा स्वीकार करीत नाहीत. वेदांचा विरोध करणारे, वरील व्याखा व्यापक नसल्यामुळे आमचे समाधान होऊ शकत नाही, असे म्हणतात.

मनु महर्षी सुद्धा-

श्रुतिः स्मृतिः सदाचारः स्वस्य च प्रियमात्मनः।
एतच्चतुर्विधं प्राहुः साक्षात् धर्मस्य लक्षणम्।।

या श्लोकात श्रुती, स्मृती यांच्यावर अधिक भर दिला आहे. ही व्याख्यादेखील सर्वमान्य होऊ शकत नाही. वैशेषिक शास्त्रकार कणाद महर्षींनी खालील व्याख्या केली आहे.

यतोऽभ्युदयनिःश्रेयससिद्धिः स धर्मः।

"लोक, परलोक यांची प्राप्ती ज्यामुळे होते तो धर्म आहे," असे म्हटले आहे. धर्माच्या या व्याख्येमध्ये 'परलोक' हा एक असा शब्द आहे ज्यावर अनेकांचा विश्वास नाही. हा शब्द नसता तर काही अंशी ही व्याख्या उपयोगी ठरली असती.

'धर्म' शब्दाचे अजून बरेच अर्थ आहेत, ज्यांचा आमच्या या विषयाशी, काहीच संबंध नाही. 'मासिक धर्म' या शब्दामध्ये 'धर्म' शब्द नियमार्थक आहे. संस्कृत साहित्यामध्ये अनेक ठिकाणी 'धर्माध्यक्ष' शब्द आढळतो. इथे 'धर्म' शब्दाचा अर्थ दान किंवा 'दान - विभाग' असा आहे.

म्हणून आम्ही या पुस्तकात 'धर्म' शब्दाचा प्रयोग इंग्रजी भाषेतील 'रिलीजन' Religion, पारसी भाषेतील 'मजहब' या दोन शब्दांच्या समानार्थकच करीत आहोत. काहींच्या मते, धर्म शब्द हा रिलीजन, मजहब या शब्दांचा समानार्थक शब्द होऊ शकत नाही. त्यांचे म्हणणे अंशतः स्वीकारण्याजोगे आहे. तरीपण आजच्या व्यवहारात धर्म, रिलीजन हे दोन्ही शब्द पर्यायी म्हणून वापरले जातात. सर्वसामान्यच नव्हे तर विद्वानसुद्धा या शब्दांचा समानार्थक वापर करीत आहेत. म्हणून या पुस्तकात' धर्म शब्दाचा यौगिक (शास्त्रीय) अर्थ न घेता व्यावहारिक अर्थ लक्षात घेऊन मागील विवेचनात 'धर्म' शब्दाचा वापर केला आहे. या आधारावर 'धर्म' शब्दाची आमची व्याख्या खालीलप्रमाणे राहील.

**" मनुष्याचा आपल्यापेक्षा (स्वतःपेक्षा) एखाद्या उच्च अदृश्य शक्तीवर विश्वास आस्तिकता आणि त्या विश्वासाने प्रभावित होऊन केला जाणारा व्यवहार (आचरण) 'धर्म' आहे."** या व्याख्येनुसार धर्म ही मानवजातीत व्यापक रूपात असणारी बाब आहे. ही निष्कृष्ट आणि उत्कृष्ट अशा दोन्ही प्रकारच्या मानवांमध्ये आढळून येते. आपल्यापेक्षा श्रेष्ठ असलेल्या एका शक्तीमध्ये विश्वास नसलेली अवस्था मनुष्यामध्ये केव्हाच आढळून येत नाही. तशा विश्वासाने मानवी जीवनावर अधिकार गाजविला नाही, असेही कधी झाले नाही. काही वेळा बऱ्याच विद्वानांनी त्या विशिष्ट शक्तीस स्वीकारले नाही व विरोधही घोषित केला; पण त्यांचा व्यवहार पडताळून पाहिल्यावर तो अदृश्य शक्तीने प्रभावित होता, असेच दिसून येईल. बारकाईने निरीक्षण केले तर त्यांचा

व्यवहार ईश्वर-विश्वासी व्यक्तींद्वारे स्वीकृत नियमांच्या आधारावरच होता, असे दिसून येईल. उदाहरणादाखल : जैनी ईश्वरास मानीत नाहीत. पण त्यांचे मंदिर, पूजापद्धती, त्यांची वागणूक, चाली-रीती, सदाचाराचे नियम हे सर्व त्यांचा विश्वास मानवापेक्षा उच्च अशा एका विशिष्ट शक्तीवर आहे, हे दाखवून देते. ईश्वरामध्ये असलेले गुण त्या शक्तीमध्ये त्यांना दिसत नसावेत. जगातील बहुतेक व्यक्ती पृथ्वीच्या गुरुत्वाकर्षण शक्तीस जाणत नाहीत; पण ती शक्ती व्यापक असल्यामुळे सर्वांच्या व्यवहारांवर आपला प्रभाव टाकते. 'आस्तिकता' किंवा एखाद्या उच्चशक्तीवर विश्वास, हा सुद्धा एवढा व्यापक आहे की तो अल्पशा नास्तिकांच्या व्यवहारांवर प्रभाव टाकल्याशिवाय राहू शकत नाही. आकर्षण शक्तीशिवाय आम्ही जगू शकतो, असे म्हणणाऱ्यांना आकर्षण शक्ती नसलेल्या ठिकाणी राहून दाखवावे लागेल. अशाच प्रकारे मानवी जीवनास सुखसंपन्न, सदाचारसंपन्न करण्यासाठी धर्म किंवा आस्तिकता आवश्यक नाही, असे म्हणणाऱ्यांना धार्मिकतेचा व आस्तिकतेचा प्रभाव नसलेला एखाद्या मानवसमाज निर्माण करून दाखवावा लागेल. आकर्षण शक्ती नसलेला भूभाग सापडणे जसे अशक्य आहे तसेच धार्मिकतेच्या प्रभावाने रहित असलेला मानवसमाज सापडणे अशक्य आहे. धर्माची अपेक्षा न करताच आम्ही सत्य, अस्तेय वगैरे सदाचाराशी निगडित नियमांचे पालन करू शकतो, अशी फुशारकी काही जण मारतात. पण ज्या समाजात ते राहतात त्या समाजामध्ये त्यांच्या पूर्वीच सदाचाराशी संबंधित नियम, धार्मिकता अस्तित्वात आहे. हे पाहता त्यांची फुशारकी व्यर्थच आहे, हे दिसून येते. एखाद्या सुव्यवस्थित राज्यामध्ये वास्तव्य करीत 'मी पोलिसांच्या मदतीची अपेक्षा न करता जीवन सुखाने जगू शकतो' असे म्हणणे निरर्थकच आहे. कारण, त्या राज्यामध्ये पोलिसांचा प्रभाव यापूर्वीच इतका अधिक आहे की तेथे चोरी होणे शक्यच नाही. अशा स्थितीत पोलिसांच्या मदतीशिवाय सुखी जीवनाची 'फुशारकी' निरर्थकच ठरणार नाही काय? अशाच प्रकारे धार्मिकतेने व आस्तिकतेने प्रभावित समाजामध्ये राहत असताना धार्मिकतेशिवाय आम्ही जीवन जगू शकतो, हे म्हणणे अविवेकीपणाचे द्योतक नव्हे काय?

'धर्म' ही एक विस्तृत (व्यापक) अशी बाब आहे, असे वर दर्शविले आहे. 'आस्तिकता' हे धर्माचे मुख्य अंग आहे. 'आस्तिकता' म्हणजे मानवजातीपेक्षा उन्नत, श्रेष्ठ अशा शक्तीवर विश्वास ठेवणे. अनेकांचा असा विश्वास भुताप्रेतावरही असू शकतो. काही जणांचा साकारावर, काहींचा निराकारावर असू शकतो. सर्वव्यापक किंवा एकदेशी, दयाळू किंवा क्रूर अशा कोणत्याही प्रकारच्या एका शक्तीवर हा विश्वास असू शकतो. कसे का असेना, पण कोठेतरी एका ठिकाणी सर्वांचा हा विश्वास असतोच, यात मुळीच संदेह नाही. म्हणून 'आस्तिकता'सुद्धा सर्वव्यापक आहे. प्रत्येक देशात, युगात, जाती-जमातीतही आस्तिकता आढळून येते. आस्तिकतेची भावना वास्तविक आहे का भ्रामक आहे, याचे विवेचन पुढे करणार आहोत. येथे एवढेच स्पष्ट करू इच्छितो की आस्तिकतेच्या अस्तित्वाबद्दल कोणासही शंका बाळगण्याचे काही कारण नाही.

या बाबतीत दोन आक्षेप आहेत. त्यांचे निराकरण करणे येथे आवश्यक व उपयुक्त आहे.

'आस्तिकता जर सर्वव्यापक असेल तर आस्तिकांचा एक समूह आस्तिकांच्या दुसऱ्या समुहास नास्तिक का म्हणतो? हा पहिला आक्षेप आहे. 'आस्तिकता सर्वव्यापक असेल तर त्याच्या प्रचारासाठी आस्तिकांचा प्रयत्न का चालू आहे?' हा दुसरा आक्षेप आहे.

आस्तिकांचा एक समूह आस्तिकांच्या दुसऱ्या समूहाची केवळ निंदाच करीत नाही तर त्यांना नास्तिकसुद्धा समजतो. मुस्लिम ईश्वरास मानतात. पण त्यांच्या दृष्टीत मुस्लिमाशिवाय इतर सर्व जग काफिर म्हणजेच नास्तिक आहेत. हीच स्थिती खिश्चनांची आहे. हिंदू सुद्धा केवळ हिंदूंनाच आस्तिक समजतात. मनु महर्षी म्हणतात :

"नास्तिको वेदनिन्दकः"

एवढेच नव्हे, तर मुस्लिमांतील एक शाखा दुसऱ्या शाखेस 'नास्तिक' म्हणते. महर्षी दयानंदांनी आपल्या 'सत्यार्थप्रकाश'मध्ये नवीन वेदान्त्यांचा नास्तिक म्हणून उल्लेख केला आहे. अशा प्रकारे एखाद्या निःपक्ष व्यक्तीने आस्तिकांविषयी संशोधन केले, तर प्रत्येक आस्तिकास नास्तिक सिद्ध करण्यासाठी नव्याण्णव आस्तिकांच्या साक्षी त्या संशोधकास मिळतील. यावरून मानवजातीमध्ये आस्तिकता व्यापक आहे, असे सिद्ध करू इच्छिणाऱ्यांचे प्रयत्न निरर्थकच दिसून येतात.

हा आक्षेप वरवर पाहता प्रबळ दिसत असला तरी वास्तविक पाहता तेवढा प्रबळ नाही. या अगोदर अतिव्याप्ती, अव्याप्ती दोषांनी रहित असलेल्या धर्माचे वर्णन आम्ही केले आहे.

मनुष्याचा स्वतःपेक्षा उन्नत, श्रेष्ठ, अदृष्ट अशा शक्तीमध्ये असणारा विश्वास व त्या विश्वासामुळे प्रभावित होऊन केला जाणारा व्यवहार 'धर्म' आहे. या व्याख्येतील पूर्वभाग, अदृष्ट अशा महान शक्तीवर विश्वास ठेवणे, ही आस्तिकता आहे, असे सांगतो. या व्याख्येची चिकित्सा केली तर संपूर्ण मानवजात ही आस्तिकच आहे, असे दिसून येईल. एका धार्मिकाचा दुसऱ्या धार्मिकास नास्तिक म्हणण्यामागे वेगळाच हेतू आहे. तो स्वतः आचरण करीत असलेल्या किंवा स्वीकार करीत असलेल्या विषयांचाही समावेश 'आस्तिकता' शब्दाच्या अंतर्गत करतो. आपल्या लिहिण्या- बोलण्यामध्ये एखाद्या शब्दाचा विशिष्ट अर्थ घेण्याचा अधिकार प्रत्येक व्यक्तीस आहे. उदाहरणादाखल : जगातील निकृष्ट व्यक्तींनासुद्धा सर्वसाधारणपणे 'मनुष्य' शब्दानेच संबोधिले जाते. पण जर 'मनुष्य' शब्दाचा 'विचारशील' असा अर्थ गृहित धरून, त्या विचारशील शब्दाचाही एक विशेष अर्थच घेतला तर जगात चार- दोन मनुष्यच सापडतील. उरलेल्यांना कोणत्या नावाने संबोधित करावे, हा मोठा प्रश्न होईल.

दुसरा आक्षेप हा आहे की ,' जर खरोखर 'आस्तिकता' एवढी सर्वव्यापक बाब असेल तर आस्तिकांनी पाय पसरून झोपावयास पाहिजे. नास्तिकांचा प्रतिकार करण्याची त्यांना काय आवश्यकता? आस्तिकतेच्या प्रसारासाठी हा उपद्व्याप करण्याचे कारण तरी काय?' या आक्षेपाचे एक उत्तर एका अर्थाने मागे देण्यात आले आहे. मानवजातीमध्ये आस्तिकता बीजरूपामध्ये (सूक्ष्मरूपामध्ये) अस्तित्वात आहे, असे आमचे मत आहे. यासाठी ऐतिहासिक पुरावेही भरपूर मिळू शकतात. पण आस्तिकतेची अभिव्यक्ती वेगवेगळ्या ठिकाणी, वेगवेगळ्या

पद्धतीने झाली आहे. अग्नी सर्वत्र असला तरी उपयोगासाठी विशेष परिस्थिती आवश्यक आहे. आम्ही लिहिण्यासाठी वापरत असलेल्या कागदामध्ये सुध्दा अग्नी आहे. पण या अग्नीद्वारे अन्न शिजविता येत नाही. अशाच प्रकारे 'माझ्यापेक्षा श्रेष्ठ आणि अदृश्य शक्ती जगामध्ये आहे' असा भाव प्रत्येकात आढळतो. पण तोच भाव (भावना) वेगवेगवेगळया व्यक्तींमध्ये वेगळया स्वरूपात दिसून येतो. ती शक्ती काय आहे? तिचे गुण कोणते? तिचा स्वभाव कसा आहे? आमच्या कार्यावर त्या शक्तीचा कोणता व कसा प्रभाव पडतो? त्या शक्तीचा आमच्याशी कोणता संबंध आहे? त्या शक्तीस संतुष्ट करण्याची आवश्यकता आहे की नाही? या प्रश्नांविषयी वेगवेगळी मते आहेत. या मतभेदांमुळेच आस्तिकांमध्ये एकदुसऱ्याविषयी आपुलकी, प्रेम उत्पन्न होण्याऐवजी वैर- विरोध उदयास येत आहे. एक आस्तिक त्या शक्तीस संतुष्ट करण्याकरिता गायीचा बळी द्यावा, असे म्हणतो; दुसरा मनुष्याचासुद्धा बळी द्यावा, असे म्हणतो. 'जाणीवपूर्वक जर तू एखाद्या मुंगीची हत्या केलीस तर ती शक्ती तुझ्यावर रुष्ट होईल' असे तिसरा म्हणतो. ती शक्ती अदृश्य आहे म्हणून आम्ही त्या शक्तीच्या काल्पनिक मूर्ती तयार करू व त्यांची पूजा करू, आमचे सर्व काही तिच्या चरणी अर्पण करू', असे एक म्हणतो, तर दुसरा 'त्या अदृश्य शक्तीची मूर्ती बनवून तिच्यासमोर डोके झुकविणे हे महापाप आहे' असे म्हणतो. एवढी भिन्न-भिन्न मते का आहेत? त्या अदृश्य शक्तीविषयी अनेकांचे अनेक प्रकारचे विचार असणे हेच त्या विभिन्नतेचे कारण आहे. त्या शक्तीपासून सुटका होणे शक्यच नाही. ती शक्ती सूक्ष्मरूपामध्ये सर्वांच्या हृदयात वास करीत आहे.

नास्तिकांच्या व्यवहाराकडे पाहा. ते एका आस्तिकांच्या विचाराधारे दुसऱ्या आस्तिकांना शह देण्याचा प्रयत्न करतात. अशाप्रकारे तरी आस्तिकतेपासून सुटका होईल असे त्यांना वाटते. पण आस्तिकता मात्र त्यांचा मृत्यूपर्यंत पाठपुरावा करीतच असते. त्यांनी त्यांच्या जीवनामध्ये 'आमच्यापेक्षा श्रेष्ठ, उन्नत शक्ती विश्वामध्ये दुसरी कोणतीच नाही, अशी कितीही फुशारकी मारली तरी मृत्यू समोर उभा राहिला म्हणजे आपल्या इच्छेविरुद्ध शरीर, संपत्ती, कुटुंब सर्व काही सोडून जाणे भाग पडते. तेव्हा ते 'आपल्यापेक्षा उन्नत शक्तीचा स्वीकार करतात. आणि असेही अनुभवतात की, या शक्तीच्या तावडीतून, प्रभावातून कधीच कुणाचीही सुटका होणे शक्य नाही. ब्रिटनचे नागरिक असलेले नास्तिकांमध्ये प्रमुख असलेले **'ब्रेडला'** यांनी 'ॲनी बेझन्टच्या साहाय्याने एक **'नास्तिकता प्रचारिणी सभा'** स्थापिली. मृत्युशय्येवर त्यांना 'मी कोणत्यातरी अदृष्ट शक्तीकडे ओढला जात आहे' असा अनुभव आला. त्यांना अगोदरच- जिवंत असतानाच या शक्तीचा अनुभव आला असता तर ते त्या शक्तीसंबंधी अधिक विचार करू शकले असते. दुर्दैव असे की जेव्हा ते काहीच करू शकत नव्हते तेव्हा शेवटच्या क्षणी - त्यांना हा अनुभव आला.

आस्तिकांच्या परस्परकलहामुळेसुद्धा नास्तिकतेचा बराच प्रचार झाला. पण सत्य-असत्याचा विचार न करता दोषारोपण करणे हे बुद्धिवंतांचे कर्तव्य नव्हे. मी लिहीत असलेल्या पेनची 'निब' चांगली नसल्यामुळे अक्षर वळणदार येत नसेल तर 'निब'ची अदलाबदल करणे योग्य आहे; पण

पेन फेकून देणे ही बुद्धिमत्ता आहे काय? म्हणून आस्तिक ज्या चुकांमुळे कलह व संघर्षास जन्म देत आहेत त्या चुका दूर करणे आवश्यक आहे. रोगनिवारणाचा उपाय रोग्यास मारणे हाच आहे, असे सांगणाऱ्या चिकित्सकापेक्षा अधिक अज्ञानी दुसरा कोण असू शकेल.

धार्मिकता, आस्तिकता या दोन्ही मानवजातीत बीजरूपात आस्तित्वात आहेत, हे वरील विवेचनाद्वारे दाखविण्याचा प्रयत्न केला. 'आस्तिकता' सत्य आहे; भ्रामक नाही, काल्पनिक नाही, हे पुढील प्रकरणात पुराव्याआधारे स्पष्ट केले जाईल.

❑❑❑

# अध्याय : दुसरा

## मनुष्य अल्पज्ञ आहे

काउण्ट टॉल्स्टॉयनी आपल्या 'धर्म काय आहे' ('What is Religion') या पुस्तकात 'अनंत शक्तीच्या तुलनेत मनुष्य तुच्छ, क्षुद्र आहे ही बाब सर्व धर्मांचे अनुयायी स्वीकारतात' असे लिहिले आहे.

'Every Religion regards'Men' as equally insignificant compared to infinity'

नास्तिकांना हे वाक्य कटु वाटेल. अंशतः असे वाटणे चूकही नाही. आत्मगौरव, स्वाभिमान बाळगणारा मनुष्य इतरांपेक्षा स्वतःस तुच्छ का समजेल? धर्माने मानवास षंढ, नपुंसक बनविले आहे, असा आरोप बरेच जण करतात. 'मनुष्य तुच्छ आहे, ईश्वरावर त्याचा विश्वास असावयास पाहिजे, अशीच धर्माची पहिली शिकवण आहे. अशा शिक्षणाच्या परिणामामुळेच आपल्या तुच्छतेविषयी विचार करीत हळूहळू मनुष्य तुच्छच होतो आणि जीवनात कधीच, कोणतेच मोठे कार्य करू शकत नाही. आम्ही सर्व काही करू शकतो, असे समजणारेच साहसाने सर्व अडी-अडचणींवर मात करीत पुढे वाटचाल करतात.

आम्ही या विचाराशी पूर्णपणे सहमती व्यक्त करीत नाही. खरे पाहता, मनुष्य आपले स्वाभाविक सामर्थ्य न ओळखता जसे दुःख, कष्ट अनुभवतो, तसे अधिक सामर्थ्याचा भ्रम बाळगण्यामुळेही संकटांना तोंड द्यावे लागते. तुटपुंज्या संपत्तीद्वारे लक्षाधीशाचे स्वप्न पाहणाऱ्या व्यक्तीच्या दुरवस्थेची कल्पना केली जाऊ शकते. म्हणून आत्महीनता (न्यूनगंड) आणि मिथ्याभिमान (अहंगड) या दोन्हींचा त्याग करून वास्तविक सामर्थ्याची ओळख माणसाने करून घेतली पाहिजे. शक्तीपेक्षा कमी काम केल्यानेही हानी होते. माणसास स्वतःच्या बळाचे ज्ञान होणे अतिशय आवश्यक व योग्य आहे.

वरवर पाहता जगात दोन प्रकारच्या वस्तू आढळतात. एक चेतन, दुसरी जड (अचेतन). चेतनापेक्षा अचेतन हे दुर्बळ असते. लहान-सहान मुंग्या मातीच्या मोठमोठ्या ढिगांना पोखरतात. पर्वतामध्ये भेगा पाडणारे किडेही आकाराने नगण्यच असतात. मोठ-मोठ्या वृक्षांना हलवणाऱ्या पक्षांचा आकार तरी किती असतो? यावरून जेथे चैतन्य आहे तेथे शक्ती, सामर्थ्य आहे असे दिसते. अचेतनात बळ नाहीच. चेतनाच्या साहाय्यानेच ते गतिमान होतात. घोडा गाडीस ओढतो म्हणून बळ घोड्यात आहे, गाडीत नाही. अचेतन शरीरसुद्धा चेतनाच्याच साहाय्याने चालते. मृत हत्तीपेक्षा जिवंत मुंगी बलवान आहे.

चेतनामध्ये इतर प्राण्यांपेक्षा मनुष्याची शक्ती बहुमुखी आहे. इतर सर्व चेतनांस मनुष्याने आपल्या स्वाधीन करून ठेवले आहे. एक लहान मुलगा हत्तीच्या पाठीवर बसून त्यास चालवू शकतो. सिंहासारख्या क्रूर प्राण्यांनासुद्धा माणसाने वश केले आहे. ते सुद्धा मनुष्याच्या संकेतांवर

चालतात, तेव्हा लहान प्राण्यांची काय कथा? विविध प्रकारच्या अचेतन शक्तींवर मनुष्य अधिकार गाजवितो. पाण्याद्वारे तहानच भागविली जात नाही, तर नौका-विहार, वीज-निर्मिती अशा उपयोगांद्वारे सुखामध्ये भर घातली जात आहे. अग्नी, वायू सर्व काही मानवाच्या सेवेकरिता तत्पर आहे. रेल्वे, टेलिफोन, विमाने, जहाज ही सर्व मानवशक्तीची सूचक- द्योतक आहेत. इतर चेतन पशु-पक्षीसुद्धा सृष्टीत बरेचसे परिवर्तन घडवून आणतात. तरी पण मनुष्याद्वारे केले जाणारे परिवर्तन आश्चर्यकारक असते. सिंह राजा असला तरी जन्माच्या वेळी जंगलामध्ये असलेली स्थिती त्याच्या मृत्युसमयीही तशीच असते. तीत तो कोणताही बदल करीत नाही. याउलट मानव सृष्टीचे स्वरूप बदलून टाकतो. माणसाने समुद्र ओलांडले, पर्वत फोडले, नद्यांवर पूल बांधले, त्यांचे प्रवाह बदलले, ओसाड प्रदेशात शहरे वसविली, वाळवंटात पाण्याचे पाट वाहविले, बेटांवर मनुष्यवस्ती केली. जगाच्या कानाकोपऱ्यात मानवशक्तीने केलेला लक्षणीय बदल पदोपदी दिसून येत आहे. त्याच्याशी तुलना केली जाईल अशी दुसरी कोणती शक्ती आहे? आपल्या शक्तीकडे जेव्हा मनुष्य पाहतो तेव्हा त्याची छाती अभिमानाने भरून येते. त्याच्याशी बरोबरी करणारा कोणीच नाही, असे तो समजतो, तोच सृष्टिकर्ता. तो सर्व काही करू शकतो. सर्व काही त्याच्या अधिकाराखाली आहे, असे तो समजतो.

वास्तविक पाहता अशा प्रकारचा समज मनुष्याची फार मोठी चूक आहे. इतर प्राण्यांपेक्षा मनुष्यामध्ये अधिक ज्ञान आहे. तरी पण प्रत्येक बाबतीत विश्वातील संपूर्ण शक्तींच्या अवलोकनानंतर मनुष्याची शक्ती अल्पच आहे, असे दिसून येते. मनुष्याचे स्वामित्व, मालकी ही फार मर्यादित आहे. त्याच्या ज्ञानाची एक मर्यादा आहे. त्याचे पराक्रमही एका मर्यादेचे अतिक्रमण करू शकत नाहीत.

प्रथम आम्ही शारीरिक दृष्टिकोनातून विचार करू. जगातील बलिष्ठ प्राण्यांमध्ये मनुष्याची गणना होऊ शकत नाही. अनेक प्राणी त्याच्यापेक्षा अधिक शक्तिसंपन्न आहेत. मनुष्याच्या इंद्रियांचीही शक्ती स्वल्पच आहे. तो घारी , गिधाडाप्रमाणे दूरवर पाहू शकत नाही. हरणासारखे पळू शकत नाही. हत्तीप्रमाणे ओझे वाहून नेऊ शकत नाही. अशा स्थितीमध्ये तो डोळयांच्या मदतीने जेवढे पाहत आहे त्यामुळे होणारे ज्ञानही अत्यल्पच आहे. अनेक प्रकारच्या आकृत्या, अनेक प्रकारचे रंग तो पाहू शकत नाही. अनेक प्रकारच्या शब्दांना तो ऐकू शकत नाही. ज्या ज्ञानाच्या आधारावर बलिष्ठ प्राण्यांनासुध्दा स्वतःचा दास बनवीन असा अभिमान मनुष्य करीत आहे. आणि खूप दूरवर स्वतःचा शक्तीवर विस्तार करण्याचा विचार करीत आहे, त्या ज्ञानाधारेदेखील मनुष्याला सर्वज्ञ किंवा बहुज्ञ म्हणता येणार नाही. मनुष्याचे ज्ञान अत्यल्प आहे. तो जेवढे जाणू इच्छीत आहे किंवा जाणत आहे त्यापेक्षा कितीतरी पटींनी अधिक जाणावयाचे शिल्लक आहे. एखाद्या सखोल प्रदेशामध्ये उभे राहून चोहीकडे दृष्टी वळविल्यानंतर त्यास दिसणाऱ्या क्षितिजासच तो जगाची सीमा समजतो. पण जस-जसा तो उंच ठिकाणाकडे वाटचाल करतो तस-तशी क्षितिजाची विशालता त्यास कळून येते. मनुष्य जस - जसे अधिक ज्ञान

मिळवतो तस-तशी अज्ञात विषयाचा विस्तार त्याच्या लक्षात येतो. प्राथमिकचा विद्यार्थी वर्णमाला हीच विद्येची पूर्णता समजतो. लहानसे पुस्तक वाचताच मी विद्वान होईन किंवा झालो असेच त्याला वाटते. पण विद्यापीठातून बाहेर पडलेला युवक आपल्या ज्ञानाचा तोकडेपणा निश्चित ओळखतो. न्यूटन म्हणत असे, ''ज्ञानाचा अगाध , विस्तृत समुद्र माझ्यासमोर आहे, मी त्याच्या किनाऱ्यावरील वाळूच्या कणांना वेचत आहे.''

उपनिषदांचे ऋषी म्हणतात ते सत्यच आहे. 'अविज्ञातं विजानतां विज्ञातमविजानताम्' बुध्दिवंतासाठी अज्ञात आहेः आणि मूर्खासाठी ज्ञात आहे. जगातील प्रत्येक मूर्ख संपूर्ण ज्ञानातील अर्धा भाग त्याच्याजवळ, उरलेला अर्धा इतरांजवळ आहे, असे समजतो. पण विविध विषयांमध्ये तरबेज असणाऱ्यांना विचारून पाहा, ते काय म्हणतात? प्रत्येक बुद्धिमान आम्हांस आमच्या शास्त्राविषयी फारच थोडे माहीत आहे, असे म्हणत नाही काय? यशस्वी मनोवैज्ञानिकांना विचारून पाहा. ते काय म्हणतात? 'मी आणि माझ्या पूर्वजांनी हजारो वर्षांच्या प्रयासाने मनाविषयी बरेचसे ज्ञान मिळविले. पण मिळवण्याजोगे अजूनही पुष्कळ शिल्लक राहिले आहे.' असेच म्हणतात. पूर्वीच्या वैद्यांनी केलेल्या संशोधनाच्या आधारावर आपले संपूर्ण आयुष्य पणास लावूनही त्यांना शरीरासंबंधी झालेले ज्ञान फारच थोडे आहे, असे नामांकित चिकित्सक म्हणतात. प्रत्येक चिकित्सकाच्या जीवनात एखादा रोग असा येतो जो त्याच्या ज्ञानाला आव्हान देऊन जातो. त्याला त्याच्या अज्ञानाची जाणीव करून देतो. त्याने मिळविलेले ज्ञान अर्धवट आहे, असे त्यास जाणवते. शरीरातील हजारो अवयवांच्या हालचालींबाबत शरीरविज्ञानाला अजूनही बरेचसे कळत नाही. अशीच परिस्थिती इतर शास्त्रज्ञांची आहे. मनुष्याच्या अज्ञानाला काही मर्यादा नाही. एक शास्त्रवेत्ता इतर शास्त्रांत अज्ञानी किंवा अल्पज्ञ आहे, असे समजल्यावर आमच्या आश्चर्याला काहीच सीमा राहत नाही. वनस्पतिशास्त्र जाणणाऱ्यास मानवाच्या डोळ्यांविषयी काहीच ज्ञान नसते आणि एक गणितज्ञ वनस्पतिशास्त्राचे मुळीच ज्ञान बाळगत नाही. मानवजातीशी संबंधित सर्व विभागांविषयी विचार करू शकणारी एखादी व्यक्ती वेळूची टोपली तयार करू शकत नाही. खगोलविद्येचा ज्ञाता स्वतःस कष्ट देणाऱ्या एका व्रणाची औषधी जाणत नाही. अशा स्थितीत माणसाचे ज्ञान अमर्यादित आहे, असे कसे म्हणता येईल? ही उदाहरणे ज्ञानाच्या वाढीसाठी सबंध जीवन समर्पित करणाऱ्या महोदयांची आहेत. अमेरिकेचे ख्यातनाम शिक्षणतज्ज्ञ हर्बर्ट स्पेंसर यांनी ॲरिस्टॉटलपासून आधुनिक वैज्ञानिकांपर्यंत मिळविलेले सर्व ज्ञान आत्मसात केले होते, असे म्हणतात. पण हर्बर्ट स्पेंसर, ते स्वतः किती अल्पज्ञ होते ते त्यांच्या साक्षीवरूनच दिसून येते. कोट्यावधी व्यक्तींपैकी एखाद्या बुद्धिमंताने आपल्या सबंध आयुष्यात अर्जित केलेले ज्ञान सृष्टीमध्ये असलेल्या ज्ञानाच्या अल्पांशसुद्धा नसताना, मनुष्यास स्वतःच्या ज्ञानाविषयी घमेंड, मिथ्याभिमान बाळगण्याचा काय अधिकार आहे? मानवापेक्षा अधिक बुद्धिसंपन्न दुसरा कोणीही नाही, असे असताना सर्व प्राण्यांचा शिरोमणी असलेल्या मानवजातीतील सर्वश्रेष्ठ व्यक्तींची ही स्थिती असेल तर मानव अल्पज्ञ आहे या बाबतीत दुमत बाळगण्याचे कारणच नाही. एवढेच नव्हे

तर देश, काळ यांच्या अनंततेविषयी विचार केला तर आश्चर्यामध्ये भरच पडते. उच्च कोटीच्या वैज्ञानिकालादेखील दुसऱ्या क्षणी काय घडणार आहे हे कळत नाही. एवढे कशाला? त्याच क्षणी त्याच्या पाठीमागे काय चालते आहे हे त्याला कळत नाही. हजारो रोग्यांच्या रोगांना दूर करण्याचा विडा उचलणाऱ्या उच्च कोटीच्या वैद्यास त्याच्या हृदयाची स्थिती किंवा फुफ्फुसांची अवस्था काय आहे किंवा कोणता रोग मूळ धरत आहे हे कळत नाही.

मनुष्याचा पराक्रमसुद्धा त्याच्या ज्ञानानुकूलच आहे. मानवाने निसर्गामध्ये अनेक प्रकारचे बदल घडवून आणले, यात मुळीच संदेह नाही. पण कोणाच्या बळावर? जगातील वस्तू पाहून त्यांची नक्कल केली, अनुकरण केले, एवढेच ना! अनुकरणसुद्धा प्रत्येक जण करू शकत नाही. काही ठराविक बुद्धिमानच करू शकतात. तरी पण ते तेवढ्यानेच प्रशंसेस पात्र होतात. नक्कल किंवा अनुकरण न करता मनुष्याने अशी कोणती वस्तू बनविली किंवा असे कोणते कार्य केले जे अगदीच नवीन आहे. मनुष्याने चांगली घरे बांधली असे म्हणाल तर, त्याचे ज्ञान करवून देणारा 'बयानामी' नावाचा प्राणी अगोदरच विद्यमान होता. गांधीलमाशीची पोळी पाहा किंवा मधमाशीची पोळी पहा. मनुष्याला स्वतःच्या पराक्रमावर, नैपुण्यावर शरमेने मान खाली घालावी लागेल. लोकांच्या नजरेस फसवणाऱ्या एखाद्या सुंदर आंब्याची निर्मिती मातीने किंवा कागदाने एखाद्या चित्रकार करतो. ते पाहून आंबा बनवणाऱ्यास पारितोषिके दिली जातात. त्याच्यावर स्तुती-सुमनांचा वर्षाव केला जातो. त्याच्या योग्यतेचे पोवाडे गायिले जातात. ही सगळी उठाठेव कशासाठी? तो एका नैसर्गिक वस्तूची अनुकृती तयार करू शकला. ती अनुकृतीसुद्धा फक्त आकृतीच आहे. आंब्यामध्ये असणारा सुवास, रुची ही त्याच्या निर्मितीच्या आवाक्याबाहेरच्या आहेत. जगामध्ये वैज्ञानिक दररोज नव-नवी संशोधने करीत आहेत. त्यासाठी त्यांची प्रशंसा होत आहे. पण विचार तरी करा. आविष्कार म्हणजे तरी काय आहे? एखाद्या व्यक्तीने एखाद्या प्राकृतिक वस्तूची नक्कल करून किंवा अनुकरण करून त्या वस्तूसारखी किंवा अंशतः साम्य असलेली एखादी वस्तू तयार केली. एवढेच ना! मनुष्याने स्वतःच्या कला-कौशल्याचा अभिमान बाळगू नये, असे आमचे म्हणणे नाही. वैज्ञानिक व संशोधक खरोखरच पूजनीय आहेत. ते मानवाच्या सुखासाठी, ज्ञानासाठी अहोरात्र परिश्रम करीत आहेत. पण त्यांचे अभिमान बाळगणे हेच त्यांच्या अल्पशक्तीचे, सामर्थ्याच्या तोकडेपणाचे द्योतक आहे. एक लहान मुलगा शाळेत शिकण्यासाठी जातो. त्याच्या पाटीवर गुरुजी काहीतरी लिहून देतात. तो मुलगा त्या अक्षरांना पाहून तशीच अक्षरे लिहिण्याचा प्रयत्न करतो. जे अक्षर तो लिहितो ते गुरुजींच्या अक्षरापेक्षा कितीतरी निकृष्ट असते. पण तो बालक गुरुजींच्या अक्षरासारखेच अक्षर 'मी लिहीत आहे' हे पाहून त्याला त्याच्या प्रत्येक अक्षराविषयी अभिमान वाटतो. एखाद्या वेळी त्या मुलाने गुरुजींच्या अक्षरापेक्षाही वळणदार, सुंदर अक्षर काढले तरी तो स्वतःस गुरुजींपेक्षा श्रेष्ठ समजू शकत नाही. तसे समजणे न्यायोचितही नाही. कारण, तो गुरुजींच्या अक्षराचे अनुकरण करूनच तर शहाणा झाला. गुरुजींच्या अक्षरासारखे अक्षर काढणे हेच त्याच्या अभिमानासाठी पुरेसे आहे. याच धर्तीवर जगातील उच्च कोटीचे आविष्कारक

प्रशंसनीय व पूजनीय असले तरी ते सर्वज्ञ झाले किंवा बहुज्ञ झाले असा कोणताच अभिमान त्यांना बाळगता येणार नाही. तो स्वतः सर्वज्ञ किंवा बहुज्ञ आहे, अशी प्रतिज्ञा करणारा बुद्धिहीन वैज्ञानिक किंवा आविष्कारक जगामध्ये नाहीच, असा आमचा विश्वास आहे.

प्राकृतिक शक्तींना वशीभूत करण्याचा प्रयत्न मनुष्य नेहमीच करीत राहिला आणि तो त्यांच्याकडून पराजितही होत राहिला असे एक वैचित्र्य मानवी जीवनाच्या इतिहासाचे निरीक्षण करताना दिसून येईल. जग हे एक कुस्तीचे मैदान आहे. अनेक प्रकारच्या प्राकृतिक शक्ती माणसाला युद्ध कसे करावे हे शिकवतात. मोठा कुस्तीगीर लहानांना डावपेच शिकवितो. केव्हा केव्हा खाली पडतो. शिष्यांना प्रोत्साहित करण्यासाठी स्वतःच्या अल्प बळाचाच वापर करतो. तसे केले नाही तर कोणताही शिष्य कुस्ती शिकू शकणार नाही. पण जर एखाद्या शिष्याने स्वतःस गुरुपेक्षा श्रेष्ठ समजले तर ताबडतोब त्याचा पाणउतारा होतो, त्याचा अहंकार मातीमोल होतो. हीच अवस्था मनुष्याची आहे. त्याने नेहमी प्राकृतिक शक्तींचे अनुकरण केले. त्यांच्यावर विजय मिळवावा, असे त्यास वाटले. प्राकृतिक शक्तींनी त्याची मदत केली, त्याचे धैर्य वाढविले. नद्यांच्या प्रवाहांना बदलावे, असे मनुष्यास वाटले. नद्यांनी त्याच्या इच्छेचे अनुगमन केले. अटकाव करणाऱ्या पर्वतांना फोडावे असे त्याला वाटले, पर्वतांनी आपले काठिण्य नष्ट केले. हवेच्या साहाय्याने यंत्र चालवावे असे त्यास वाटले, हवेने त्यास मदत केली. पण संपूर्ण प्राकृतिक शक्ती वशीभूत झाल्या, अशा अहंकाराने जेव्हा मनुष्याची छाती फुगून आली तेव्हा मात्र त्या शक्तींनी मनुष्यास असा धडा शिकविला की तो अवाक्, हताश, निराश होऊन पाहतच राहिला. त्याची दातखिळीच बसली.

उच्च कोटीच्या बुद्धिमान चिकित्सकांनी शरीराचे पूर्ण परीक्षण करून, औषधांचा शोध लावून मानवास निरोगी व दीर्घायुषी करण्याचा प्रयत्न केला. ते अनेक वेळा अनेक दुर्धर रोगांच्या प्रतिकारामध्ये यशस्वीसुद्धा झाले. पण ते मानवास अमरत्वापर्यंत पोहचवू शकले नाहीत. मृत्यू समोर उभा असताना चिकित्सक डोळे विस्फारून पाहण्यापेक्षा दुसरे काहीच करू शकले नाहीत. गर्भश्रीमंताचे धनही एका क्षणाचे अधिक जीवन देऊ शकले नाही. हे सर्व कशाचे द्योतक आहे? मानवाला निसर्गाने शिकविलेला हा धडाच आहे. त्यांच्या अहंकाराच्या फुग्याला फोडणारा, त्याला त्याच्या अल्प सामर्थ्याची जाणीव करून देणारा आहे. एकदा एका वर्तमानपत्रात असा प्रश्न विचारण्यात आला होता की, 'ईश्वर केव्हा हसतो? When does the lord smile?' एखादा वैद्य एखाद्या रुग्णाची तपासणी करीत असताना 'भिऊ नको, मी तुला रोगातून वाचवतो असे 'जेव्हा म्हणतो 'तेव्हा ईश्वर हसतो' असे त्या प्रश्नाचे उत्तर आहे. खरोखरच हसण्यासारखी बाब आहे. स्वतःच्या रोगाच्या निवारणाची खात्री नसलेला वैद्य दुसऱ्याच्या रोगनिवारणाची खात्री कशी देऊ शकतो? 'तुझा रोग बरा होईल असा प्रयत्न मी करीन' असे तो म्हणू शकतो. प्रयत्न करण्यापेक्षा अधिक मनुष्य करू तरी काय शकतो? त्यापेक्षा जास्त त्याच्या हातामध्ये आहे तरी काय? रोगी वारल्यानंतर स्वतःचा मोठेपणा टिकविण्यासाठी काहीतरी ढोंग करून रुग्णांच्या

बांधवांना फसवणारे डॉक्टर काय कमी आहेत? त्यांना आम्ही जाणतोच. शतकानुशतकापासून मृत्यूतून मानवाची सुटका करण्याचे कितीतरी प्रयत्न वैद्यांनी केले; पण ते यश मिळवू शकले नाहीत. हे सर्व पाहता मानवाच्या अल्पज्ञतेविषयी कोणत्याही प्रकारच्या शंकेचा मागमूसही शिल्लक राहत नाही. तो ज्ञान व शक्तीमध्ये तोकडा (अल्प) आहे हे खात्रीपूर्वक सिद्ध होते.

आता विश्वविजेत्यांवर एक दृष्टी फेका. त्यांचा विचार करा. प्रारंभी त्यांची शक्ती किती होती? 'सिकंदर' एक लहान मुलगा होता. जग जिंकावे असे त्यास वाटले. त्याने अनेकांचा पराभव केला. युवावस्थेच्या प्रारंभीच संबंध जगावर राज्य करण्याची इच्छा त्याच्या मनात उद्भवली. स्वतःच्या उद्दिष्टांच्या पूर्तीसाठी मुळीच वेळ लागणार नाही, असे त्यास वाटले. पण थोड्याच कालावधीत तो स्वतःच्या सामर्थ्याची क्षुद्रता ओळखू शकला. एवढेच नव्हे, तर स्वतःच्या उद्देशाची पूर्ती न करताच येथून त्याला महाप्रयाण करावे लागले.

कार्थेजचा प्रसिद्ध विजेता हानिबल (Hannibal) यांचीसुद्धा अशीच स्थिती होती. तारुण्याच्या उंबरठ्यावर असतानाच रोमन साम्राज्यास हिसका दाखवणे हे त्याचेच कार्य होते. पण प्राकृतिक शक्तीच्या मिठीतून सोडवणूक करून घेणे त्यालाही शक्य झाले नाही. 'असंभव'-'अशक्य' हा शब्द मूर्खांच्याच शब्दकोशात आढळतो, असे आवर्जून सांगणाऱ्या वीर नेपोलियनला राज्य तर सोडाच पोटाची खळगी भरण्यापुरती भाकर मिळवणेही कठीण होऊन बसले. सृष्टी किती विचित्र आहे! तिच्या शक्ती किती अपार आहेत! मानव एका शक्तीस स्वाधीन बनवण्याचा प्रयत्न करीत असतानाच कुठून तरी अनेक शक्ती पुढे सरसावतात आणि त्यालाच वश करून घेतात. तो अवाक् होतो. अगतिक होतो, बधिर होतो. काल-परवाच घडलेली घटना. आम्ही पाहिलेली. इ.स.१९१४ मध्ये जर्मनीच्या सम्राट कैसरनी दिग्विजय करण्याचा विचार केला. शत्रूंच्या नगरात प्रविष्ट होण्याची तिथीसुद्धा निश्चित केली गेली. जणू जगाच्या व्यवहाराची मक्तेदारीच कैसरनी घेतली होती! जगातील उच्च कोटीच्या वैज्ञानिकांनी साहाय्य केले. त्यांच्या अन्वेषणाआधारे हजारो व्यक्तींना क्षणार्धात फुटाण्यासारखे भाजून काढले. जगामध्ये कैसर किंवा केवळ त्याची आज्ञा मिळवलेलेच राहू शकतील, असेच जणू वाटत होते. पण नैसर्गिक शक्तींनी दुसराच विचार केला होता. काही दिवसांतच कैसरला त्याच्या अल्प सामर्थ्याची जाणीव करून देणारा क्षण उगवला. त्याला स्वतःच्या अहंकारावर पश्चात्ताप करावा लागला.

वैज्ञानिकांच्या आविष्कारांचीसुद्धा हीच स्थिती आहे. टाइटनिक (TITANIC) जहाजाची कथा वाचलेल्यांना निश्चितच मानवाच्या अल्प सामर्थ्याची जाणीव झाली असेल. हे जहाज इ.स. १९१२ मध्ये इंग्लंडच्या साउदंप्टन बंदरात बनविले होते. यापूर्वी एवढे विशाल जहाज तयार झाले नव्हते. या जहाजाच्या निर्मितीसाठी तीन वर्षांचा दीर्घ काळ लागला. त्या काळातील नावाजलेले नाविक कॅप्टन स्मिथ यांच्या देखरेखीखाली या जहाजाची बांधणी झाली. यांची लांबी १००० फूट व समुद्रापासून उंची १६४ फूट होती. हे जहाज समुद्रात बुडूच शकणार नाही, असा निर्मात्यांचा दावा होता. त्यांनी या विषयी अधिकाराने सांगितले होते. १० एप्रिल १९१२ रोजी हे जहाज

साउदंप्टन बंदरातून २३५८ यात्रेकरूंना घेऊन न्यूयॉर्कला रवाना झाले. कधीच न बुडणाऱ्या जहाजामध्ये बसण्याचे भाग्य लाभले म्हणून यात्रेकरूंच्या हृदयामध्ये हर्षाच्या लाटा उचंबळून येत होत्या. विज्ञानाने आविष्कृत केलेल्या अत्याधुनिक साधनांचा प्रयोग त्याच्या निर्मितीसाठी केला होता. सर्व साधनांद्वारे परीक्षण करण्यात आले. समुद्रात उद्भवणाऱ्या अडचणींचा, विघ्नांचा प्रतिकार करण्यास टाइटनिक समर्थ आहे, असा निर्वाळा दिला. यात्रा तीन दिवस सुखरूप पार पडली. न्यूयॉर्क गाठण्यासाठी केवळ २४ तासांचा अवधी उरला होता. जहाज रेल्वेच्या वेगाने धावत होते. यात्रेकरू निश्चिंत मनाने साखरझोप घेत होते. अमेरिकेचे नागरिकसुद्धा आमच्या जहाजाची विशालता आणि मजबूती पाहून प्रशंसा केल्याशिवाय राहणार नाहीत, या विचाराने कॅप्टन स्मिथ व त्यांच्या सहकाऱ्यांची छाती अभिमानाने भरून येत होती. पण, 'माणसाचा विचार एक, तर देवाचा दुसराच' ही म्हण शेवटी सार्थ झाली. मनुष्याच्या अहंकाराला मातीमोल करावे असेच निसर्गाला वाटले की काय कोणास ठाऊक? अचानक रात्रीच्या वेळी जहाजाला एक धक्का बसला. तो धक्का फारच अल्प स्वरूपाचा. कोणत्याच यात्रेकरूला त्या धक्क्याची जाणीव झाली नाही. पण, कॅप्टन स्मिथचे डोके भडकले. आता जहाज वाचत नाही, नक्कीच बुडणार असे त्यास कळून चुकले. आणि घडलेही तसेच. कितीही प्रयत्न केले तरी जहाजात पाणी शिरण्याचे काही थांबेना! एक हिमनग समुद्रात हळूच एका दिशेकडून दुसऱ्या दिशेकडे गेला. जणू तो एक विशाल पर्वतच होता. म्हणूनच त्याच्या एका हळुवार धक्क्यानेच टाइटनिकसारख्या विशाल जहाजालासुद्धा एक छिद्र पडले. कॅप्टन स्मिथ आणि इतर अधिकाऱ्यांनी जवळून यात्रा करणाऱ्या नौकांना, जहाजांना 'वायरलेस टेलिग्राम'च्या साहाय्याने 'टाइटनिक समुद्रात बुडत आहे, रक्षणासाठी यावे' असा संदेश पाठविला. पण बऱ्याच उशिरा केवळ कारपेथिया नावाचे एक जहाज येऊ शकले आणि ते केवळ ७०३ यात्रेकरूंचा जीव वाचवू शकले. कॅप्टन व त्यांच्या सहकाऱ्यांनी पराक्रमाची शर्थ केली. स्त्रियांना व बालकांना वाचविण्याचा आटोकाट प्रयत्न केला. ते स्वतः मृत्यूस हसतमुखाने सामोरे गेले. कर्तव्याच्या पूर्ततेतच जीवनाची सार्थकता त्यांनी अनुभवली आणि ते कीर्तिरूपाने अमर झाले.

ही आहे त्या 'टाइटनिक' जहाजाची कथा. अमेरिका आणि ब्रिटनमध्ये ही बातमी जेव्हा वर्तमानपत्रांत प्रकाशित झाली तेव्हा यावर कोणाचाही विश्वास बसला नाही. टाइटनिकसारखे भक्कम जहाज पहिल्याच यात्रेत नामशेष होईल, असे कोणासही वाटले नाही. टाइटनिकपेक्षा कितीतरी पटींनी लहान असलेल्या नौका (जहाजे) कितीतरी वर्षे चालतात, तेव्हा टाइटनिकबद्दल असा विचार कोण करणार? मानवाच्या सीमित, मर्यादित शक्तीने तयार झालेल्या टाइटनिक जहाजाची सृष्टीच्या अपरिमित शक्तीसमोर काय गणना? ती एक तुच्छ बाब आहे. टाइटनिक जहाजाची ही एक चमत्कारिक आणि महत्त्वाची घटना आहे. यापेक्षा लहान-सहान घटना दररोज नव्हे क्षणाक्षणाला घडत असताना आम्ही पाहतोच. MAN PROPOSES AND GOD DISPOSES ''मनुष्य एक विचार करतो, तर ईश्वर दुसराच'' या म्हणीची प्रचीती संबंध मानव-

इतिहासात आढळून येते. मनुष्य करीत असलेल्या प्रत्येक कार्यामध्ये कोणते तरी विघ्न उपस्थित होते, याची जाणीव आम्हास नेहमी होत असते. एका कामातील अडथळे पाहून दुसऱ्यासाठी हात घालावे तर तेथेही प्रतिकूलतेची शृंखला दत्त म्हणून उभी असतेच. अशा प्रकारे पावलोपावली विघ्नांची ही उपस्थिती मानवाच्या अल्प सामर्थ्याची साक्ष देण्यास पुरेशी आहे. म्हणूनच गीतेमध्येः-

कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन ।

असे म्हटले आहे. मनुष्यास केवळ प्रयत्न करण्याचा अधिकार आहे. फळाचे (परिणामाचे) काय सांगावे? उद्दिष्ट पूर्ण होईल की नाही? अवलंबिलेल्या मार्गात विघ्ने उपस्थित होतील की नाही? या विषयात मनुष्यास अधिकाराने काहीच सांगता येत नाही. तो या बाबतीत आपले सामर्थ्य पणाला लावून विचार करू शकतो. भविष्याच्या आपत्तीतून बचावासाठी प्रयत्नही करू शकतो. पण, निश्चितपणे हे असेच होईल हे सांगता येत नाही.

'मनुष्याच्या अल्प सामर्थ्याचे चित्रण करून तुम्ही त्याच्या उत्साहावर विरजण घालू इच्छिता, त्याला निराशावादी बनवू इच्छिता' अशा प्रकारचा आक्षेप काही जण करतील. संचालन- शक्तीच मनुष्याच्या हाती नसेल तर कार्य तरी कोणाच्या मदतीने करणार? आणि गीतेच्या वर दिलेल्या अर्ध्या श्लोकाचा पहिला भाग चूक सिद्ध होईल. गीतेत असेही म्हटले आहे.

'संशयात्मा विनश्यति'

'मनुष्याचे शक्तिसामर्थ्य अल्प आहे हे' दाखवून त्यास संशयग्रस्त करीत आहात. गहू पेरल्यामुळे गहू पिकतील असा निश्चय नसेल तर गहू कोण पेरेल? मानवजातीपासून ज्ञानाची निश्चितता हिरावून घेतली तर कार्यासाठी सहायक अशी कोणतीच बाब त्याच्याजवळ राहणार नाही. गाय दिवसभर रानात चरून संध्याकाळी घरी येते. घरी तिचे वासरू नक्कीच असते, हे निश्चित ज्ञान तिला असल्यामुळेच ती तसे करते ना! यांप्रमाणेच आमचे कार्यही आशेच्या आधारावरच चालते. आशा निश्चयाचे अपत्य आहे; म्हणून, मनुष्य अल्प आहे असे म्हणणे त्यास कर्मविमुख किंवा आळशी बनविणेच आहे.

वरवर पाहता हा आक्षेप बरोबरच वाटतो. पण हा आक्षेप निराधार आहे. मनुष्याच्या अल्पतेची जाणीव करून देण्यासाठी दिलेली उदाहरणे बरोबर आहेत ना! मग वास्तविकतेचा निषेध करणे कितपत योग्य आहे? मनुष्याला आपल्या यशाची निश्चिती (खात्री) नं होण्यासाठी आशा हीच एकमेव कारण आहे. मनुष्याचे ज्ञान, पराक्रम अल्प आहे म्हणजे मनुष्याने आशा करू नये, असा आमच्या म्हणण्याचा हेतू नाही. माणसात आशा करण्याची जी प्रवृत्ती आहे ती त्याच्या अल्पतेचा विरोध करीत नाही तर उलट समर्थन करते. मनुष्य एखादे काम करण्याची किंवा कार्यामध्ये यशाची आशा का बाळगतो? तो अल्प आहे म्हणून नव्हे, तर त्याच्यापेक्षा उत्कृष्ट आणि अटळ अशा एका शक्तीमध्ये विश्वास ठेवतो म्हणून, तो तशी आशा करतो. आपले वडील आपल्यासाठी बाजारातून मिठाई आणतील, अशी आशा एक मुलगा बाळगतो. याचे कारण, दररोज वडील मिठाई आणून देतात हेच आहे. या आशेमुळे मुलाच्या अल्पतेचा विरोध होत नसून, मुलापेक्षा

उत्कृष्ट आणि अटळ शक्तीची जाणीव आम्हास होते, ज्या शक्तीविषयी मुलाला पूर्ण विश्वास आहे. पण, आशा आणि निश्चितता यामध्ये मात्र विरोध आहे.

गीतेमध्ये असलेल्या 'संशयात्मा' शब्दाचा अर्थ दृढतेची उणीव आहे. ही अविश्वासातून जन्म घेते. एखाद्या कार्यात 'मला यश नक्कीच मिळेल' असा जेव्हा विश्वास वाटतो तेव्हा दोन बाबी सिद्ध होतात. पहिले ते काम पूर्ण करण्यासाठी आवश्यक साधनांची जुळवाजुळव केली आहे; दुसरे आपल्या नियमांना कधीच विस्कळित न होऊ देणाऱ्या श्रेष्ठ शक्तीविषयी प्रबळ विश्वास. या दोन्ही बाबी मनुष्याच्या अल्पतेची जाणीव करवतात.

'आम्ही खात्रीने यश मिळवू' असे म्हणत असताना जो 'खात्रीने' शब्द आला आहे तो पूर्ण निश्चयाचा द्योतक नाही. पराक्रमात किंवा बुद्धिमत्तेत सर्वश्रेष्ठ असणाऱ्या व्यक्ती त्यांना, भविष्यात घडणाऱ्या बाबींबद्दल खात्री देता येणार नाही, अशी खात्री बाळगतात. हिवाळयात धुक्यामुळे जेव्हा परिसर आच्छादित होतो तेव्हा डोळे विस्फारून पाहण्याचा कितीही प्रयत्न केला तरी वस्तू बरोबर दिसत नाहीत. त्याचप्रमाणे भविष्यसुद्धा एका धुक्यामध्ये लपलेले आहे. आम्ही आमची बुद्धी कितीही चालविली तरी भविष्य स्पष्ट कळत नाही. 'अमूक कार्य असेच होईल' असे निश्चयाने सांगू शकत नाही. उच्च कोटीच्या चिकित्सकांनी असाध्य म्हणून निर्वाळा दिलेले रोग आपोआपच कमी झालेले आपण पाहतो. या रोगांचा मुळासकट नायनाट करण्यामध्ये आम्ही नक्कीच यश मिळवू, असे ठामपणे सांगणारे वैद्य, त्याच रोगाने रोगी मृत्यूच्या तावडीत सापडलेला पाहून अगतिक झालेले पाहतोच. गहू पेरलेल्या जमिनीत ज्वारीचे पीक येणार नाही हे खरेच आहे. पण, गव्हाचे पीक पिकवण्यासाठी लागणारी इतर अनेक साधने मानवाच्या हातात नाहीत. जमिनीत खत कमी- अधिक होऊ शकते. अतिवृष्टी, अनावृष्टी, उंदिर-घुशी, कृमी-किट यांच्यामुळे पिकांची हानी होऊ शकते. यासाठी मनुष्य येणाऱ्या विघ्नांच्या प्रतिकारासाठी दक्ष असतो. तो अतिशय जवळ असलेले भविष्यच जाणू शकतो. त्यापेक्षा अधिक जाणणे त्याच्या अवाक्याबाहेरचे आहे. सृष्टीतील ज्ञान आणि क्रिया- कलाप हे मानवासाठीच आहेत. निसर्ग मानवास पाहून लपण्याचा कधीच प्रयत्न करीत नाही. तो 'माझ्या कार्याचे अवलोकन करून तुम्ही तुमचे कार्य उत्तम पद्धतीने पार पाडा' असा संदेश देत असतो. पण, मानवाचे अल्प सामर्थ्य सृष्टीतील ज्ञानाचा एखादा अंशच मिळवू शकते.

एक लहानसे फूल बागेत उभे राहिलेल्या मानवास 'मला पाहून ज्ञान मिळव' असे टाहो फोडून सांगत आहे. शेकडोगणती बुद्धिवंत आपले जीवन पणाला लावूनही या फुलाच्या एका पाकळीचे सुद्धा पूर्ण ज्ञान संपादन करू शकले नाहीत. ते आले तसे गेलेही. एकाने 'केवळ रंग-परीक्षण करीन' असा विचार केला. स्वतःच्या भौतिक, रासायनिक ज्ञानाचा वापर करून, संपूर्ण आयुष्य खर्ची घालूनही त्याचे अन्वेषण पूर्ण होऊ शकले नाही. एकाने 'फुलाचा चिकित्सा क्षेत्रातील प्रभाव' या विषयावर पूर्वजांच्या ज्ञानाधारे संशोधन केले. पण तोही पूर्णता मिळवू शकला नाही. तिसऱ्याने 'फुलांची वाढ कशा प्रकारे होते, विकास कशामुळे होतो आणि कोणत्या कारणामुळे नाश होतो

याचा विचार केला. या साठीच वनस्पतिशास्त्राची निर्मिती झाली. जगातील नामांकित वैज्ञानिकांनी आपली बुध्दी पणाला लावली. पण फुलास पूर्णतः जाणण्यात यशस्वी होऊ शकले नाहीत. फुलास पाहू इच्छिणाऱ्यासमोर फुलाने आपले सर्वच रहस्य मांडले. ते फूल तोडू इच्छिणाऱ्यांना त्याने विरोध केला नाही. सुगंधाची इच्छा बाळगणाऱ्यांना निराश केले नाही. त्यांच्यावर सुगंधाचा वर्षाव केला. स्पर्श करू इच्छिणाऱ्यांना त्याने दूर सारले नाही. तरी पण, ते इवलेसे, लहानसे, कोमल पुष्प जगासाठी एक कोडेच राहिले. त्याला संपूर्णपणे कोणीही ओळखू शकले नाही. सृष्टीची गुंतागुंत फारच विचित्र आहे. एक उर्दू कवी म्हणतोः-

क्या तमाशा है कि चिल्मन से लगे बैठे हो ।
साफ छिपते भी नहीं सामने आते भी नहीं ।।

निसर्गदेवता कोणाशीही लपंडाव खेळत नाही, पण तिचे तेजोमय रूप पाहण्यासाठी विशिष्ट नेत्र आवश्यक आहेत. इंग्रजी भाषेत **महाकवी टेनिसन** यांनी निसर्गाविषयी किती सुंदर वर्णन केले आहे, पाहा :

Flower in the crannied wall,
I pluclk you out of the crannies,
Hold you here,
root and all,
in my hand little flower- but if I could understand what you are,
root and all and all in all,
I should know what God and man is

'भिंतीच्या भेगांमध्ये उगवलेल्या फुला! मी तुला या भेगांतून वर काढतो. मुळासकट, अवयवांसहित हातात घेतो. हे इवल्याशा, चिमुकल्या फुला! मी जर तुला तुझ्या अवयवांसहित पूर्णपणे जाणू शकलो तर ईश्वर कोण आहे आणि मनुष्य कोण आहे हे ओळखू शकेन.'

मानव अल्प आहे, त्याची शक्ती मर्यादित आहे. यात मुळीच संदेह नाही. पण, या अल्पतेच्या भावनेमुळे मनुष्यात कोणत्याही प्रकारचा न्यूनगंड उत्पन्न होत नाही. ही अल्पता त्यास आळशी बनवत नसून चतुर बनवते. अभिमानापासून वाचवते. अभिमानापासून कोणालाही केव्हाही हानीशिवाय दुसरे काहीच पदरात पडले नाही. "मी सौर कुटुंबाचा शासक झालो" असे समजण्याने सूर्य स्वतःचे कार्य माझ्याकडे सोपवील काय? अशा समजुतीने मी शक्तिसंपन्न होईन काय? सूर्योदय, सूर्यास्त माझ्या आज्ञेप्रमाणे होतील काय? मानवाने आपल्या अल्पतेची जाणीव करून घ्यावी. विश्वात सर्वत्र व्याप्त अनंत बळ, अनंत ज्ञान बाळगणाऱ्या शक्तीस जाणावे. आपले अल्पसामर्थ्य त्या अनंत शक्तीच्या अनुषंगाने वापरले तर तो कधीच अयशस्वी होणार नाही व ती शक्ती त्याच्या उपयोगीच पडणारी आहे, असे त्यास समजून येईल.

आम्ही अल्प आहोत की पूर्ण. हा प्रश्नच नाही. आम्ही तर अल्प आहोतच. स्वतःस अल्प समजणारे अल्पच सिद्ध झाले आणि स्वतःस सर्व दृष्टीने परिपूर्ण समजणारे सुद्धा अल्पच सिद्ध

झाले. पण सृष्टीत प्रत्यक्ष आणि अप्रत्यक्ष स्वरूपात असलेल्या असंख्य शक्तींपैकी कोणत्या शक्तीपासून हित साधता येऊ शकते, याचाच विचार प्रामुख्याने करणे योग्य आहे. वाफेच्या साहाय्याने चालक रेल्वे चालवतो. दुरुपयोग होताच ती प्राणही घेऊ शकते. वाफेच्या अनुकूल असेपर्यंतच ती त्याची सहायता करते. वास्तविक पाहता सृष्टीच्या विशाल संपदेचे आम्ही स्वामी नसून खजांची आहोत. खजांची खजिन्यातून हजारो रुपयांची उलाढाल करतो. पण नियमाविरुद्ध एक पै सुद्धा खर्च करू शकत नाही. निसर्गाने दिलेल्या विविध संपदांचासुद्धा एका मर्यादेपर्यंतच वापर करू शकतो. नियमाचे उल्लंघन करून खर्च करणाऱ्या खजांचीला कारागृहाची हवा खावी लागते, तसे निसर्ग नियमांचे उल्लंघन करणाऱ्यास विविध दुःखांच्या तावडीत सापडणे भाग पडते.

अल्पतेचा अनुभव करणारे आळशी, कर्मविमुख होतात असे म्हणणारे इतिहासाचे नीट अवलोकन करीत नाहीत. जगामध्ये वैभव मिळविलेल्यांनी स्वतःस, प्रारंभावस्थेत खजांचीच समजले होते. पण जेव्हा आमच्यासारखा कोणीही नाही, आम्हीच स्वामी आहोत, वाट्टेल तसा या वैभवाचा उपभोग घेऊ, असे जेव्हा ते समजू लागले, तेव्हा त्यांची अवनती सुरू झाली. ऱ्हासविकासांच्या कारणांना दर्शविणारी बाब सर्वसामान्यांच्या लक्षात येत नसली तरी बुद्धिवंत त्या कारणांचा शोध नक्कीच घेतात. एखाद्या समाजाची, देशाची प्रगती पाहून गुणावगुणांना वेगळे न करता सर्वच बाबींची प्रशंसा करू लागतो. यामुळेच घोटाळे होतात. दोषही सद्गुणांचे रूप धारण करतात. जेव्हा काहीच केले जाऊ शकत नाही अशा वेळी त्यांना दोषांची जाणीव होते. इतिहासात ऱ्हासाच्या कारणांचा शोध घेतला तर हेच आढळून येईल. त्यापासून धडा घेणे आवश्यक आहे.

मानवाचे अल्प सामर्थ्य, अल्पज्ञता त्याच्यापेक्षा श्रेष्ठ असलेल्या शक्तीवर विश्वास ठेवण्यासाठी प्रेरणा देत आहे. त्या शक्तीस कोणत्याही नावाने हाक मारली तरी ते फारसे आक्षेप घेण्याजोगे नाही.

❑❑❑

# अध्याय : तिसरा

## सृष्टी-रचना

अनेकांना शब्दाची व्युत्पत्ती रुचत नाही. पण पुष्कळ बाबी अशा आहेत की ज्यांच्याविषयी वास्तविक माहिती शब्दांच्या व्युत्पत्तीमुळेच मिळते. संस्कृत भाषेचे बरेचसे शब्द सृष्टिरचनेच्या अनेक आवश्यक विषयांचे ज्ञान करून देतात. उदाहरणादाखल : 'सृष्टी' शब्दच घ्या. हा शब्द संस्कृतच्या 'सृज' धातूपासून बनला आहे. 'सृज' धातूचा अर्थ 'बनवणे' असा आहे. सृज धातूला 'क्विन्' प्रत्यय जोडल्यामुळे 'सृष्टी' शब्द बनला. या शब्दाचा अर्थ आहे 'बनविलेली वस्तू'. दुसरा शब्द आहे 'संसार'. हा 'सृ' धातूपासून बनतो. याचा अर्थ आहे 'वाहणे' किंवा 'निघणे'. म्हणून संसार म्हणजे 'निघालेली वस्तू' असे कळून येते. सृष्टीसाठी तिसरा शब्द 'जगत्' आहे. हा 'गम्लृ' धातूपासून बनला आहे. याचा अर्थ आहे 'चालणे'. यावरून सृष्टी ही एक चालणारी वस्तू आहे असे समजते. संस्कृत ही विश्वाची सर्वांत जुनी भाषा आहे. यावरून अति प्राचीन काळापासून सृष्टी ही एक निर्मिलेली, निघालेली किंवा चालणारी वस्तू आहे, असे बुद्धिवंतांनी स्वीकारलेले दिसून येते. पण पूर्वजांच्या सिद्धांताचे परीक्षण न करता त्यांचे म्हणणे का स्वीकारावे असा प्रश्न उद्भवतो. म्हणून आधुनिक विद्वानांचे याबाबतीत काय मत आहे, हेही पाहणे आवश्यक आहे.

जगामध्ये आम्ही पाहत असलेल्या वस्तू किंवा घटना यांना आरंभ आहे. या बाबतीत दुमत बाळगण्याचे कारणच नाही. म्हणजेच वस्तू आणि घटना परिवर्तनीय आहेत, असे दिसून येते. काळाचा प्रभाव एखाद्या वस्तूवर पडला नाही, अशी कोणतीच वस्तू जगात दिसून येत नाही. एखाद्या जीर्ण-शीर्ण वृक्षाकडे पाहा. तो केव्हातरी उत्पन्न झालाच असेल हे स्वीकारावेच लागते. पुरातन पर्वताकडे पाहा. त्याचाही अंत लागेलच. आजकाल वैज्ञानिक आपल्या प्रयोगशाळेत 'हा पदार्थ कसा बनला' याचेच परीक्षण करीत असतात. भूगर्भशास्त्र 'हा पर्वत किंवा खडक कसा बनला' याविषयीच माहिती देत असते. पृथ्वीवर असलेल्या पर्वतांचा राजा हिमालय कधी काळी उत्पन्न झालाच असेल. वेगवेगळ्या ठिकाणची माती सृष्टिरचनेच्या वेगवेगळ्या अवस्थांचा केवळ इतिहासच आहे.

एक वस्तू दुसऱ्या वस्तूपेक्षा नवीन असते. एका निश्चित वेळी त्यांची निर्मिती झालेली असते हेच त्याचे कारण आहे. वृक्षामध्ये पानांपेक्षा फुले नवीन असतात. पाने मुळांपेक्षा नवीन असतात. मुळ्या ज्या जमिनीत उत्पन्न होतात त्या जमीनीपेक्षा नवीन असतात. त्या जमिनीची माती ज्या खडकावर जमलेली आहे त्या खडकापेक्षा नवीन आहे. तो खडकसुद्धा पृथ्वीच्या तळापेक्षा नवीन आहे. पृथ्वीच्या सुद्धा अनेक अवस्था आहेत असे सांगतात. प्रारंभावस्थेत भूमी एक अग्निपुंजच होती. ती हळू-हळू थंड होत आजच्या स्थितीत आली आहे. भाजलेले वांगे थंड झाल्यावर त्यावर सुरकुत्या पडतात त्याप्रमाणे भूगोल जेव्हा थंड होऊ लागला तेव्हा यावर उंच-सखल प्रदेश तयार

झाले. उंच ठिकाणी पर्वत, खोल भागात समुद्र तयार झाले. याचप्रकारे भौतिकशास्त्रज्ञांनी व रसायनशास्त्रज्ञंनी हवेचे, पाण्याचे विश्लेषण केले. ते ज्या घटकांच्या संयोगापासून बनले आहेत त्या घटकांना वेगळे करून दाखविले. त्या पदार्थांचा प्रारंभ आमच्या दृष्टीसमोर झाला नाही हे खरे असले तरी आम्ही अनेक पदार्थांची निर्मिती पाहतच आहोत. जे आमच्या नजरेसमोर तयार झाले नाहीत त्यांचे विश्लेषण करून जाणू शकतो, की हेही केव्हातरी तयार झाले आहेत. एखाद्यास 'तयार न झालेली किंवा अनिर्मित वस्तू दाखव' असे म्हटले तर तो दाखवू शकणार नाही. ज्या इन्द्रियांद्वारे पदार्थांचे ज्ञान होते, ती इन्द्रिये आणि ज्या पदार्थांचे ज्ञान होते ते पदार्थ - हे दोन्हीही निर्मिलेले, बनलेले आहेत असे दिसून येते. जे पदार्थ स्वतः बनलेले नाहीत पण ज्यांच्या संयोगाने जगातील वस्तूंची निर्मिती होते, अशा त्या मूलद्रव्यांचा शोध घेण्यासाठीच तर वैज्ञानिकांची अहोरात्र धडपड चालू असते. पण दीर्घकालिक प्रयत्नानंतरसुद्धा ते या कार्यात यशस्वी होऊ शकले नाहीत. ज्यांना अगोदर 'मूलद्रव्य' समजण्यात आले होते, ते नंतर संयुक्त पदार्थ सिद्ध झाले. आज ज्यांना 'मूलद्रव्य' समजण्यात येते, तेही इतर द्रव्यांच्या संयोगाने बनलेले नाहीत, असे सांगता येणे शक्य नाही. मूलद्रव्य म्हणून त्यांना समजण्यात आले तरी ते ज्या अवस्थेत आमच्या समोर आहेत, त्यावरून ते बनलेलेच आहेत, हे सिद्ध होते. उदाहरणादाखल : सोने हे एक 'मूलद्रव्य' आहे. ज्या कणांद्वारे ते तयार झाले ते सहज वेगळे केले जाऊ शकतात. याचा अर्थ हाच की ते कण कोणत्या तरी साधनाने एकत्र केले गेले आहेत. ज्या वस्तूचे पृथक्करण-विभाग करू शकतो ती बनलेली आहे, हे सिद्ध करण्यासाठी फारशा तर्काची गरज नाही. जगामध्ये अशी कोणती वस्तू आहे, जिचे विभाग केले जाऊ शकत नाहीत? जगातील सर्व वस्तू संश्लेषण (Synthesis) व विश्लेषण (Analysis) या दोन क्रियांद्वारेच बनत असतात. फुलांच्या गुलदस्त्याप्रमाणे काही फुलांचे एकत्रीकरण करून किंवा घराच्या दाराप्रमाणे काही वस्तूंचे विभाग करून एकत्रीकरण केल्यामुळे वस्तूची निर्मिती होते.

सृष्टीतील सर्व वस्तू परमाणूंपासून बनल्या आहेत. पण ते परमाणू मात्र स्वतःसिद्ध आहेत. वस्तूंचे विश्लेषण करीत असताना एक स्थिती अशी येते की पुढे विश्लेषण करता येत नाही. पदार्थाच्या या अंतिम घटकास परमाणू म्हणतात. त्यांनाच 'मूलतत्त्व' किंवा 'मूलद्रव्य' असे म्हणता येईल. ते इतर पदार्थांच्या संयोगाने बनलेले नाहीत. यासंबंधी प्रसिद्ध तत्त्ववेत्ते जे. एस. मिल यांनी ''धर्मासंबंधी तीन निबंध'' या सदरात मांडलेले विचार उद्बोधक आहेत. ''सृष्टीमध्ये एक स्थिर व दुसरे अस्थिर असे दोन तत्त्व (मूलद्रव्य) आहेत. स्थिर तत्त्व हे कार्यरूप नसतात. घटना व पदार्थ हे दोन्ही कारणांद्वारे बनलेले आहेत हे सत्यच आहे. ऑक्सिजन व हायड्रोजन यांच्या संयोगाने पाणी तयार होते. पण असे म्हणणे घटनांचा प्रारंभच आहे. काही कारणांचा कार्यरूपात बदल होणे हाच अर्थ आहे. पण या घटनांच्या अस्तित्वासाठी कारण पदार्थ नसून घटना मात्र आहेत. एखाद्या वस्तूच्या अस्तित्वाच्या प्रारंभासाठी जे कारण आहे तेच वस्तूचे सुद्धा कारण आहे, असे म्हणत असलो तरी त्या पदार्थाचा तो भाग, ज्याच्या अस्तित्वाचा प्रारंभ होत आहे, तो सृष्टीच्या

अस्थिर तत्त्वाशी निगडित असतो. प्रत्येक पदार्थात त्याच्यापेक्षा भिन्न एक स्थिर तत्त्व असते. त्या तत्त्वाला प्रारंभ नसतो. म्हणून त्याचे कारणही नाही''.

मिल महोदयाच्या विचाराशी आम्ही पूर्ण सहमत आहोत. जग हे स्थायी आणि अस्थायी या दोन तत्त्वांच्या संयोगाने बनले आहे. संस्कृत भाषेत अस्थायी पदार्थांना 'नाम आणि रुप' असे म्हटले आहे. स्थायी तत्त्वांना 'मूलतत्त्व' अशी संज्ञा दिली आहे. 'मूल-तत्त्व आणि 'नाम-रूप' यांच्या संयोगानेच जग बनले आहे यात तिळमात्रही संदेह नाही. म्हणूनच ही सृष्टी कार्य आहे हे सिद्ध होत आहे.

परमाणूसंबंधी उच्च कोटीच्या वैज्ञानिकांमध्ये मतभेद आहे. वैज्ञानिकांची संशोधने चालूच आहेत. काहींच्या मते परमाणू ही एक वस्तूच नाही. सृष्टी ज्या मूलतत्त्वापासून बनली आहे ते केवळ शक्तीचे केंद्र आहेत. पण, या मतानुसारसुद्धा केव्हा तरी हे शक्तीचे केंद्र आपली मूळ अवस्था सोडून जगाच्या वर्तमान स्थितीत पोहचले आहेत असे स्वीकारावेच लागते. सृष्टीही बनवली गेली आहे म्हणूनच हे परिणाम (कार्य) आहे यात शंका घेण्याचे काहीच कारण नाही.

सृष्टी- रचनेसाठी परमाणूत परस्पर संयोगाची आवश्यकता नाही असे काही जण म्हणतात. सृष्टीमध्ये एक मूलतत्त्व (मूलद्रव्य) आहे, ज्यास 'प्रकृती' असे म्हणतात. बर्फ वितळून जसे पाणी तयार होते तसेच प्रकृती (परमाणू) स्वत: परिणत होऊन सृष्टिरूपामध्ये अवतरली आहे असे यांचे मत आहे. आम्ही या वेगवेगळया मतांची इथे मीमांसा (ऊहापोह) करीत नाही. मूलतत्त्वासंबंधी विचार करण्याची इथे आवश्यकता भासत नाही. सृष्टीला प्रारंभ आहे. ती केव्हा तरी बनवली गेली आहे हे दाखविणेच आमचा उद्देश आहे. परिवर्तनवाद्यांच्या मतेसुद्धा परिवर्तनाचा एक निश्चित काळ असतो. परिणाम - परिवर्तन सुद्धा एक प्रकारचे कार्यच आहे. बर्फाचे मूलतत्त्व तेच आहे जे पाण्याचे आहे; पण बर्फ आणि पाणी या दोन वेगवेगळया वस्तू आहेत. हे दोन्ही एक आहेत असे कोणी समजतही नाही. बर्फाचे पाणी होण्यासाठी काही काळ लागतो. बर्फ हे 'कार्य' आणि पाणी हे कारण आहे असे आपण म्हणू शकतो.

सृष्टीच्या कार्यत्वाविषयी अंशत: आक्षेप घेणारा तत्त्ववेत्यांचा एक समूह ते विवर्तवादी. ''अतात्त्विको अन्यथा भाव: विवर्त्र इति उदीरित:'' वस्तू नसूनसुद्धा आहे असे वाटणे 'विवर्त' आहे. सर्प नसतो पण आहे असे वाटतो. पाणी नसते पण आहे अशी प्रतीती होते. काही तत्त्ववेत्त्यांच्या मते वास्तविक पाहता हे जग एक भ्रमात्मक कल्पित वस्तू आहे किंवा कल्पनामात्र आहे. मनुष्य स्वप्नामध्ये हत्ती, घोडे, वृक्ष पाहतो. डोळे उघडल्यावर यातील एकही दिसत नाही. सृष्टीसुद्धा एक प्रकारचे स्वप्नच आहे. स्वप्नाप्रमाणेच ही सृष्टी आम्ही पाहत आहोत. जेव्हा आमचे ज्ञान-नेत्र उघडतात तेव्हा हे स्वप्नरूप जग दिसत नाही. या विचारकांच्या दृष्टीमध्ये सृष्टी ही एक वस्तूच नव्हे. मग ही 'सृष्टी' कार्य आहे असे कसे म्हणता येईल. इथे स्थिर, अस्थिर असा प्रश्नच नाही. या विचारकांचे म्हणणे एवढेच आहे की, व्यावहारिक भाषेत ज्या वस्तूस 'सृष्टी' म्हणतो, ती तात्त्विक दृष्टीने पाहता केवळ स्वप्न आहे. वास्तविक पाहता या जगातील निरनिराळया वस्तू

त्यांच्यामुळे होणारे वैचित्र्य हे स्वप्नापेक्षा अधिक काहीच नाही. मूळ तत्त्व एकच आहे ते म्हणजे 'ब्रह्म' आहे असे यांचे मत आहे.

आम्ही इथे 'स्वप्नवाद किंवा ब्रह्मैक्यवाद याविषयी काहीच सांगू इच्छीत नाही. ते बरोबर असो की नसो; पण, सृष्टी हे केवळ एक स्वप्न आहे असे म्हणणाऱ्यांनासुद्धा हे स्वप्न केव्हा तरी प्रारंभ झाले असेल हे स्वीकारावेच लागेल. स्वप्नाच्या साधारण घटनेवर विचार करा. स्वप्न स्वतः पडत नाही. ते सुद्धा एका कारणातून उत्पन्न झालेले कार्य आहे. ज्ञाननेत्र उघडताच स्वप्न नष्ट होते असे म्हणणारेसुद्धा ज्ञाननेत्र मिटताच स्वप्न पुन्हा प्रारंभ होते असे स्वीकारतात. प्रश्न हा नाही की स्वप्नाचा कसा प्रारंभ होतो तर प्रश्न हा आहे की, स्वप्न कार्य आहे की नाही? ज्याला प्रारंभ आहे ते कार्य आहे हे स्वीकारण्यासाठी आडकाठी कसली? फक्त त्याच्या कारणाचा शोध घेणे आवश्यक आहे.

सृष्टीस प्रारंभ आहे हे आम्ही वर दाखवण्याचा प्रयत्न केला आहे. ही सृष्टी कार्यरूप आहे म्हणजे ही केव्हा तरी बनलेली आहे हे स्वीकारणे बुद्धिवंतास निश्चितच अवघड जाणार नाही. हे तर प्रत्यक्षच आहे. हातच्या काकणाला आरसा कशाला? अशीच स्थिती आहे.

या कार्यरूप जगात कोणकोणत्या गोष्टी आढळून येतात हे पाहणे आवश्यक आहे.

विश्वामध्ये आढळणारी सर्वात अधिक चमत्कारिक बाब म्हणजे 'नियम' (ORDER) आहे. आम्ही जगाच्या प्रत्येक घटनेत एक विशेष नियम पाहत आहोत. खरोखर, या नियमाच्या आधारावरच मनुष्य आपल्या कामाचे आराखडे तयार करतो. जमिनीत बी पेरले जाते, अंकुर निघतो, वृक्ष वाढतो, अगोदर फूल, नंतर फळे लागतात. वनस्पतीशास्त्रात हा एक क्रम आहे जो संपूर्ण वनस्पती- जगतावर शासन करीत आहे. या क्रमाचे कोणीच उल्लंघन करू शकत नाही. शेतकरी, माळी या नियमाला अनुसरूनच आपले कार्य करीत असतात. दुसरी बाब ही आहे की, विशिष्ट बी पेरल्यामुळेच विशिष्ट वृक्ष उगवतो. लिंबाच्या बियांपासून आंब्याचे झाड उगवेल अशी आशा करता येत नाही. हा वनस्पतिशास्त्राचा नियम आहे.

मनुष्य व इतर प्राण्यांच्या वाढीचाही एक नियम आहे. बाल्यावस्था, युवावस्था, वृद्धावस्था या क्रमाचा कधीच भंग होत नाही. वैद्यक व शरीर ही दोन्ही शास्त्रे याच नियमावर आधारलेली आहेत. इस्पितळात याच नियमांच्या आधारावर चिकित्सा केली जाते.

भूगोलसुद्धा असेच आहे. पर्वत, नद्या कशा विकसित झाल्या. नद्या एका विशिष्ट दिशेकडेच का प्रवाहित होतात? गंगा नदी हिमालयातून उगम पावून भारतातच का येते? तिबेटच्या उत्तरेकडे का जात नाही? भारतात ती पूर्वेकडेच का वाहते? पश्चिमेकडे का वाहत नाही? भारताच्या तिन्ही बाजूस समुद्र का आहे? चौथ्या दिशेस का नाही? ब्रिटिश द्वीप प्रायद्वीप का नाहीत? समुद्रावरून वाहणारे वारे एकाच दिशेकडे का वाहतात. या सर्वांसाठी नियम आहेत. भूगोलाशी निगडित सर्व घटना या नियमांचे पालन करतात.

भूगर्भशास्त्रज्ञांचे सुद्धा असेच ठाम मत आहे. अमुक एका पर्वताचे थर कसे तयार झाले?

अमुक बेटाची माती कोणत्या वेळी कशा प्रकारे बनली? अमुक ठिकाणी केव्हा पाणी वाहत होते आणि केव्हा पाणी नाहीसे होऊन भूमी तयार झाली? अमुक-अमुक ठिकाणच्या जमिनीत कोणत्या वस्तू आहेत? हे सर्व प्रश्नसुद्धा त्याच उपरोक्त वर्णित नियमबद्धतेचेच स्पष्टीकरण करतात.

खगोलशास्त्राचे काय म्हणणे आहे? पृथ्वीसारखे अनेक ग्रह, सूर्यासारखे अनेक नक्षत्रसमूह, चंद्रासारखे उपग्रह हे सर्व नियमाशिवाय भ्रमण करीत आहेत काय? सूर्याचे उदयास्त दररोज होत आहेत. हे उदयास्त खगोलासंबंधी नियमपूर्वक चालणारी एक घटना आहे. या नियमाधारेच पंचांग तयार केले जाते. वर्षभराच्या उदयास्ताची वेळ नोंदली जाते. हा नियम अटळ आहे. घड्याळाच्या वेळेत फरक पडेल. पण उदय- अस्तात पडणार नाही. घड्याळेसुद्धा याच धर्तीवर चालतात. एखादा विशेष नियम नसला असता तर खगोलशास्त्रज्ञ पूर्वानुमान करूच शकले नसते.

मानसशास्त्र हे सर्व शास्त्रापेक्षा विलक्षण तर आहेच, दुर्बोधही आहे. जगातील वस्तूंविषयी थोडेफार जाणता येते. पण मानव- मनाद्वारे घडणाऱ्या असंख्य उलथापालथी पाहून या मनासाठी काही नियम आहे की नाही अशी शंका जन्म घेते. दुसऱ्याच क्षणी मनाची स्थिती कशी असेल हे मलाच कळत नाही. इतरांच्या मनाविषयी सांगणे तर फारच कठीण. तरीपण मानव-मन कितीही विलक्षण असले तरी याच्या क्रिये-प्रतिक्रिये बाबत काही नियम निर्धारित केलेले आहेत. त्यांचा शोध प्राचीन व आधुनिक मनोवैज्ञानिकांनी लावलेला आहे. आजही अनेक विद्वान् या शास्त्राच्या अन्वेषणात कार्यरत आहेत. मानव- जीवनाशी संबंधित असलेल्या इतिहास, कला, नाट्य, काव्य, व्याकरण, अर्थ, समाज या सर्व शास्त्रांचा आधार मनोविज्ञानाचे नियमच आहेत. ऐतिहासिक घटनांचा एकमेकांशी संबंध नसतो असे माणूस समजतो. अकबराचा जन्म, पठाणांच्या कचाट्यातून त्याच्या वडिलाची (हुमायूनची) सुटका, पठाणांचे पुनरुत्थान, पराभव, हुमायून व अकबरांचे विजय या सर्व घटना अकस्मात घडल्या किंवा एखाद्या विशिष्ट नियमाचा आधार या घटनांना नाही असे म्हणणे चूक ठरेल. मानव-मन कोणत्या पद्धतीने कार्य करते व याचा संपूर्ण मानवजातीवर किंवा देशावर काय प्रभाव पडतो, त्या प्रभावाने इतिहासात कोण-कोणते बदल घडतात या सर्वांचा इतिहासकारांनी शोध लावला आहे. वेगवेगळ्या शब्दांमध्ये व्यापकरूपात कार्य करणाऱ्या नियमांना न जाणता एकामागे एक अशी शब्दांची केवळ जुळवाजुळव केल्याने व्याकरणशास्त्र तयार होत नाही. तसेच एखाद्या देशाच्या इतिहासातील दहा-वीस घटनांना जाणणे म्हणजे इतिहासाचे ज्ञान नव्हे. त्या घटनावर नियंत्रण ठेवणाऱ्या नियमांचा शोध घेणे आवश्यक आहे.

अशा प्रकारे विश्वामध्ये सर्वत्र नियमबद्धता आम्हास दृष्टिगोचर होत आहे.

सृष्टीमध्ये विचार करण्याजोगी दुसरी बाब 'एकता' आहे. संपूर्ण सृष्टी वेगवेगळया रूपात आणि वेगवेगळ्या अवयवात विभागली असली तरी एक आहे. म्हणूनच इंग्रजीमध्ये (Universe) असे म्हणतात. 'एकता' हाच याचा अर्थ आहे. आमच्या शरीरात लहान-मोठे अनेक अवयव असले तरी शरीर जसे एक आहे, तशी सृष्टीसुद्धा एक आहे. सृष्टीच्या असंख्य घटकात एकता

सर्वत्र दिसून येते.

या अगोदर वर्णित नियमावर विचार केल्यास सृष्टीच्या एकतेवर अधिक प्रकाश पडतो. वस्तुतः नियमबद्धता हेच एकतेचे चिन्ह आहे. नियम म्हणजे तरी काय? वेगवेगळया पदार्थांनी एकाच पद्धतीने कार्य करणे हेच होय. म्हणजे त्याच्यात एकता आहे हे दिसून येते. जसे शाळेत जाणाऱ्या विद्यार्थ्यांमध्ये एक नियम असतो तसे जन्म-मृत्यूच्या बाबतीतही नियम आहे. जन्मणारा मरतो हा एक शाश्वत् नियम आहे. एकतेमुळेच या नियमाचे अस्तित्व आहे.

वेगवेगळ्या घटनांमध्ये असलेली एकता नियम म्हटली जाते. अनेक नियमांमध्ये सुद्धा एकता दिसून येते. मनुष्य, पशू, पक्षी, या सर्वांमध्ये मरणधर्मत्व दिसते. म्हणून 'सर्व प्राणी मरणधर्मी' आहेत असे सांगता येईल. पूर्वीचे नियम आपापल्या श्रेणीच्या वेगवेगळया प्राण्यांची एकता स्पष्ट करीत होते. हा नियम तीन्ही श्रेणीच्या सर्व प्राण्यांची एकता स्पष्ट करीत आहे. ही बाब भूमितीच्या एका उदाहरणाद्वारे अधिक स्पष्ट होईल. भूमितीचा एक नियम आहे की, त्रिभुजाचे तीन कोन दोन समकोनांसमान असतात. हा नियम केवळ त्रिभुजासाठीच उपयोगी पडतो. चतुर्भुजासाठी लागू होत नाही. चतुर्भुजामध्ये चार कोनांची बेरीज चार समकोनाएवढी असते. म्हणून १) त्रिभुजाच्या तीन कोनांची बेरीज दोन समकोनाएवढी असते, २) चतुर्भुजाच्या चार कोनांची बेरीज चार समकोनाएवढी असते, असे दोन नियम तयार झाले. वरवर पाहता या दोन नियमात कोणतेच सादृश्य दिसून येत नाही. पंचभुज, षडभुज यांच्या कोनाबाबतीतही वेगवेगळे नियम आढळून येतात. पंचभुजाच्या सर्व कोनांची बेरीज सहा समकोनाएवढी होते. षड्भुजांची आठ समकोना एवढी, सप्तभुजाची दहा समकोनाएवढी. पण या नियमातसुद्धा एकता आढळते. ती त्रिभुज, चतुर्भुज, बहुभुजामध्येही दिसून येते. एखाद्या भुजाच्या सर्व कोनांची बेरीज, त्याच्या बाजूच्या संख्येची दुप्पट करून चार वजा केल्यास येणाऱ्या समकोनाएवढी असते. याप्रमाणे सर्व भुजांना एकाच श्रेणीत बसवून एकतेची जाणीव करून दिली.

याच प्रकारे अंकगणित आणि बीजगणित यात काय फरक आहे? अंकगणित काही बाबतीत व्यापक नियमांचे वर्णन करते. पण, बीजगणित त्या सर्व नियमांत एकप्रकारता किंवा सादृश्य शोधते. जो नियम भूमितीत केवळ त्रिभुज, चतुर्भुज यातच व्यापक आहे. तोच नियम बीजगणितात जगातील इतर बाबींसाठीही उपयोगी ठरतो.

**वनस्पतिशास्त्राचे व प्राणिशास्त्राचे नियम वेगळे असले तरी जीवशास्त्रात जाऊन एक होतात. याच प्रकारे रसायनशास्त्र, भौतिकशास्त्र, जीवशास्त्र व गणितशास्त्र हे सर्व मिळून एक असे शास्त्र तयार होते की, ज्या शास्त्राचे नियम जगातील सर्वच वस्तूंसाठी लागू पडतात. तेच तत्त्वशास्त्र (Philosophy) आहे. जगातील नियमांत सर्वत्र एकता असते आणि आहे.**

जगामध्ये दृष्टिगोचर होणारी तिसरी बाब आहे 'उद्देश'. उद्देश नसता तर एकता आणि नियम हे दोन्ही निरुपयोगी ठरले असते. सर्व विद्यार्थ्यांनी शाळेत एकाच वेळी यावे हा नियम उद्देशपूर्ण आहे. उद्देशामुळेच कार्य सार्थक होत असते. जगातील सर्वच वस्तू आणि घटना एका विशिष्ट

उद्देशाकडे संकेत करतात. भिन्नता असलेल्या ठिकाणीसुद्धा उद्देश असतोच. या उद्देशाची जाणीव केव्हा होते तर केव्हा होत नाही; पण उद्देश असतोच. एकाचा उद्देश समजूही शकत नाही म्हणून तिथे उद्देशच नाही असा अर्थ होत नाही. एकदा एक युरोपियन यात्रा करीत असताना आदिवासी अरबांचा पाहुणा झाला. एके दिवशी सकाळी त्यांच्या तंबूसनोर भ्रमण करू लागला. अरब त्याच्याकडे पाहून हसू लागले. इकडून तिकडे फिरणे त्यांना व्यर्थ वाटले. पण त्याच्या फिरण्यामागे उद्देश होताच. हीच जगाची स्थिती आहे. आम्ही अनेक घटनांना आमच्या बुद्धीत असलेल्या घटनांशी जुळवून पाहतो. ज्यांचा संबंध जुळतो त्या सार्थक आणि ज्यांचा जुळत नाही त्या निरर्थक समजतो. आम्ही करीत असलेली चूक हीच आहे. प्रत्येक घटनेचा उद्देश आम्ही जाणू शकत नाही. पण जगाची स्थिती सांगते की, प्रत्येक घटनेचा काही ना काही उद्देश आहे.

एका मोठ्या यंत्राकडे पाहा. या यंत्रात हजारो सुटे भाग एकमेकाशी जोडलेले दिसतील. काही फारच मोठे, काही फारच लहान, काही लांब, काही गोल, काही सरळ, काही वक्र असे अनेक सुटे भाग आहेत. या सुट्या भागांमध्ये इतकी भिन्नता आहे की, एखादा विशिष्ट नियम किंवा समानता जाणणे कठीण आहे. पण, यंत्र बनविणाऱ्याची बुद्धी काय म्हणते ते पाहा. सर्वाअगोदर उद्देशाचा विचार केला गेला. यंत्रनिर्मात्याने कापड विणणे, पुस्तक छापणे, कागद बनविणे अशा प्रकारचा उद्देश समोर ठेवूनच यंत्रनिर्मिती केली. या उद्देशाने प्रेरित होऊनच अनेक सुटे भाग जोडून यंत्र बनविले. हे सर्व सुटे भाग समान नाहीत, एकाच प्रकारचे नाहीत. तरी पण एका विशेष उद्देशाची पूर्ती करतात. या दृष्टीने हे समानच आहेत. यंत्राच्या उपयोगावर यांची उपयुक्तता अवलंबून आहे. यंत्रास चालवणे हाच यांचा उद्देश आहे. अनेक सुटे भाग दिसण्यात लहान आणि बेढब आहेत. या ठिकाणी सुंदर सुटे भाग जोडता येतील. पण, त्या सुंदर सुट्या भागांचा यंत्र चालवण्यास मदत होत नसेल तर उपयोग तरी काय? यंत्रकाराच्या दृष्टीने कितीही बेढब असले तरी उपयोगी पडणारे सुटे भाग सुंदरच आहेत. त्याच्या उद्देशाची पूर्ती ते करू शकतात. अशीच स्थिती विश्वाची आहे. हे विश्व एका विशिष्ट उद्देशाच्या पूर्ततेसाठी बनवले गेले आहे. या विश्वातील लहानातील लहान प्रत्येक वस्तू आणि घटना आपला विशिष्ट उद्देश बाळगतात. यातील अनेक वस्तू बेढब किंवा विकृत स्वरूपाच्या दिसतील. काही घटना हानी करणाऱ्याही वाटतील. पण, चूक इथे होते की, मनुष्य आपला कल्पित उद्देश हाच सृष्टीचा उद्देश समजतो. म्हणून एखादी घटना किंवा वस्तू त्याच्या काल्पनिक उद्देशाची पूर्तता करत नसतील तर निष्प्रयोजन समजू लागतो. सृष्टिरचनेत अनेकांनी अनेक दोष दाखवले आहेत. एक संस्कृत कवी म्हणतो :

> "गन्धं सुवर्णे, फलमिक्षुदण्डे, नाकारि पुष्पं खलु चन्दनेषु ।
> विद्वान् धनाढ्यो, नृपदीर्घजीवी, धातुस्तदा कोऽपि न बुद्धिदोऽभूत् ॥

सोन्यामध्ये सुगंध, उसामध्ये फळ, चंदनवृक्षाला फुले, विद्वानास धनसंपदा, राजाला दीर्घजीवी करण्याची बुद्धी सृष्टिनिर्मात्याला देणारा कोणीही नव्हता' असे म्हणतो. पण सोन्यामध्ये सुगंध

शोधणाऱ्या बुद्धिमानांनी लक्षात घ्यावयास पाहिजे की, सोन्यास सुगंध असता तर धनवानांनी रंगी-बिरंगी सुंदर फुलावर प्रेम केले असते काय? सोन्याचा रंग, फुलांचा सुगंध हे दोन्ही वेगवेगळ्या उद्देशाची पूर्तता करीत मानव-उद्देशाची पूर्ती करीत आहेत. रॉबर्ट फ्लिण्ट महोदयांनी आपल्या 'आस्तिकता' नावाच्या पुस्तकात केलेले वर्णन पाहण्याजोगे आहे :

"आपली भूमी ज्या सौर-मंडळाचा एक भाग आहे, तो अतिविशाल, विचित्र आणि नियमित आहे. ज्या 'ग्रह - उपग्रहांमुळे' हे मंडळ बनलेले आहे त्यांचे परिमाण, स्थूलता, दूरी, गती, दिशा हे सर्व त्या मंडळाच्या रक्षणाकरिता, दृढतेसाठी अनुकूलच बनविण्यात आले आहेत. या मंडळाच्या अवयवांचा व्यवहार शरीरातील अवयवांप्रमाणेच आहे. उदाहरणासाठी पृथ्वीचाच विचार करू ही सूर्य-चंद्राशी अशा प्रकारे संबंधित आहे की, पेरणी आणि कापणीच्या वेळी आम्हास कोणतीच अडचण होत नाही. समुद्राची भरती-ओहोटी आम्हास कधीच धोका देत नाही. हे सौर मंडळ कोट्यवधी मंडळांपैकी एक आहे. इतर अनेक मंडळे या सौर-मंडळापेक्षा किती तरी पटीने मोठी आहेत. एवढेच नव्हे तर कोट्यवधी, अब्जावधी सूर्य आणि नक्षत्रे जी आकाशात इकडे-तिकडे पसरलेली आहेत ती सर्व एकमेकाशी गणिताच्या अतिगूढ नियमाच्या आधारे संलग्न असून एकमेकासाठी अनुकूल आहेत. त्यामुळे प्रत्येक मंडळाचे रक्षण होते व प्रत्येक ठिकाणी साम्य व सौंदर्य दिसून येते. प्रत्येक ग्रह दुसऱ्या ग्रहाच्या मार्गावर प्रभाव टाकतो. प्रत्येक ग्रह कोणते तरी असे कार्य करीत आहे की, ज्या कार्याशिवाय तेच नव्हे तर संपूर्ण मंडळ नष्ट होऊ शकते. हे सर्व मंडळे एवढ्या विलक्षणतेने बनविण्यात आली आहेत की, अनेक घटना भयंकर, विघ्नकारक दिसत असल्या तरी वास्तविकपणे त्या घटना मंडळाचा नाश होऊ देत नाहीत आणि विश्वाच्या दृढतेसाठी सहाय्यक ठरत आहेत. ती आपली शक्ती अशा प्रकारे खर्च करतात की, त्यांचा एक निश्चित काळानंतर एकमेकांना फायदा होतो.

(फ्लिंट थीज्म : पृ. १३८)

हा सहयोगच या विशाल ब्रह्मांडाच्या विशिष्ट उद्देशाची जाणीव करून देत आहे. या विशाल उद्दिष्टामध्ये समाविष्ट झालेली लहान-सहान उद्दिष्टेही आहेत. त्यांना वेगवेगळया स्वरूपात पाहिल्यास त्यांच्यामध्ये कोणताच संबंध दिसून येत नाही. पण, जेव्हा विशाल उद्दिष्टाकडे दृष्टी वळवतो तेव्हा त्या लहान उद्दिष्टांचीही उपयोगिता लक्षात येते. मनुष्याच्या श्वासोच्छ्वासाद्वारे दूषित वायू बाहेर पडतो. यामुळे मनुष्याच्या जीवनावर प्रतिकूल परिणाम होतो. आमच्या शरीरातून दुर्गंध बाहेर न पडण्याजोगे शरीर बनवले असते तर उत्तम झाले असते असे आपण म्हणू शकतो. पण या दुर्गंधित वायूमुळेच वनस्पतींची वाढ होते आणि याच वनस्पती आमच्या शरीराच्या वाढीसाठी कारणीभूत होत आहेत. एकाच्या दृष्टीने जी बाब हानिकारक ठरते ती दुसऱ्याच्या दृष्टीत लाभदायक ठरते. वनस्पतींच्या आहाराची निर्मिती कशी होईल याचा विचार मानव- देहातून उदजन वायू बाहेर काढतानाच करण्यात आला होता. असे दिसून येते. एका लहान फुलाच्या उपयोगाचा विचार करताना आम्हास जगातील अनेक विभागांचा विचार करावा लागतो

मानवासाठी फुले ही डोळ्यांना तृप्तीदायक, श्वासिकेस आल्हाददायक, वैद्यास औषधोपयोगी, चित्रकारांना चित्रकलेत सहायक, रंगरेजांना रंग-भरण्याच्या कलेचे प्रशिक्षक, कवीसाठी काव्याचे प्रेरक ठरतात. या उद्देशापेक्षा इतरही अनेक उद्देश आहेत. भ्रमर रसाचे पान करतात. मधमाशा मध काढतात. फुलपाखरे फुलावर बसून आनंद घेतात. अशा अनेक उद्दिष्टांची पूर्तता करून तेच फूल पुन्हा वृक्षसंततीच्या रक्षणासाठी 'बीज' निर्मितीचे कार्य करते. हे एका लहानशा फुलाचे काम आहे. जगातील प्रत्येक वस्तूविषयी आम्ही असाच विचार करू शकतो. आम्ही इथे सृष्टीतील नियमबद्धता, एकता आणि प्रयोजन याविषयी माहिती देण्याचा प्रयत्न केला. याशिवाय विचार करण्याजोगी एक बाब अजून आहे ती म्हणजे विशालता. हे जग किती विशाल आहे याचे अनुमान केले जाऊ शकत नाही. जर खरोखरच विशालतेचे अनुमान करू शकलो असतो तर ही सृष्टी विशाल आहे असे म्हणता आले नसते. म्हणूनच जगाला ब्रह्मांड म्हटले आहे. ब्रह्म म्हणजे मोठा, अण्ड म्हणजे मंडळ. हे विश्वमंडळ अत्यंत मोठे आणि विशाल असल्यामुळेच 'ब्रह्मांड' म्हटले जाते.

जगाची विशालता एकाच दृष्टीने नव्हे तर सर्वच दृष्टीने आहे. लांबी-रुंदीच्या दृष्टीने पाहिले तर आमचे मन सृष्टीची मोजमाप करू शकणाऱ्या परिमाणाची कल्पना करू शकत नाही. मानवाने पृथ्वीच्या सभोवार परिभ्रमण करून मोजमाप घेतले. भूगोलवेत्त्यांचे म्हणणे आहे की, पृथ्वीचा परीघ पंचवीस हजार मैलांचा आहे. एक तर पंचवीस हजार मैलांची कल्पना करणे हा काही पोरखेळ (सोपे) नाही. मानवाचे स्वतःचे शरीर पाच-सहा फुटांपेक्षा अधिक उंचीचे नाही. मानव-दृष्टीसुद्धा फार दूरवर पाहू शकत नाही. पंचवीस हजार मैलांचा अनुभव करणे हे दुस्तर आहे. काही अनुमानांद्वारे , काही कल्पनाशक्तीद्वारे, काहींची मोजमापे करून तो आपल्या भूमंडळाचा काही भाग जाणू शकतो. तरी पण ही पृथ्वी विशाल नाही असे कोण म्हणू शकतो ? हिमालय पर्वताच्या पायथ्याशी उभे राहून पर्वताकडे पाहा. अगोदर स्वतःची उंची किती आहे ते पाहा आणि मग पर्वताच्या उंचीशी तुलना करा. तुलना करण्यापूर्वीच पर्वताकडे पाहताच हृदय पर्वताच्या विशालतेने भारावून जाते. किती उंच ! किती लांब ! किती रुंद ! पर्वत आहे हा ! ओहो ! डोळे दिपून जातात, बुद्धी स्तब्ध होते, डोके फिरू लागते. ही आहे एका पर्वताची विशालता. पृथ्वीवर असे अनेक पर्वत आहेत. जहाजामध्ये बसून समुद्राची यात्रा करा. अगोदर तर जहाजाची विशालता काही कमी नाही. त्याच्या विशालतेविषयी मनुष्य अभिमान बाळगतो. पण, समुद्रासमोर जहाज आहे तरी किती? शतांश की सहस्रांश? पर्वतासमोर मुंगी जेवढी आहे तेवढेसुद्धा नाही. महिन्याच्या हिशोबाने समुद्र-यात्रा केली तरी किनारा काही दिसतच नाही. ही पृथ्वीच्या एका भागाची विशालता आहे. पण, पृथ्वी ब्रह्मांडामध्ये विशालतम वस्तू आहे काय? यापेक्षा मोठी वस्तू विश्वामध्ये नाही काय? सूर्याचाच विचार करू म्हणजे पृथ्वीची नगण्यता समजून येईल. सूर्य हा पृथ्वीपेक्षा तेरा लाख पटीने मोठा आहे. अगोदर 'तेरा लाख' ही संख्या विचारात घ्या. तेरा लाख ही संख्या काय कमी मोठी आहे. तेरा लाख गोलांचा एक गोल केला तर तो सकाळी दिसणाऱ्या लहान वृत्तासारख्या सूर्याप्रमाणे दिसेल. सूर्य तरी एकच आहे काय? खगोलविद्येच्या विशारदांना

विचारा. ते म्हणतात की, कोट्यवधी सूर्य आहेत. रात्रीच्या वेळी दिव्याप्रमाणे टिमटिमणारे सर्व तारे आमच्या भूमंडळापेक्षा कितीतरी पटीने मोठे आहेत. सेकंदाला एक लक्ष शहाऐंशी हजार मैल वेगाने धावणाऱ्या प्रकाशाला पृथ्वीपर्यंत पोहोचण्यासाठी कितीतरी वर्षे लागतात म्हणे! आता ती नक्षत्रे किती दूर असावीत याची कल्पना करा.

ही तर लांबी-रुंदीची स्थिती आहे. सूक्ष्मतेच्या दृष्टीनेही विश्व एवढेच विशाल आहे. एखाद्या वस्तूचे विश्लेषण (Analysis), पृथक्करण करीत गेलो तर काही काळानंतर अशी सूक्ष्मावस्था येते की जेथे कल्पनाशक्तीसुद्धा कार्य करू शकत नाही. पुढे वाटचाल करता येत नाही. पाणी तापवितो. पाण्याचे कण वाफेच्या रूपामध्ये आमच्या डोळयांसमोर नाचू लागतात. अधिक तापवले तर ते कणसुध्दा दिसेनासे होतात. अशा प्रकारच्या किती वस्तू सूक्ष्मरूपात विश्वामध्ये सामावलेल्या आहेत हे आम्ही जाणू शकत नाही. अजस्र प्राण्यांना पाहून आम्हास जेवढे आश्चर्य वाटते तेवढेच आश्चर्य मुंगीसारख्या अतिसूक्ष्म प्राण्यांना पाहून वाटते. हत्तीपेक्षा मुंगी कमी प्रभाव टाकणारी आहे असे मुळीच नाही.

नियमांची व्यापकतासुद्धा विलक्षण आहे. एखाद्या शास्त्राचे अवलोकन कराल तर त्यातच अनेक नियमांचे वर्णन आढळेल. अशी अनेक शास्त्र आहेत. त्यांचेसुद्धा असंख्य नियम आहेत. वैज्ञानिक अति प्राचीनकाळापासून या नियमांच्या अन्वेषणामध्ये व वर्गीकरणामध्ये मग्न आहेत. आजसुद्धा नव-नवीन नियम बाहेर पडत आहेत. यावरून सृष्टी ही एक विशाल वस्तू आहे हे सिद्ध होते.

'अनेक लहान वस्तूंच्या संयोगानेच एक मोठी वस्तू तयार होते,' असे काहीजण म्हणतील. पर्वत तरी काय आहे? मातीच्या अनेक लहान कणांचा समूहच आहे. समुद्र तरी काय आहे? पाण्याच्या लहान-लहान (थेंबांचा) बिंदूंचा एक कोष आहे. असे असताना विशालतेला एवढे महत्त्व देण्याची काय आवश्यकता? पण ही त्यांची कल्पना बरोबर नाही. विचार केल्यानंतर असे दिसून येते की, मानव-मनावर विशालतेचा अतिविलक्षण प्रभाव पडतो. जलबिंदूंचा समूहच समुद्र आहे हे निःसंदिग्ध आहे. पण, समुद्र बिंदूंच्या सामूहिक रूपामध्ये वेगळाच दिसतो. समुद्र एक विलक्षण वस्तू आहे. असे नसेल तर मानवास एवढे प्रभावित करण्याचे कारण तरी काय? एका विशाल पर्वताला पाहून पडणारा प्रभाव पृथ्वीच्या लहान-लहान कणांना पाहून पडत नाही. सैन्य पाहून जो प्रभाव पडतो तो एकेका शिपायाला पाहिल्यामुळे थोडाच पडणार? म्हणून विशालतेचे महत्त्व कमी आहे असे म्हणणे बरोबर नाही. खरोखरच विश्वाची विशालता तेवढीच चमत्कारिक आणि विलक्षण आहे जेवढी एकता, नियमबद्धता आणि उद्देश. विशालतेला सृष्टीतून बहिष्कृत केले तर इतर गुणांचेही अवमूल्यन होईल. त्यांची विलक्षणताही कमी होईल. मानवनिर्मित वस्तू आणि निसर्गातील वस्तू यांतील फार मोठे अंतर विशालतेचेच आहे. प्रत्येक बाबतीत मानव-निर्मित वस्तूपेक्षा नैसर्गिक वस्तू विशाल आहेत.

केव्हा केव्हा मानव-निर्मित वस्तू पाहून आम्हास आश्चर्य वाटते. विजेच्या दिव्याचा प्रकाश चंद्राच्या प्रकाशापेक्षा अधिक चकित करतो. मानव- निर्मित कागदी पोपट वास्तविक पोपटापेक्षा

अधिक आकृष्ट करतो. मानवाने बनवलेल्या विमानाकडे पाहून आमचे डोळे दिपून जातात. पण हे आश्चर्य मानव निर्मित वस्तूंच्या विशालतेमुळे नसून मानव-बुद्धीच्या अल्पतेमुळे होत आहे. चार वर्षाचा एखादा मुलगा एखाद्या प्रौढ व्याख्यात्याप्रमाणे किंवा अंशतःही व्याख्यान देऊ लागला तर आम्हास आश्चर्य वाटते. याचा अर्थ हा नव्हे की, तो प्रौढ व्याख्यात्यापेक्षाही अधिक बुद्धिमान आहे. याचे कारण हेच आहे की, एवढ्या अल्पवयीन बालकाकडून एवढ्या सुंदर व्याख्यानाची अपेक्षा नव्हती. हीच स्थिती मानव- निर्मित वस्तूंची आहे. मानव-बुद्धीच्या अल्पतेचा विचार केल्यामुळे विद्युत्प्रकाश आश्चर्यजनक वाटतो. वस्तुतः तो चंद्राच्या प्रकाशापेक्षा अधिक विशाल नाही आणि ते विमानही पक्ष्यांच्या शरीरापेक्षा अधिक विशाल नाही. गंभीर दृष्टीने अवलोकन केले असता उच्चकोटीच्या बुद्धिमानाने केलेली रचना सृष्टिरचनेच्या हजाराव्या भागाची देखील बरोबरी करू शकत नाही. विशालतेच्या दृष्टीने जो संबंध माठाचा आणि सागराचा आहे, तोच मानव-निर्मित वस्तूंचा व नैसर्गिक वस्तूंचा आहे.

□□□

# अध्याय : चौथा

## सृष्टि-कर्ता

सृष्टीमध्ये नियमबद्धता, एकता, प्रयोजन आणि विशालता दिसून येते असे आम्ही मागील भागात दाखवून दिले आहे. त्यापूर्वी सृष्टी हे कार्य आहे असे आम्ही सिद्ध केले होते. या सृष्टीस एक प्रारंभ आहे. म्हणजे एके काळी ही सृष्टी नव्हती आणि मग केव्हा तरी ती उत्पन्न झाली. आता प्रश्न हा उद्भवतो की, सृष्टीचा कोणी कर्ता, रचयिता आहे काय? जर कोणी सृष्टिकर्ता असेल तर आस्तिकता सिद्ध होईल आणि नसेल तर आस्तिकवाद केवळ कल्पनामात्र आहे.

यासंबधी चार प्रकारची निरनिराळी मते आहेत.

१) सृष्टी स्वभावानेच बनली. (स्वाभाविककपणे तयार झाली). या सृष्टीचा रचयिता, कर्ता कोणीच नाही. ही सृष्टी कर्त्याशिवाय अनादि काळापासून बनत आहे, बिघडत आहे.

२) 'कुदरत'-'निसर्ग' किंवा 'नेचर' हेच या सृष्टीचे कारण आहे.

३) सृष्टीची ही रचना आकस्मिक आहे. (अचानक झाली आहे).

४) सृष्टीची रचना करणारी एक ज्ञानमयी सत्ता आहे, जी एका विशिष्ट उद्देशाच्या पूर्ततेसाठी सृष्टीची रचना करीत आहे आणि नाशही करीत आहेत.

अगोदरच्या तीन मतांचा संबंध नास्तिकवादाशी आहे. चौथ्या मताचा संबंध आस्तिकवादाशी आहे. या चौथ्या मताच्या अनेक शाखा आहेत. परंतु या सर्वांचा आधार सृष्टीचे कार्यत्वच आहे. आम्ही इथे क्रमाक्रमानेच या सर्व मतांचा विचार करू.

प्रत्येक कार्यासाठी कारण असते हे निःसंदिग्ध आहे. कारण एकच नसून तीन असतात हेही जाणून घेणे आवश्यक आहे. उदाहरणादाखल : एक माठ घ्या. याचे उपादान कारण (Material Cause) माती आहे. मातीचे बदललेले रुपच माठ आहे. निमित्त कारण (Efficient Cause) कुंभार आहे. जो मातीस माठाचे रूप देतो, आकार देतो. तिसरे साधारण कारण चाक, देश, काळ वैगरे. देश, काळ हे सर्वसामान्य आहेत. पण चाक, काठीसारखी कारणे 'करण' या शब्दाने संबोधिली जातात. ती कार्याप्रमाणे बदलत असतात. एखाद्याला मारण्यासाठी हातच 'करण' साधन होऊ शकते. म्हणून निमित्तकारणामध्ये इतर कारणांची अपेक्षा न करता क्रिया करण्याचे सामर्थ्य असेल तर त्या ठिकाणी वेगळया करणाची (साधनाची) आवश्यकता नाही. निमितकारणामध्ये असलेली शक्तीच करणा (साधना)चे कार्य पार पाडू शकेल.

यापूर्वी 'मिल' महोदयांच्या कथनाचा उल्लेख केला आहे. त्यानुसार सृष्टी ही एक निर्मित वस्तू आहे. म्हणजे अनेक प्रकारच्या घटनांचा, असंख्य क्रियांचा समूहच सृष्टी आहे. या क्रिया अनेक आहेत. एका क्रियेतही अनेक क्रिया असतात.

या असंख्य क्रिया-समूहाचा कोणी कर्ता आहे की नाही? असा एक प्रश्न उत्पन्न होतो. माठाच्या निर्मितीसाठी कुंभार निमित्तकारण आहे तसे एखादे निमित्तकारण सृष्टिरूप कार्यासाठी

आहे की नाही? आस्तिक व नास्तिक यांच्यामध्ये याविषयी वेगवेगळी मते आहेत. जगामध्ये घडणाऱ्या क्रियांची विभागणी दोन प्रकारे होऊ शकते. त्यांपैकी पहिल्या चेतन प्राण्याद्वारे केल्या जाणाऱ्या क्रिया : पुस्तक लिहिणे, घर बांधणे, घरटे तयार करणे, रडणे, हसणे, चालणे, धावणे वगैरे. या क्रियांशी संबंधित निमित्त कारणास कुठे प्रत्यक्ष पाहतो तर कुठे अनुमान करतो. उदाहरणादाखल माझ्या समोर एक कुंभार माठ बनवीत आहे असे समजा. इथे माठाच्या निर्मात्याविषयी शंका मुळीच उद्भवत नाही. प्रत्यक्षं किं प्रमाणम्? हाताच्या काकणाला आरसा कशाला? पण, अगोदरच बनवलेला एखादा माठ मी दुकानातून विकत घेतो. त्या माठाचा निमित्तकारण कुंभार असला तरी प्रत्यक्ष निर्मितीच्या वेळी पाहिलेले नाही. म्हणून त्याचे ज्ञान अनुमान प्रमाणाद्वारे होते किंवा करून घ्यावे लागते. जर वृक्षावर एखादे घरटे दिसले तर तेव्हासुद्धा 'हे कोणत्यातरी एखाद्या पक्ष्याने तयार केले असावे' असे अनुमान आम्ही करतो.

"चार्वाक मतावलंबी अनुमान प्रमाणाचा स्वीकारच करीत नाहीत. ते म्हणतात की, 'अविनाभावस्य दुर्बोधतया नानुमानाद्यवकाशः धूमादि ज्ञानानन्तरमग्न्यादिज्ञानेप्रवृत्तिः प्रत्यक्ष मूलतया भ्रान्त्या वा युज्यते"

(सर्वदर्शन संग्रह - चार्वाक दर्शनम्)

"अनुमानासाठी साधारण कारण असलेला अविनाभाव संबंध (व्याप्ती) सिद्ध होत नसल्यामुळे अनुमान हे प्रमाण होऊ शकत नाही. धुराचे ज्ञान झाल्यानंतर अग्नीचे ज्ञान होण्यासाठी प्रत्यक्ष किंवा भ्रांती हेच कारण आहे.

'तस्य संप्रयुक्तविषयज्ञानजनकत्वेन भवति प्रसरसंभवेऽपि भूतभविष्यतोस्तदसंभवेन सर्वोपसंहारवत्या व्याप्तेर्दुर्ज्ञत्वात् ।

(सर्वदर्शन - संग्रह)

'धूर तेथे अग्नी', हेतु (साधन) आणि साध्य यांचे साहचर्य नियम सिद्ध होऊ शकत नाही. 'जिथे अग्नी आहे तिथे धूर आहे' ही गोष्ट आम्ही दहा-पाच वेळा पाहिली आहे. पण, भूतकाळामध्ये किंवा वर्तमानकाळामध्ये हा नियम असाच कायम राहील असे म्हणण्यासाठी कोणता आधार आहे?

आम्ही याविषयी येथे हे सांगू इच्छितो की, 'अनुमान हे प्रमाण नव्हे' असे म्हणण्यासाठी चार्वाकाजवळ असलेले प्रमाण कोणते? अनुमान, उपमान यांना ते स्वीकारीत नाहीत. 'शब्दास' सुद्धा ते प्रमाण म्हणून स्वीकारीत नाहीत. मग 'अनुमान' हे प्रमाण नाही असे म्हणण्यासाठी शब्द प्रमाण कसे सहायक होऊ शकते? केवळ प्रत्यक्ष प्रमाणाच्या आधारावर इतर प्रमाण प्रमाण कोटीत नाहीत हे ते कसे सिद्ध करू शकतात? एवढेच नव्हे तर चार्वाकांच्या व्यवहारावरून असे दिसून येत आहे की, त्यांची बुद्धी त्यांना 'अविनाभाव' संबंध स्वीकारण्यासाठी भाग पाडीत आहे. ते म्हणतात की –

"अङ्गनालिङ्गनाजन्यसुखमेव पुमर्थता"

स्त्रीच्या आलिंगनाद्वारे होणारे सुख हेच परम पुरुषार्थ आहे. सुख आणि स्त्री-संबंध यांचा अविनाभाव संबंध (अतिघनिष्ठ संबंध) चार्वाकांना मान्य आहे की नाही? मान्य नसेल तर यांचा पुरुषार्थही सिद्ध होऊ शकत नाही. मान्य असेल व भविष्यकाळामध्ये त्याचा अपवादही शक्य असेल तर 'अविनाभाव' स्वीकार केल्यानंतर अनुमान हे प्रमाण आहे हे स्वीकारण्यात अडचण तरी कोणती? म्हणून चार्वकांचे मत तर्कसंगत नाही असे दिसून येते. चार्वाक असो की इतर कोणी! प्रत्येकजण आपल्या जीवनातील अधिकांश कार्य अनुमानाच्या आधारावरच पार पाडीत असतो. चार्वाक आणि त्यांच्या अनुयायांच्या घरात जे अन्न शिजविले जाते ते 'थोड्या वेळानंतर भूक लागेल, अन्नाची आवश्यकता भासेल' या अनुमानाच्या आधारावरच शिजविले जाते ना! मानवाला कार्य करण्याची जी प्रेरणा मिळते ती अनुमानास प्रमाण स्वीकारल्यामुळेच. 'हे कार्य केले तर हे फळ मिळते', असे अनुमान अगोदर करूनच सर्वजण कार्याचा प्रारंभ करतात. अनुमानाचा स्वीकार नाही केला तर प्रत्यक्ष - प्रमाणाचीही उपयोगिता नाहीशी होते. अनुमानाची सहायता करणे हीच प्रत्यक्षाची उपयोगिता आहे. प्रत्यक्ष हे वर्तमानकाळातच घडते. त्याच्या आधारावर भविष्यासंबंधीच्या कार्याची योजना आखली जाते. म्हणून अनुमान हे प्रमाण आहे हे स्वीकार करणे आस्तिकवादासाठीच नव्हे तर सर्वांसाठीच आवश्यक आहे.

अनुमान हे प्रमाण आहे की नाही? याचा विचार करण्यापूर्वी मानवाद्वारे किंवा इतर प्राण्यांद्वारे त्यांच्या कर्त्याविषयी विचार केला जातो असे लिहिले होते. याविषयी आस्तिक व नास्तिक दोघेही मतभेद बाळगीत नाहीत. एखादी खुर्ची पाहून 'ही एका सुताराने बनविली आहे' हे जसे आस्तिक समजतो तसेच नास्तिकसुद्धा समजतो. वृक्षाची उत्पत्ती, सूर्यचंद्राचा उदय-अस्त, भूकंप इत्यादी अनेक क्रिया आणि वस्तू यांविषयी विचार करावयाचा आहे. याचा एखादा कर्ता आहे की नाही? या सर्व क्रिया 'साध्यकोटी'च्या आहेत. या अगोदर उल्लेखिलेल्या 'सिद्धकोटी'च्या होत्या. म्हणजे त्या वस्तूंचे निर्माते आहेत हे निर्विवाद आहे. हा विचार दोघांनाही मान्य आहे. दुसऱ्या प्रकारच्या - साध्यकोटीच्या वस्तू आणि क्रिया यांच्याविषयी मतभेद आहे. पहिल्या प्रकारच्या वस्तूसाठी आणि क्रियेसाठीसुद्धा कर्त्याची आवश्यकता आहे असे आस्तिकांचे म्हणणे आहे. पहिल्या प्रकारच्या क्रियांचा व त्यांच्या कर्त्यांचा अविनाभाव सबंध आहे हे निश्चित झाले आहे. प्रत्यक्ष हेच यासाठी प्रमाण आहे. हीच युक्ती दुसऱ्या प्रकारच्या क्रियेसाठी वापरता येईल की नाही हा प्रश्न आहे. आमच्या मते ही युक्ती वापरण्यासाठी कोणताच दोष दिसून येत नाही. प्रत्येक क्रियेसाठी कर्ता आवश्यक आहे हे सिद्ध झाले असताना भूकंप वगैरे सृष्टिरचनेशी संबंधित क्रियेसाठी कर्ता आवश्यक नाही असे कसे म्हणता येईल? पहिल्या प्रकारच्या क्रियेसाठी कर्त्याची आवश्यकता आहे. पण दुसऱ्या प्रकारच्या क्रियेसाठी नाही असे नास्तिकांचे म्हणणे आहे. खुर्ची बनविण्यासाठी सुतार (कर्ता) आवश्यक आहे; पण पर्वतासाठी नाही; तांब्या, चंबूसाठी तांबटकरी आवश्यक आहे; पण तळे, नदी, समुद्रासाठी नाही. हाच आहे नास्तिकांच्या म्हणण्याचा हेतू. तुमचे म्हणणे सिद्ध करण्यासाठी एखादा दृष्टांत द्या पाहू असे म्हणताच 'साध्यकोटी'तील क्रियापैकी

एखादा दृष्टांत ते देऊन टाकतात. लक्षात घेण्याजोगी बाब ही आहे की, जगातील क्रियांची विभागणी दोनच प्रकारे होऊ शकते. एक 'प्राणिकृत' ज्या 'सिद्धकोटी'मध्ये आहेत. दुसरे 'अप्राणिकृत' ज्या 'साध्यकोटी'त आहेत. 'सिद्धकोटी'च्या क्रिया किंवा वस्तूच दृष्टांताचे कार्य करू शकतात. साध्यकोटीच्या नाही. आस्तिक-नास्तिकांपैकी कोणासही 'साध्यकोटी'च्या क्रियेस दृष्टान्तासाठी वापर करण्याचा अधिकार नाही. न्यायशास्त्रात हेच वर्णन केले आहे. न्यायशास्त्राचा नियम असा आहे :

**''लौकिक परीक्षकाणां यस्मिन्नर्थे बुद्धिसाम्यं स दृष्टान्तः''** वादी- प्रतिवादी दोघांना मान्य असलेलेच दृष्टांत होऊ शकते. म्हणून आपले म्हणणे सिद्ध करण्यासाठी नास्तिकांजवळ कोणताच दृष्टांत नाही. हा विषय अधिक स्पष्ट होण्यासाठी पुढील विवेचन आवश्यक आहे. सूर्य, चंद्र अशा पदार्थांची रचना करणारा कोणी तरी आहे हे साध्य (सिद्ध करावयाचे) आहे. हा आस्तिकांचा पक्ष आहे. आस्तिक हे सिद्ध करण्यासाठी ''खुर्ची तयार करण्यासाठी जसा सुतार आवश्यक आहे, त्याचप्रमाणे सूर्यासाठीसुद्धा कर्ता आवश्यक आहे'' हा हेतू (कारण) देतो. इथे दिलेले खुर्चीचे उदाहरण दोघांसही मान्य आहे. कारण खुर्चीच्या कर्त्यास दोघेही पाहतच आहेत. हा सिद्धकोटीचा दृष्टांत आहे. पण नास्तिक म्हणतो की, 'सूर्यादीच्या रचनेसाठी कर्ता आवश्यक नाही. हे साध्य (सिद्ध करावयाचे) आहे. नदीच्या प्रवाहाला वाहून नेणाऱ्याची जशी आवश्यकता नाही तशीच सूर्यास कर्त्याची नाही.' आपला पक्ष- म्हणणे सिद्ध करण्यासाठी नास्तिक हा हेतू (कारण) देतो. पण हा दृष्टांत (उदाहरण) सिद्धकोटीचा (दोघास मान्य किंवा सिद्ध झालेला) नाही. साध्यकोटीचा आहे. कारण, हे उदाहरण आस्तिक स्वीकार करू शकत नाहीत. आस्तिकासाठी नदीचे वाहणे, सूर्याचे उगवणे, हे दोन्ही एकाच श्रेणीचे आहेत. म्हणून हे उदाहरण ठीक नाही. हे दोघांना मान्य नाही. सिद्धकोटीच्या क्रियांना नास्तिक स्वीकारीत नाहीत. कारण, सिद्धकोटीची जेवढी उदाहरणे आहेत ती त्यांच्या मताची पोषक नसून विघातक आहेत. 'साध्यकोटीतून उदाहरण घेण्याचा त्यांना अधिकार नाही. 'सिद्धकोटी' म्हणजे 'प्राणिकृत क्रिया' आणि 'साध्यकोटी' म्हणजे 'अप्राणिकृत क्रिया', या दोन श्रेणींच्या बाहेर नास्तिकांना कोणतेच उदाहरण (दृष्टांत) सापडत नाही. म्हणूनच नास्तिकांचा पक्ष उदाहरण सापडत नसल्यामुळे निर्बळ आहे. सुताराशिवाय खुर्ची, घड्याळाच्या निर्मात्याशिवाय घड्याळ बनू शकत नाही, हे जर नास्तिक स्वीकारीत असेल तर नदी, पर्वत, सूर्य, चंद्र वगैरेसुद्धा एका चेतनसत्तेशिवाय बनू शकत नाहीत हेही स्वीकारावेच लागेल.

काही जणांनी 'कारण' आणि 'कार्य' यांच्या बाबतीत आपत्ती घेतली आहे. 'कारण' म्हणजे काय? दोन घटनांपैकी पहिली घटना 'कारण' आणि नंतरची 'कार्य' आहे. यापेक्षा अधिक 'कार्य' व कारणा'चा कोणताच संबंध नाही,' असे ते म्हणतात. जर कार्य-कारणाचा संबंध सिद्ध होत नसेल तर आस्तिकतेचा पायाच डळमळीत होईल. याविषयी आर्मस्ट्राँग काय लिहितात ते पाहणे उपयोगाचे होईल.

''जॉन स्टुअर्ट मिलनी ह्यूमची एक जुनी युक्ती घेऊन व तिचा विस्तार करून 'नेहमीच

कार्यापूर्वी असणारे' कारण आहे. यापेक्षा कारणाची अधिक व्याख्या करता येत नाही,' असा निश्चय दर्शविला आहे. एखादी घटना दुसऱ्या घटनेच्या नेहमीच पूर्वी होत असेल तर त्या दोन्ही घटना आमच्या मनामध्ये अशा प्रकारे निगडित होतात की, आम्ही पहिल्या घटनेस कारण आणि दुसरीस कार्य समजू लागतो.''

पण काळजीपूर्वक निरीक्षण केले असता मनोविज्ञानाच्या बाबतीत हा एक फार मोठा भ्रम आहे आसे दिसून येईल. शिक्षित व अशिक्षित, लहान-मोठा या सर्वांना कार्यकारणासंबंधी पुसटशी कल्पना आहे. ही जाणीव केवळ पूर्वापार संबंधाने होऊ शकत नाही. आईला भाकरी करताना पाहून 'आई ही भाकरीचे निमित्तकारण आहे' असे मुलगा समजतो. तो 'कार्य' 'कारण' शब्दाचे ज्ञान बाळगत नाही पण त्या दोन्हीतील संबंधाची जाणीव त्याला आहे. आईने भाकर बनविल्यापासून भाकर मुलाजवळ पोहचेपर्यंत मधेच कितीतरी घटना घडून जातात. पण, तो त्या घटनांना भाकरीचे कारण समजत नाही. फक्त, आईच कर्जी आहे असे समजतो. 'चूल' हे निमित्तकारण आहे असे तो कधीच समजत नाही. त्याला स्वाभाविकपणे ही जाणीव आहे की, भाकरी बनविणारी 'सत्ता' आई आहे. मुलाच्या स्वच्छ हृदयात जिथे आस्तिकता- नास्तिकतेचा लवलेशही नाही, जे पक्षपातापासून अगदीच दूर आहे; तिथे कार्य-कारण संबंधाचे ज्ञान कसे उपजले? मिल आणि ह्यूम महोदयांनी आपापल्या विशेष मतांच्या मांडणीसाठी कीस काढण्याचा प्रयत्न केला आहे. पण, मुलगा या गोष्टीपासून अगदीच दूर असल्यामुळे जे खरे आहे ते सहजपणे दाखवून देतो. अशिक्षित, आदिवासीच नव्हे तर पशू, पक्षीही (पाळीव कुत्रे, पोपट, मैना) असे ज्ञान बाळगतात. केव्हा केव्हा पूर्वापार संबंध आणि कार्यकारणसंबंध यांची गल्लत केल्यामुळे चूक होऊ शकते. कारण नेहमीच कार्यापूर्वी असत असले तरी जे पूर्वी असते ते सर्व कारणश्रेणीत येतात म्हणणे चुकीचे आहे. 'आर्मस्ट्राँग' (गॉड अँड द सोल पृ.४५) या पुस्तकात सोमवार नेहमी मंगळवारपूर्वी येतो किंवा अंधार नेहमी सूर्योदयापूर्वी असतो. म्हणून त्यांना कारण म्हणावयाचे काय? असे म्हणून आमच्या विधानाला दुजोरा दिला आहे.

डॉक्टर वार्डनी कारणाबाबतीत उत्तम विवेचन केले आहे. **''मनुष्याच्या इच्छाशक्तीचा त्याच्या शारीरिक क्रियेमध्ये प्रवेश'' ''कार्य कारणाच्या नंतरच होत नसून कारणाद्वारे होतो. हे त्याचे कार्य किंवा परिणाम आहे. इच्छाशक्ती हीच क्रियेची कारण आहे.''**

वार्डपेक्षासुद्धा उत्कृष्ट व्याख्या अन्नंभट्टनी आपल्या 'तर्क-संग्रह'च्या 'तर्क-दीपिकेत' केली आहे.

**''उपादानगोचरापरोक्षज्ञानचिकीर्षाकृतिमत्त्वं कर्तृत्वम्'**

कर्ता किंवा निमित्तकारण होण्यासाठी खालील बाबी आवश्यक आहेत.

१. उपादानगोचर.... : उपादानकारणाचे प्रत्यक्ष ज्ञान असणे. जसे कुंभारास मातीचे ज्ञान असते.
२. चिकीर्षा : कार्य करण्याची इच्छा
३. कृतिमत्त्व : क्रिया किंवा प्रयत्न

या तीन बाबी बाळगणारा निमित्तकारण किंवा कर्ता होऊ शकतो. ज्ञान, चिकीर्षा आणि कृती यातसुद्धा कार्यकारण संबंध आहे. ज्ञानाशिवाय इच्छा, इच्छेशिवाय क्रिया उत्पन्न होणे शक्यच नाही. इच्छाशक्तीसुद्धा कर्तृत्वाचे विशेष लक्षण आहे. कारण, इच्छा उत्पन्न होण्यापूर्वीच ज्ञान असते. तेथेच क्रिया होऊ शकते.

अशा प्रकारे इच्छाशक्तीचा 'कारणत्वा'शी विशेष संबंध आहे. इच्छाशक्ती नसलेली घटना दुसऱ्या घटनेच्या पूर्वी कितीही वेळा पाहण्यात आली तरी ती कारण समजली जाऊ शकत नाही. आम्ही घराच्या छताच्या कडीपासून माती पडत असलेली अनेक वेळा पाहतो. पण, माती पडण्याचे निमित्तकारण छताची कडी आहे असे कधीच समजत नाही. पण, एखाद्या मनुष्याला छतापासून माती पाडताना पाहून लगेच म्हणू लागतो की, माती या मनुष्याने पाडली आहे. माती पडण्याचे निमित्तकारण तो मनुष्य आहे. अगोदरच्या उदाहरणामध्ये इच्छा शक्ती नसणे आणि दुसऱ्यामध्ये इच्छाशक्ती असणे हेच याचे कारण आहे.

प्रत्येक कार्यासाठी निमित्तकारण, प्रत्येक निमित्तकारणास इच्छाशक्ती असणे हे अनिवार्य आहे. या दोन्ही बाबी मनुष्याच्या बुद्धीत ठाण मांडून बसल्या आहेत. यांच्यापासून सुटका होणे शक्य नाही. आधुनिक काळात मानवीय ज्ञाननियमावर (Thery of Knowledge) तत्त्वशास्त्राचा आधार ठेवला जात आहे. तत्त्वज्ञानासाठी ज्ञानतत्त्वाची आवश्यकता उद्घोषिली जात असताना प्रत्येक युगात, प्रत्येक देशात मानवबुद्धीवर शासन करणाऱ्या नियमाची उपेक्षा कशी करता येईल? वास्तविक पाहता प्रत्येक क्रियेशी इच्छाशक्तीचा संबंध जोडणे मानवास एवढे आवश्यक आणि स्वाभाविक वाटते की, जिथे इच्छाशक्ती प्रत्यक्षात दिसत नाही तिथे कल्पनेने का होईना, इच्छाशक्तीची पूर्तता केली जाते. एखाद्या पर्वतातून अग्नी बाहेर पडत असेल, पेटवणारा दिसत नसेल तर अदृष्टदेवता किंवा देवीच्या उपस्थितीची कल्पना केली जाते. जर आम्ही प्रत्येक देशाच्या वेगवेगळया देवी-देवतांच्या कथांचा विचार केला आणि शोध घेतला तर असे आढळेल की, अमुक मनुष्याने किंवा अमुक जमातीने त्याची कल्पना एखाद्या घटनेचा संबंध इच्छाशक्तीशी जोडण्यासाठीच केली होती. इच्छाशक्ती आणि घटना यांचा संबंध त्यांनाही मान्य होता असे दिसते. इच्छाशक्ती नसताना एखादी घटना घडू शकते असा विचार ते कधीच करू शकणार नाहीत.

आगरा येथील ताजमहाल पाहून विद्वान आणि मूर्खसुद्धा शहाजहानच्या किंवा त्याच्या कारागिरांच्या इच्छाशक्तीचा विचार केल्याशिवाय ज्याप्रमाणे राहू शकत नाहीत, त्याचप्रमाणे ताजमहालपेक्षा अनंतपटीने अधिक सौंदर्य बाळगणारे ताजमहलच्या तळयात उगवलेले कमळाचे फूल पाहून त्याची रचना करणाऱ्या इच्छाशक्तीचा विचार केल्याशिवाय बुद्धी कशी शांत राहील? पण, अंतर केवळ एवढेच आहे की, जी वस्तू केव्हातरी पाहिली जाते तिची थोडीशी सुंदरतादेखील आकृष्ट करते. जी वस्तू दररोज किंवा नेहमीच पाहिली जाते त्याबद्दल आम्ही फारसे विचार करत नाही. ताजमहल पहिल्यांदा पाहणाऱ्या मनुष्याच्या मनावर निर्मात्याच्या बुद्धीचा जेवढा प्रभाव

पडतो तेवढा प्रभाव दररोज ताजमहल पाहणाऱ्या व्यक्तीच्या मनावर थोडाच पडणार? पण थोडा विचार केला तर आम्हाला निर्मात्याची ओळख होऊ शकते. कणाद मुनींनी "कारणाभावात् कार्यभाव:" म्हणजे कारणाशिवाय कार्य होऊ शकत नाही' असे म्हटले आहे. प्रत्येक व्यक्ती, प्रत्येक अवस्थेत कोणत्या तरी स्वरूपात हे तत्त्व स्वीकार करीत आलेली आहे.

काहींचे म्हणणे आहे की, जगात अनेक घटना आकस्मिक (अचानक) पणे घडून येतात. त्यांचे एखादे विशेष कारण दिसत नाही. ही सृष्टीसुद्धा आकस्मिकपणे (By Chance) उत्पन्न झाली असे का समजले जाऊ नये? या बाबतीत 'अकस्मात्' शब्दाचा अर्थ शोधणे आवश्यक आहे. 'बाजारात जात असताना अकस्मात् (अचानक) एका मित्राची भेट झाली'. इथे अकस्मात् शब्दाचे तात्पर्य काय आहे? आम्ही बाजारात चाललो होतो. मित्रास भेटण्यासाठी चाललो नव्हतो. मित्रही येत असेल, ही आशा नव्हती. पण, तोही आला. इथे 'मित्रांची आणि आमची भेट' एखाद्या निमित्तकारणाशिवाय आहे काय? मुळीच नाही. मित्राच्या येण्याचे निमित्तकारण मित्राची इच्छाशक्ती आणि आमच्या जाण्याचे निमित्तकारण आमची इच्छाशक्ती आहे. आम्ही या भेटीस 'आकस्मिक' म्हणण्याचे कारण एवढेच की, दोन्ही घटना इच्छाशक्तीद्वारेच घडल्या असल्या तरी या दोन्हीमध्ये पूर्वीपासून कोणताच संबंध नव्हता. दोन स्वतंत्र आणि संबंधित नसलेल्या इच्छाशक्तीद्वारे उत्पन्न झालेल्या घटनेच्या संयोगास 'आकस्मिक' म्हटले गेले. पूर्वी संबंध जुळला असता तर 'आकस्मिक' शब्द वापरता आला नसता. म्हणून आकस्मिक घटनादेखील कारणाद्वारेच घडून येत असतात. 'सृष्टिरचना आकस्मिक आहे' असे म्हणणाऱ्यांचा हेतू तरी काय आहे? पूर्वीप्रमाणेच अर्थ घेत असाल तर 'सृष्टीच्या वेगवेगळया घटना वेगवेगळया, स्वतंत्र व असंबद्ध इच्छाशक्तीद्वारे उत्पन्न होऊन एकत्रित झाल्या आहेत' असाच अर्थ होईल. एक शक्ती नद्यांना बनवत होती. दुसरी पर्वतांना, तिसरी ढगांना व चौथी वायुमंडळास बनवत होती. या शक्ती स्वतंत्र आणि असंबद्ध होत्या. जेव्हा वस्तू तयार झाल्या तेव्हा कोणत्याही कारणाशिवाय 'आकस्मिक'पणे त्यांचे एकत्रीकरण झाले.

अशा प्रकारचा विचार बाळगणारे इच्छाशक्तीरूपी निमित्तकारणाचा निषेध करीत नाहीत. केवळ या कारणांच्या परस्पर संबंधाचा निषेध करतात. किंवा असेही म्हणता येईल की, एका ईश्वराचा निषेध करण्यासाठी हजारो ईश्वरांचा स्वीकार करीत आहेत. ही नास्तिकता नसून विशिष्ट आस्तिकता आहे. 'आकस्मिक' शब्दाचा अभिप्राय 'या घटनांचा कोणत्याच इच्छाशक्तीशी संबंध नाही' असा असेल तर ही केवळ कल्पना आहे. इच्छाशक्तीशी संबंध नसलेली 'आकस्मिक' घटना जगात कधी घडली नाही, कधी घडणार नाही. अशी घटना कुणी पाहिलीही नाही, ऐकलीही नाही. एवढेच नव्हे तर मानवीय भाषेत असा उल्लेखसुद्धा कुठेच आढळून येत नाही.

फ्लिण्ट महोदयांचे विवेचन पाहणे या संदर्भात योग्य राहील. "नियम नसलेली 'आकस्मिक' घटना घडून येणे शक्य नाही." दोन किंवा अनेक स्वतंत्र घटना अगोदर न ठरवता जुळत असतील तर 'आकस्मिक' शब्द वापरतो. घराच्या छताखालून जाणाऱ्या व्यक्तीवर वरून छताचा एखादा

भाग कोसळला तर त्या घटनेस 'आकस्मिक' म्हणतो. ईश्वराच्या सर्वज्ञत्वावर, सर्वनियन्तृत्वावर व प्रबन्धकत्वावर ज्यांचा विश्वास आहे त्यांच्या मते वरील घटनेची 'आकस्मिकता' नावापुरतीच आहे. तरी पण आस्तिक अशा प्रकारच्या किंवा इतर कोणत्याही घटकांना 'आकस्मिक' शब्दाने व्यवहार करण्याचा अधिकार नास्तिकांना नाही असे म्हणत नाहीत. पण, भौतिक, मानसिक नियमांशी घटना निगडित नसतील तर आकस्मिक शब्द निरर्थकच आहे असे आस्तिकांचे मत आहे.

एवढेच नव्हे तर प्रकृती (परमाणू) स्वयंभू, अनादि आहे असे स्वीकारले तरी प्रकृती (परमाणू) 'प्रबन्ध' कसे करू शकते? प्राकृतिक परमाणू ईश्वराच्या क्रियेची अपेक्षा न करताच एवढ्या विविध सृष्टीची रचना करू शकतात असे स्वीकारणे, इंग्रजी भाषेच्या अक्षरांनी जगद्‌विख्यात शेक्सपिअरच्या बुद्धीची अपेक्षा न बाळगता नाटकाची रचना केली असे समजण्यापेक्षाही अधिक विसंगत आहे. केव्हा केव्हा कुठेतरी दूर देशामध्ये दीर्घकाळात परमाणू एकमेकाशी संयुक्त होऊन एखादी वस्तू बनणे शक्य आहे. पण ते अशा प्रकारच्या सुंदर, सुदृढ, विविधतेने नटलेल्या विशाल सृष्टीची रचना करण्यास समर्थ होऊ शकत नाहीत. परमाणूंना बुद्धिपूर्वक एका क्रमामध्ये ठेवल्याशिवाय अशा प्रकारची सृष्टी बनणे शक्य नाही. बुद्धीचा, ज्ञानाचा पूर्णतः अभाव असणाऱ्या परमाणूंनी एक क्रमबद्ध सुंदर, उद्देश्यपूर्ण रचना स्वतःच केली असे स्वीकार करणे आजपर्यंतच्या मोठमोठ्या अंधविश्वासाची परमोच्च सीमाच होय. तरी पण खरे नास्तिक या भयंकर अकस्मात्-वादाचा तिरस्कार करू शकत नाही. सृष्टि-रचनेच्या ज्या व्याख्या डिमाक्रीटस आणि ऐपीक्यूरसपासून डीडरट आणि लैंग इत्यादीपर्यंत प्रकृतिवादी नास्तिकांनी केलेल्या आहेत, त्या तत्त्वाचा आधार हाच एक विचार आहे की, प्रकृतीचे नित्य असलेले परमाणू अनेक प्रकारे संयुक्त होतात आणि भूतकाळात अनेक प्रकारे जे संयोग झालेले आहेत आणि भविष्यकाळात होणारे आहेत त्यापैकीच एक आमची ही वर्तमान सृष्टी आहे. ग्रीक भाषेच्या अक्षरांना अनेक वेळा वर फेकले तर ते इलियड व ग्रीक भाषेचे इतर ग्रंथ बनवू शकतात असेच म्हणावे लागेल. 'संभव किंवा शक्यवादा'मध्ये यापेक्षा अधिक निरर्थक, बाष्कळ विचार कधीच स्वीकारला गेला नाही. विचाराची पृष्ठभूमी नसताना अक्षरांना कितीही वेळा वर फेकले तरी तुम्ही त्याद्वारे एखादा 'भाव' प्रगट करू शकत नाही. एकीलीजच्या क्रोधाचे व ट्रायच्या युद्धाचे काव्यामध्ये वर्णन करण्याची इच्छा होमरने केली नसती तर इलियडच्या अक्षरांना संपूर्ण मानवजातीने सृष्टीच्या प्रारंभापासून आजपर्यंत अहोरात्र फेकण्याचे काम चालू ठेवले असते तरी इलियडची पहिली ओळसुद्धा बनली नसती. एवढेच नव्हे, या सृष्टीरूपी काव्यासमोर, ईश्वरीय नाटकासमोर इलियड आहेच किती? तुलना न केलेली बरी! वस्तूच्या रचनेसाठी समर्थ नसलेले परमाणू आकाशात उडत असताना एकमेकांशी संबंधित होऊन इच्छाशक्तीची सहायता नसताना अशा विशाल सृष्टीची रचना करू शकतात काय? विश्वास ठेवणरे ठेवोत बापडे! मला मात्र 'अरेबियन् नाइट्स'च्या कथांवर विश्वास ठेवणे यापेक्षाही अधिक सोपे आहे असे वाटते.

उच्चकोटीच्या विद्वानांनादेखील समजण्यासाठी दुर्बोध अशा पदार्थांची रचना प्रकृतीच्या परमाणूंनी आकस्मिकपणे एकमेकांशी संयुक्त होऊन केली असे डोळे असून आंधळेपणाचे, कान असून बधिरतेचे नाटक करणाराच करू शकतो. वैद्य रोग दूर करु शकतो. पण ज्याला मुळी रोगच नाही, पण रोग आहे असा संशय आहे त्याचा रोग वैद्य तरी कसा दूर करणार? हीच स्थिती अकस्मात्वाद स्वीकार करणाऱ्यांची आहे. जगामध्ये आकस्मिक रचनेला सिद्ध करण्यासाठी उदाहरण (दृष्टांत) आढळतात काय? ग्रीक वर्णमालेस अव्यवस्थितपणे उडवत, फेकत राहिल्याने काही काळानंतर घुणाक्षर न्यायाप्रमाणे 'इलियड' तयार होऊ शकेल काय? घुणाक्षर न्यायासाठी सुद्धा वाळवी पाहिजेच ना! ग्रीक भाषेची अक्षरे हजारो वर्षांसून व्यवहारात वापरली जात आहेत ना! होमरनी थोड्याच दिवसांच्या परिश्रमानंतर निर्मिलेल्या इलियडसारखे अजून काही ग्रंथ एवढ्या सुदीर्घ काळापासून ग्रीक भाषेच्या अक्षरांपासून का बनले नाहीत? या प्रकृतिवादी नास्तिकांना असे विचारणे आवश्यक वाटते की, तुमच्या घरात गहू स्वतः रूपांतरित होऊन भाकरी का बनवीत नाहीत? मातीचे कण एकत्रित येऊन विटा का बनवीत नाहीत? विटा स्वतः गती धारण करून घराची निर्मिती का करीत नाहीत? परमाणूमध्ये आकस्मिक रीतीने गती उत्पन्न होऊन सूर्य, चंद्र, पृथ्वी वगैरे बनू शकतात हे कुणीही बुद्धिमान स्वीकारू शकत नाही. विचारशील व्यक्तींनाही एक लक्षात न येण्याजोगी बाब आहे. आकस्मिकपणे परमाणू संयुक्त होऊन जाज्वल्यमान सूर्य जर बनू शकत असेल तर लहानसा दिवा का बनू नये? मोठमोठ्या नद्या बनू शकत असतील तर लहानशी विहीर का बनू नये? आकाशाला गवसणी घालणारा महामेरू पर्वत बनू शकतो तर लहानशी झोपडी का बनत नाही? मानवाचे रहस्यमय शरीर बनू शकते तर एखादा लहानसा चरखा का बनू नये? अकस्मात् म्हणजे यापूर्वी ज्या वस्तू बनल्या त्या बनल्या, सर्व वस्तू थोड्याच बनू शकतात! आता थोडक्याच नवीन बनणार आहेत? असे म्हणाल तर आम्ही विचारू इच्छितो की, तुमच्या जवळ आकस्मिक वादासाठी प्रमाणच काय आहे? तुम्ही पर्वताकडे पाहून हे अकस्मात् बनले आहे असे स्वीकारता मग ताजमहालाकडे पाहूनसुद्धा असा विश्वास का करीत नाही? अकस्मात्वाद स्वीकारला तर पुरातत्त्ववेत्यांचे सर्वच प्रयत्न निरर्थक ठरतील. पृथ्वीमध्ये दबलेल्या प्राचीन इमारती पाहून त्यांच्याशी ऐतिहासिक मानव मस्तिष्काचा संबंध शोधणे हे व्यर्थच ठरणार नाही काय? त्या इमारतीसुद्धा आकस्मिक- अचानकच तयार झाल्या आहेत ना!

काहींचे म्हणणे आहे की, सृष्टिकर्ता, जगद्रचयिता कोणीच नाही. जे काही घडून येत आहे ते सर्व कुदरत किंवा नेचर (Nature) मुळेच. नेचर पर्वतांची निर्मिती करतो. सूर्य, चंद्र, मेघ या सर्वांना नेचरनेच बनवले आहे, बनवीत आहे. 'कुदरत' किंवा 'नेचर' यास मराठीत 'निसर्ग' हाच एक पर्यायी शब्द सापडतो. नेचरवादी - निसर्गवादी या शब्दांचा प्रयोग कोणत्या अर्थाने करतात हे सांगणे कठीण आहे. नेचर, कुदरत, निसर्ग ही बुद्धी, इच्छा बाळगणारी सत्ता आहे काय? तसे असेल तर आस्तिका-नास्तिकांमध्ये केवळ शब्दाचेच अंतर आहे. आस्तिक ज्या सत्तेस ईश्वर म्हणतात त्याच सत्तेस नास्तिक नेचर किंवा कुदरत म्हणतात. केवळ शब्दासाठी मतभेद, विरोध

यांची काहीच आवश्यकता नाही.

पण नेचर म्हणजे सृष्टिनियम. तेच सृष्टी निर्माण करणारे आहेत असे म्हणत असतील तर व्यापाराच्या नियमांना 'व्यापारी' म्हणणे जेवढे चुकीचे आहे तेवढेच सृष्टिनियमांना सृष्टिकर्ता म्हणणे चुकीचे ठरेल. नेचरवाद्यांचा या शब्दाशी कोणते तात्पर्य आहे याविषयी ते कधीच विचार करीत नाहीत असे मला वाटते. ते एका विलक्षण भ्रमामध्ये आहेत व याच भ्रमात राहू इच्छीत आहेत.

नेचर, निसर्ग, कुदरत म्हणजे नेमके काय हेही पाहणे आवश्यक आहे. नेचर एखाद्या विशेष पुरुषांचे नाव नसेल तर ती नेमकी कोणती वस्तू आहे? ती सृष्टिरूपी कार्याचे कारण कसे होऊ शकते? बहुतेक असे आढळून येते की, बरेच जण कारण शब्दाचा प्रयोग विचार न करताच करीत असतात. पर्यायवाची (समानार्थक) शब्द एखाद्या गोष्टीची व्याख्या करू शकतात. पण त्यांचे कारण सांगू शकत नाहीत. या शब्दाचा अधिक दुरुपयोग वैद्यांकडे आढळतो. 'अमुक व्यक्ती' का मरण पावली? असे विचारल्यास त्याची 'हृदयगती बंद झाली' असे सर्वसामान्यपणे उत्तर मिळते. प्रश्न करणारा मृत्यूचे कारण विचारीत होता. उत्तरादाखल मृत्यूचा समानार्थक शब्द सांगण्यात आला. हृदयगती बंद होणे आणि मृत्यू होणे या दोन्ही एकच बाबी आहेत. इथे कार्य-कारण संबंध मुळीच नाही. मृत्यू होईल तर हृदयगती बंद होईलच. हृदयाची गती थांबेल तर मृत्यू होईलच. एक घटना घडावी आणि दुसरी घडू नये असे होणे शक्यच नाही. मृत्यू हे हृदयाची गती बंद होण्याच्या अवस्थेचेच नाव आहे. अशाच प्रकारे जेव्हा नास्तिकांना विचारले जाते की, सृष्टि रचनेचे कारण काय आहे तर ते म्हणतात 'नेचर' 'कुदरत' निसर्ग. 'नेचर' म्हणजे काय असे त्यांना विचारले असता 'सृष्टि-नियम' असे उत्तर देतात. याचा अर्थ हाच आहे की, सृष्टिरचनेचे कारण 'सृष्टि-नियम' आहेत. 'सृष्टि-नियम' म्हणजे तरी काय असे विचारले असता 'जर अनेक घटना एकाच प्रकारे झाल्या तर त्यास नियम' असे म्हणतात, असे उत्तर देतात. त्या घटना एकाच प्रकारे घडून येण्याचे कारण काय आहे असे विचारले, तर पुन्हा अगोदरचेच उत्तर 'सृष्टि-नियम' किंवा 'निसर्ग' हे त्याचे कारण आहे असे सांगतात. अशा प्रकारे आमची युक्ती घाण्याच्या बैलाप्रमाणे एकाच परिघावर चक्कर मारीत असते. वस्तुतः सृष्टीमध्ये घडणाऱ्या घटना आणि सृष्टिनियम हे दोन्ही पर्यायवाची आहेत. या दोन्हीत मुळीच भेद नाही. या दोन्हीत कार्यकारणसंबंधाची कल्पना करणे फार मोठी चूक आहे.

सृष्टि व्यवस्थेचे कारण सृष्टि-नियम आहे, असे म्हणणे ही केवळ पळवाट आहे. नियम हीच व्यवस्था आहे. प्रश्न हा आहे की, नियम हे ज्ञानपूर्ण आहेत की ज्ञानशून्य आहेत? हे ज्ञानशून्य आहेत असे बुद्धिमान कधीच स्वीकार करू शकत नाही. डॉक्टर ह्वेविल यांचे म्हणणे आहे की, घटनांमध्ये संबंध दर्शविणाऱ्या किंवा त्यांच्यावर शासन करणाऱ्या नियमांच्या अस्तित्वाद्वारे अगोदरपासूनच विचारविनिमय करून नियमाची स्थापना करणाऱ्या, शासन करणाऱ्या एका ज्ञानवान शक्तीची जाणीव होते. वेगवेगळ्या घटनांना देश, काळ आणि संख्या, परिमाण यांच्या

नियमात बांधणे हेच विचार व बुद्धीचे सूचक आहे. ज्ञानपूर्ण प्रयत्नाद्वारे विचार करण्यास भाग पाडणाऱ्या स्थितीत वस्तूंचे एकमेकाशी निगडित होणे हेच सृष्टीनियमाचे उद्दिष्ट आहे. ही स्थिती डॉ. ह्वेविल यांच्या म्हणण्यास पुष्ट करीत आहे. एखाद्या नियमाच्या अस्तित्वाबरोबर अनेक अवस्थासुद्धा असू शकतात. या अवस्था आणि नियम एकमेकाबरोबर असतील आणि त्यांची व्याख्या भौतिक नियमांद्वारे होऊ शकत नसेल तर एखादी चेतन शक्ती कार्य करीत आहे हे स्वीकारणे आवश्यक आहे. सारांश हाच आहे की, नियम हे व्यवस्थेचे कारण नसून सूचक आहेत. नियम हे व्यवस्थेचे परिणाम आहेत. यांच्यामुळे ईश्वरीय बुद्धीच्या कार्याची सूचना मिळते. उदाहरणादाखल : रसायनशास्त्राच्या नियमांचा विचार करू. ते कशासाठी आहेत? रसायनशास्त्रासंबंधी तत्त्वांना अशी समानता, आकर्षण व शक्ती मिळालेली आह की, ते वेगवेगळे असले तरी प्राण्यांच्या हितासाठी अनुकूल ठरतील अशा रीतीने एकमेकाशी जुळलेले आहेत. दुसरी उल्लेखनीय बाब ही आहे की, नियम स्वतः काहीच बनवीत नाही. नियमानुसार कार्य करून परिणाम उत्पन्न करणे हे 'कर्त्या'च्या अधीन आहे. तो परिणाम कसा असावा हेसुद्धा कर्त्यांची संख्या, त्यांचा स्वभाव व त्यांच्या परिस्थितीवर अवलंबून आहे. जर कार्य करणारे - निर्माते एकमेकाविरुद्ध असतील किंवा त्यांचे कार्य योग्य रीतीने विभागले गेले नाही तर ते नियमाप्रमाणे वागूनसुद्धा अव्यवस्थेस आणि संकटास कारणीभूत ठरू शकतात. या विश्वामध्ये नियमानुसार कार्य करणारा एखादा कर्ता, निर्माता नाही हे सिद्ध करण्यासाठी एखादा दोष, उणीव किंवा अव्यवस्थितपणा कुठेच दिसून येत नाही. सहकार, दृढता, जीवन टिकविण्यासाठी एक विशेष प्रबंध नसता तर पृथ्वीची गुरुत्वाकर्षण शक्ती प्रत्येक परमाणूवर शासन करीत असली तरी सौर-मंडळात विपत्ती, नाश, मृत्यू यांचे प्रमाण अधिक राहिले असते. सृष्टीमध्ये आवश्यक नियम कितीही असले तरी अव्यवस्था राहू शकते. शासक आणि प्रबंधक या दोहोंच्या समन्वयाशिवाय कुठलेही कार्य सुव्यवस्थित असणे शक्य नाही. सृष्टी-नियम हेच प्रबंधक मानले तरी त्या नियमांचा जनक शासक हा निश्चितच ज्ञानसंपन्न असणे आवश्यक आहे.

स्वभावाबद्दल काय म्हणतात ते पुढे पाहावयाचे आहे. सर्वदर्शन संग्रहात लिहिले आहे की :

'शिखिनश्चित्रयेत् को वा कोकिलान् कः प्रकूजयेत्'।
स्वभावव्यतिरेकेण विद्यते नात्र कारणम् ॥

मोराच्या पंखांना कोण रंगवतो? कोकिळेस मधुर स्वराचे लेणे कुणी दिले? या सर्वांसाठी 'स्वभाव' हेच एकमेव कारण आहे. दुसरे कोणतेच कारण दिसत नाही.

'अग्निरुष्णो जलं शीतं समस्पर्शस्तथानिलः ।
केनेदं चित्रितं तस्मात् स्वभावाद् तद् व्यवस्थितिः ॥

(सर्वदर्शन संग्रह - चार्वाक दर्शन)

अग्नि उष्ण आहे. पाणी थंड आहे. हवा समशीतोष्ण आहे. हे सर्व कोणी बनविले? ही सर्व व्यवस्था स्वभावामुळेच आहे.

स्वभाववादी व निसर्गवादी या दोघांमध्ये थोडेसे अंतर आहे. सृष्टीमध्ये जे काही होते ते सृष्टि-नियमांद्वारेच होते. ईश्वर त्या नियमांचा नियन्ता नाही असे नेचर- निसर्गवाद्यांचे मत आहे. पण, स्वभाववादी म्हणतात की, सृष्टीच्या परमाणूंमध्ये एखाद्या दुसऱ्या शक्तीचा न दिलेला त्यांचा स्वतःचा एक स्वभाव आहे. त्याच स्वभावाने प्रेरित होऊन ते विशिष्ट पद्धतीने संयुक्त किंवा वियुक्त होत असतात. अग्नीचा स्वभावच जाळणे आहे. पाण्याचा स्वभावच संयोग घडवून आणणे आहे, वायूचा स्वभावच उडणे, एखाद्या वस्तूला उडवून नेणे आहे. यासाठी ईश्वराची मुळीच आवश्यकता नाही.

इथे अनेक प्रश्न उद्भवतात. प्रकृतीच्या (निसर्गाच्या) सर्व परमाणूंचा स्वभाव एकच आहे की वेगवेगळा आहे. काही परमाणू एका स्वभावाचे व काही दुसऱ्या स्वभावाचे आहेत काय? परमाणू वेगळे असताना एक स्वभाव आणि एकत्रित झाल्यावर दुसरा स्वभाव असतो काय? किंवा दोन्ही अवस्थेत एकच स्वभाव असतो काय? स्वभाववादी म्हणतात की, पाण्याचा एक विशेष स्वभाव आहे. ऑक्सिजन आणि हायड्रोजन वेगवेगळे असताना त्यांचा स्वभाव हाच पाण्याचा स्वभाव आहे की, त्यापेक्षा वेगळा आहे? ऑक्सिजन आणि हायड्रोजन हे दोन्ही वेगवेगळे पदार्थ आहेत हा सार्वत्रिक सिद्धान्त आहे. जर त्यांचा स्वभाव वेगळा नसता तर ते दोन पदार्थ होऊच कसे शकले असते? ऑक्सिजन आणि हायड्रोजन यांच्या स्वभावापेक्षा पाण्याचा स्वभाव वेगळा आहे हे सर्वमान्य आहे. जे कार्य आम्ही पाण्याद्वारे घेऊ शकतो ते ऑक्सिजन किंवा हायड्रोजन द्वारे घेऊ शकत नाही. ऑक्सिजनचा एक वेगळाच स्वभाव आहे. हायड्रोजनचाही वेगळाच आहे. ते आपापल्या स्वरूपात असताना पाणी नाही, पाण्याचा स्वभावही नाही. असे असताना वेगवेगळा स्वभाव बाळगणारी ही दोन तत्त्वे एकत्र आली कशी? यांचा संयोग झाला कसा? संयोग झाला तरी त्यात पाण्याचा स्वभाव उत्पन्न झाला कसा? वेगवेगळ्या स्वभावांच्या पदार्थांना संयुक्त करणारा कोण आहे? हा कोणाचा स्वभाव आहे? ते दोन पदार्थ एकमेकांजवळ आल्यानंतर आपोआप संयुक्त होतात का? त्यांना एकमेकाजवळ आणणारे तरी कोण आहे? दूर ठिकाणाहून येऊन संयुक्त होणे हाच त्यांचा स्वभाव आहे काय? तसे असेल तर हे दोन्ही पदार्थ वियुक्त अवस्थेत दिसूच नयेत. दुसरा महत्त्वाचा मुद्दा असा आहे की, हायड्रोजन आणि ऑक्सिजनमध्ये स्वतः एकत्र येण्याचा स्वभाव असेल तर ते एकत्र येऊन कधीही वेगळे झाले नसते. पण असे होत नाही. आश्चर्याची बाब ही आहे की, ऑक्सिजनचे विशिष्ट परिमाण हायड्रोजनच्या विशिष्ट परिमाणाशी मिश्रित केले तरच पाणी बनते. कमी अधिक झाले तर बनत नाही.

१. अगोदर त्या दोन पदार्थांचा संयोग.
२. एका विशिष्ट परिमाणामध्ये संयोग.
३. संयुक्त होऊन एक नवीन स्वभाव बनवणे.
४. केवळ एकत्र राहणे नसून वेगळेही होणे.
५. वेगळे झाल्यावर पुन्हा एकत्र येणे, पुन्हा वेगळे होणे.

यावरून स्पष्टपणे हे दिसून येते की, हायड्रोजन आणि ऑक्सिजन यांचे केवळ आंतरिक स्वभाव या सर्व घटनांची समाधानकारक उत्तरे देण्यास पुरेशी नाहीत. आपल्या बुद्धी व इच्छेनुसार संयोग-वियोग घडवून आणणाऱ्या एखाद्या चेतनशक्तीचा स्वीकार केला जाणार नाही तोवर स्वभाववादाद्वारे पदार्थांच्या निर्मितीचे कोडे सुटू शकणार नाही.

स्वामी दर्शनानंदांनी स्वभाववाद्यांच्या मताचा फोलपणा दाखवण्यासाठी समर्पक असा तर्क मांडला आहे. परमाणूंचा स्वभाव संयुक्त होणेच असेल तर ते कधीच विभक्त होणार नाहीत. वियुक्त होण्याचा त्यांचा स्वभाव असेल तर ते कधीच एकत्र येणार नाहीत. कोणतीही वस्तू बनू शकणार नाही. काहींचा स्वभाव एकत्र येण्याचा व काहींचा दूर जाण्याचा असेल तर ज्या परमाणूंचे आधिक्य असेल, त्यांच्या अनुकूल कार्य होईल. एकत्र येणाऱ्या परमाणूंचे प्राबल्य असेल तर ते सृष्टीस कधीच नष्ट होऊ देणार नाहीत. जर दूर जाणाऱ्या परमाणूंचे प्राबल्य असेल तर ते सृष्टी कधीच बनू देणार नाहीत. दोन्ही समान असतील तर सृष्टी बनू शकणार नाही.

खरे पाहता, सृष्टीची उत्पत्ती, स्थिती आणि प्रलय हे तीन्ही वेगवेगळया अवस्थेत किंवा संयुक्तावस्थेत एका चेतनशक्तीच्या अस्तित्वाची जाणीव करून देतात. व्यास महर्षींनी वेदान्तशास्त्रात –

**जन्माद्यस्य यतः (१।१।२ ब्रम्हसूत्र.)**

म्हणजे सृष्टीच्या उत्पत्ती, स्थिती आणि प्रलयाचे कारण ब्रह्म आहे. संपूर्ण जग एकाच अवस्थेत राहिले असते तर हे परमाणूंच्या आंतरिक स्वभावामुळे होते असे म्हणता आले असते. पण जेथे वस्तू क्षणोक्षणी आपले रूप बदलत आहे तेथे केवळ स्वभावासच 'उत्पत्ती, स्थिती, प्रलय' यांचे कारण दाखवणे हा पहिल्या प्रतीचा अंधविश्वास आहे. जड (निर्जीव) आणि चेतन यांमध्ये भेद तरी काय आहे? एक तर जड (निर्जीव) वस्तू कार्यच करू शकत नाही. चेतनाच्या आश्रयाने काही करेल तर ती एकाच प्रकारचे कार्य करीत राहील. कार्य करणे, न करणे, उलट करणे, (कर्तुम्, अकर्तुम्, अन्यथा कर्तुम्) या बाबतीत स्वतंत्रता बाळगणे हा चैतन्याचा स्वभावच आहे. घड्याळाचे काटे आपोआप चालू शकत नाहीत. ते बनविणारा वेगवेगळया घटकांची योग्य पद्धतीने जुळवणी करून चावी देतो, तेव्हा ते फिरतात. चावी संपली की काट्यांनी चिरनिद्रा घेतलीच म्हणून समजा. काटे कधीच मागे फिरणार नाहीत किंवा चावी दिली तरी चालणार नाही असे म्हणणार नाहीत. हीच स्थिती सृष्टीची आहे.

दुकानामध्ये साखर, तूप, वेगवेगळया धान्याचे पीठ आणि मेवे असतात. प्रत्येकाचा एक वेगळा स्वभाव आहे. साखर गोड आहे. तूप स्निग्ध आहे, मेवे गोड आहेत. आम्ही हॉटेलात याच पदार्थांचे बनलेले अनेक प्रकारचे पदार्थ पाहतो. स्वतःस बुद्धिजीवी म्हणवून घेणारा स्वभाववादी असे समजू शकतो काय की साखर, तूप, रवा, हे सर्व पदार्थ स्वतःच्या स्वभावाने प्रेरित होऊन पक्वानाच्या रूपाने एकत्र आले आहेत? एका डब्यात पीठ, दुसऱ्यातून तूप, तिसऱ्यातून साखर बाहेर पडून ते तीन्ही पदार्थ लाडू किंवा जिलेबीचे रूप आपापल्या स्वभावामुळेच धारण करतात काय? हे शक्य

नसेल तर पृथ्वी, पाणी आणि अग्नी स्वतः एकत्रित येऊन कधी गुलाबाचे, कधी आंब्याचे, कधी कबूतराचे स्वरूप धारण करणे तरी कसे शक्य आहे? हॉटेलातील पदार्थांना दिलेले स्वरूप आणि नाव बनवणाऱ्याने दिले आहे. त्याचप्रमाणे पृथ्वी, पाणी, अग्नी, हवा यापासून बनलेल्या वस्तूंचे वेगवेगळे नाव आणि रूप ईश्वराने दिलेले आहे. लाडू आणि जिलेबीच्या वेगळेपणाचे कारण मिठाईवाल्याने आपल्या ज्ञान व इच्छेप्रमाणे तूप, साखर, रवा यांचे मिश्रण कमी- अधिक प्रमाणात केले आहे. याचप्रमाणे सृष्टीचे सर्व पदार्थ एकाच भौतिक तत्त्वाचे बनलेले असले तरी वेगवेगळ्या परिमाणामुळे वेगवेगळे नाम आणि स्वरूप धारण करणारे झाले आहेत. वेगवेगळ्या परिमाणामध्ये एकत्र येण्यासाठी कारण ठरत असलेली, ज्ञान आणि इच्छा बाळगणारी जी शक्ती आहे तीच 'ईश्वर' आहे, असे आस्तिक समजतात.

❑❑❑

# अध्याय : पाचवा

## विज्ञान आणि आस्तिकवाद

"विज्ञान आणि आस्तिकता हे दोन्ही एकमेकांच्या पूर्णपणे विरोधात आहेत. पूर्व आणि पश्चिम किंवा अंधकार आणि प्रकाश यांचा जसा कधीच मेळ होणे शक्य नाही, तसे विज्ञान आणि आस्तिकतेचे आहे. जगात विज्ञान-दृष्टी नव्हती तोवरच आस्तिकतेचे शासन टिकू शकले. आता विज्ञानाने पदार्पण केले आहे. म्हणून आस्तिकतेने आपले अंथरूण- पांघरूण गुंडाळावे व जगास कायमचा रामराम ठोकावा. जगातून नेहमीसाठी आस्तिकतेने लुप्त व्हावे. जिथे प्रकाश आहे तिथे अंधकाराचे काय काम?" अशा प्रकारचा विचार सुशिक्षितांमध्ये पसरत चालला आहे.

खरे पाहता, वरील विधाने करणाऱ्यांना आस्तिकतेचा लवलेशही नाही. पूर्व व पश्चिम दिशेसारखे अंतर समजणे हेच अज्ञानाचे द्योतक आहे. अनादी काळापासून खरी आस्तिकता आणि खरे विज्ञान हे एकमेकाशी निगडित आहे. विज्ञान हे नियमाचे अन्वेषण करते आणि आस्तिकता त्या नियमांचा नियन्त्याशी संबंध शोधते. नियमाशिवाय नियन्ता कसा असू शकतो? नियन्त्याशिवाय नियम कसे असू शकतात? प्राचीन आस्तिकवादी सृष्टीच्या नियमांचे अवलोकन करूनच ईश्वराच्या अस्तित्वास सिद्ध करीत असते. शंकराचार्यांनी वेदांतशास्त्राच्या "जन्माद्यस्य यतः" या दुसऱ्या सूत्रावर खालीलप्रमाणे विवेचन केले आहे.

**"अस्य जगतो नामरूपाभ्यां व्याकृतस्यानेककर्तृभोक्तृसंयुक्तस्य प्रतिनियतदेशकालनिमित्त क्रियाफलाश्रयस्य मनसाप्यचिन्त्यरचनारूपस्य जन्मस्थितिभङ्गाः यतः सर्वज्ञात् सर्वशक्तेः कारणाद्भवति तत् ब्रह्म इति वाक्य शेषः"**

या विविधतेने संपन्न अशा सृष्टीची रचना, धारण व विनाश यांचे कारण सर्वज्ञ आणि सर्वशक्तिमान् ब्रह्म आहे.

पण, काही काळानंतर विज्ञान आणि आस्तिकतेत विरोध उदयास आला. सृष्टी-रचनेशी ईश्वराचा कोणताच संबंध नाही असे आस्तिक समजू लागले. त्यांनी वाटेल त्या गुणांचे आरोपण ईश्वरामध्ये करण्यास प्रारंभ केला. ज्ञानदृष्टी अवरुद्ध झाली. भक्तिभाव प्रबळ ठरला. यामुळे अंधविश्वास वाढला. येथूनच विज्ञानाच्या ऱ्हासाला प्रारंभ झाला. विज्ञानाने पाश्चिमात्य जगात बाळसे धरले आणि वेगाने विकासही केला. त्या वेळी तिथे आस्तिकता नव्हती, पण आस्तिकतेच्या नावावर चालणारा अंधविश्वास होता. म्हणून अंधविश्वासावर आधारलेल्या आस्तिकतेत आणि प्रयोगाचा आधार बाळगणाऱ्या विज्ञानामध्ये विरोध सुरू झाला. अंधविश्वास आणि विज्ञान जसे विरोधक आहेत तसेच आस्तिकता आणि अज्ञानाबाबतीतही आहे. प्राचीन भारतीय ईश्वराच्या जाणीवेसाठी ज्ञान-विज्ञान आवश्यक समजत असत. दुर्दैवाने आधुनिक काळात विज्ञान हे अनीश्वरवादाचे प्रतीक समजण्यात येऊ लागले आहे.

विज्ञान आणि धर्माचा विरोध युरोपमध्ये सुरू झाला. विज्ञानाचे पुनरुत्थान जेव्हा होत होते

त्या वेळी ख्रिश्चन पंथाचे राज्य तिथे होते. पोप म्हणेल ते सत्य ही व्याख्या होती ख्रिश्चन पंथाची. कोणत्याही व्यक्तीस बुद्धीचा वापर करण्याची परवानगी नव्हती. बुद्धीचा वापर हा घोर अपराध समजला जात असे. काही लोकांनी डोळे उघडून चालण्याचा प्रयत्न सुरू केला तेव्हा धर्माचार्यांनी कडाडून विरोध केला. तर्कामुळे जनता ईश्वर व धर्मापासून विमुख होईल अशी त्यांची समजूत होती. म्हणून स्वतंत्र चिंतन करणाऱ्या अन्वेषकांना - गॅलीलियो इत्यादींना कठोर शिक्षा ठोठावण्यात आल्या. विरोधाचे मूळ कारण हेच आहे. या विरोधामुळे 'आस्तिकता' हीच आमच्यावर होणाऱ्या अन्यायाचे, अत्याचाराचे कारण' आहे अशी वैज्ञानिकांची समजूत झाली. आपल्या काल्पनिक ईश्वराचे निराधार सिंहासन विज्ञानाच्या तावडीतून वाचवण्याचा आस्तिकांचा प्रयत्न ज्या पद्धतीने, ज्या प्रमाणात होत गेला त्यामुळे आस्तिकता ही तर्कविरोधी आणि अमानवीय आहे असा विश्वास वैज्ञानिकांमध्ये अधिकाधिक बळावत गेला. आस्तिकतेच्या उच्चाटनासाठी त्यांनी प्रयत्न सुरू केले. या बाबतीत दोघांचीही चूक होती. पण, धर्माचार्यांनी केलेली चूक अक्षम्य होती. आस्तिक ज्या जगत्‌निर्माता, संचालक ईश्वराची पूजा करीत आहेत त्याच ईश्वराच्या अधीन असलेल्या नियमांचेच अन्वेषण वैज्ञानिक करीत आहेत, असे धर्माचार्यांनी समजले असते तर विज्ञान धर्मविरोधी न होता सत्याधिष्ठित आस्तिकतेचे महत्त्व दर्शविणारे ठरले असते. त्याचबरोबर अंधश्रद्धाळू व्यक्तींनी स्वीकारलेले अंधविश्वास हीच आस्तिकता आहे असे समजण्याची वैज्ञानिकांची चूकही विचारात घेण्यासारखी आहे. आस्तिकतेच्या नावावर वैज्ञानिकांचे प्राणही घेतले जाऊ लागले, बुद्धीच्या स्वातंत्र्यावर पूर्णतः बंदी लादली जाऊ लागली, तेव्हा त्यांनी उघड उघड बंड पुकारले. अटीतटीच्या संघर्षास सुरुवात झाली. हा संघर्ष येथपर्यंत वाढला की, वैज्ञानिकांना आस्तिकतेच्या नावाचीच घृणा झाली आणि ती आजपावेतो चालूच आहे. सर्वच वैज्ञानिक जुन्या विचारांचे आहेत असे नाही. विज्ञानाच्या आधुनिक प्रगतीने वैज्ञानिकांनासुद्धा निश्चितपणे हे दाखवून दिले आहे की, एखादी विशेष प्रकारची आस्तिकता खोटी व निराधार असली तरी विज्ञानाच्या नियमांना एखाद्या नियंत्याची आवश्यकता आहे; पण असा विचार करणारे उच्चकोटीचे वैज्ञानिक बोटावर मोजण्याएवढेच आहेत. सामान्य वैज्ञानिकांची मात्र तशीच स्थिती आहे. जसे काही धार्मिक अंधविश्वासी आहेत तसे वैज्ञानिकही बरेचसे अंधश्रद्धाळू आढळतात. विज्ञानाच्या क्षेत्रातही स्वतंत्र विचार करणारे किती आहेत? 'आम्ही वैज्ञानिक आहोत, आमचा ईश्वराशी काय संबंध' असे म्हणून आस्तिकतेपासून सुटका करून घेण्यासाठी पळवाट शोधणारे वैज्ञानिकच अधिक दिसून येतात.

खरे पाहता, विज्ञान आणि आस्तिकता हे परस्पर विरोधक नाहीत. विज्ञान म्हणजे काय? सृष्टीच्या घटनांचे चांगल्या प्रकारे निरीक्षण करणे, ते नियमित आहेत हे सिद्ध करणे व त्या नियमांचे वर्गीकरण करणे हेच विज्ञानाचे कार्य आहे. विज्ञानाची जशी-जशी प्रगती होत आहे तसे तसे सृष्टिरचनेचे नियम अधिक प्रमाणात शोधले जात आहेत. हे आवश्यक आणि योग्य असले तरी, हे सर्व नियम स्वतःच एखाद्या बुद्धी व इच्छा बाळगणाऱ्या चेतन तत्त्वाचा आश्रय न घेता

कार्य करीत असतात असे समजणे विज्ञानाच्या मूलभूत नियमांनाच बगल देणे होय. वैज्ञानिक संशोधनांनी एक पाऊल पुढे जाऊन नियमांच्या मागे जो नियन्ता दडलेला आहे, त्याचाही विचार करणे आवश्यक आहे. नियमाचे संशोधन करणारा 'वैज्ञानिक' प्राकृतिक घटनांना नियमाद्वारे परस्पर बांधण्यात आलेले आहे, असे समजूनच संशोधन सुरू करतो. तसे नसते तर विज्ञानाचे एक पाऊलदेखील पुढे पडले नसते. एक वैज्ञानिक एक शीशी पाण्याचे विश्लेषण करून हे पाणी हायड्रोजन व ऑक्सिजन यांच्या विशेष परिमाणामुळे बनले आहे असा शोध लावतो. त्या शीशीच्या पाण्याद्वारे त्याने जाणलेला नियमच समुद्राच्या पाण्यातसुद्धा कार्य करीत आहे, असा विश्वास तो बाळगतो.

अशा प्रकारे संपूर्ण विज्ञान 'सर्व प्राकृतिक घटना असंबद्ध नसून काही नियमांद्वारे सुसंबद्ध आहेत' याच मूळ सिद्धांतावर आधारलेले आहे. ही बाब विज्ञानाबाबतीत नेहमीसाठी एकसारखीच आहे. प्राकृतिक घटना केवळ नियमबद्ध नसून हे सर्व नियम दुसऱ्या एका सूक्ष्म नियमाशी निगडित आहेत, असे विज्ञान स्वीकार करीत आहे. या सर्व नियमांचा इच्छाशक्तीशी संबंध आहे असे स्वीकार न करणे वैज्ञानिकांना शोभून दिसत नाही. म्हणून उच्चकोटीचे काही वैज्ञानिक चेतनशक्तीवर विश्वास ठेवीत आहेत. काही वैज्ञानिक आम्हाला यापेक्षा आधिक समजत नाही असे म्हणून केवळ नियमापर्यंतच्या ज्ञानावर समाधान मानीत आहेत आणि आपली असमर्थता व्यक्त करीत आहेत. आम्ही यापेक्षा पुढे पाऊल टाकू इच्छीत नाही असे त्यांचे म्हणणे आहे. दुसरे काही वैज्ञानिक 'विज्ञानाचे क्षेत्र हे केवळ भौतिक नियमापर्यंतच मर्यादित आहे, अभौतिक जग विज्ञानाच्या कक्षेच्या बाहेर आहे, असे म्हणत आहेत. त्यांचे हे उत्तर हेच दर्शविते की, ते नास्तिक नाहीत, आस्तिकतेचे त्यांना ज्ञान नाही. तत्परता दर्शविली तर तेही आस्तिक होऊ शकतात असे आम्हास वाटते.

अज्ञेयवाद किंवा एग्नोस्टीसिजम (Aqnostisism) नावाचा दुसरा एक विचारप्रवाह आहे. त्यांचे म्हणणे आहे की, ईश्वर असूही शकतो, नसूही शकतो. तो आमच्या बुद्धीच्या कक्षेच्या बाहेर आहे. म्हणून अशा गुंतागुंतीच्या प्रश्नाचा विनाकारण विचार करण्याची आवश्यकता तरी काय आहे? काही का असेना! हक्सलेच्या काळामध्ये विज्ञानाचा आस्तिकवादाशी घृणेचा जो व्यवहार होता तो आज नाही. वैज्ञानिक आस्तिकही असू शकतो याबद्दल त्यांना अशक्य असे काहीच वाटत नाही. पण, एक गोष्ट मात्र जशीच्या तशीच आहे. महाविद्यालयात आणि विद्यापीठात शिक्षण घेणारे विद्यार्थी मात्र जुन्या विचारसरणीचाच अवलंब करीत आहेत. त्यांच्या पूर्वजांनी आपल्या व्यवहारात बदल केला असला तरी, विज्ञानाचे साधारण अनुयायी मात्र विज्ञानाच्या अध्ययनाच्या प्रारंभाबरोबरच नास्तिक होणेही आवश्यक आहे असे समजत आहेत. आज अशा प्रकारे नास्तिक बनणे हे एक ''फॅशन'' झाले आहे. फॅशनच्या तावडीतून सुटणे हे काही सोपे नाही. ज्यांनी विज्ञानाचे तिळमात्रही अध्ययन केले नाही तेसुद्धा ''फॅशन''च्या जाळ्यात अडकलेले दिसतात. सर्वात भयंकर बाब ही आहे की, फॅशनसाठी विज्ञानाचे नाव बदनाम केले जात आहे.

विज्ञानाचे क्षेत्र सीमित, मर्यादित करण्याचा अधिकार वैज्ञानिकांना नाही. विज्ञान यापेक्षा अधिक स्वीकार करीत नाही असे कुणीही म्हणू शकत नाही. मानवाचे ज्ञान मर्यादित असले तरी त्यात वाढ होऊ शकते. विज्ञान कधीच स्थिर राहू शकत नाही. शंभर वर्षापूर्वीच्या संशोधित नियमामध्ये आज परिवर्तन दिसून येते. दररोज नवीन नियमांचा शोध लावला जात आहे. नवीन तत्त्वांची मनुष्याच्या ज्ञानामध्ये भर पडत चालली आहे. म्हणून एके काळी एक किंवा सर्वच वैज्ञानिक नास्तिक असले तरी विज्ञान आणि नास्तिकता एक आहेत असे समजणे विज्ञानाच्या उज्ज्वल स्वरूपास काळीमा फासणे आहे. वैज्ञानिक स्वतःच म्हणतात की, विज्ञान अपूर्ण आहे आणि नेहमीच अपूर्ण राहील. ''मी सर्व काही जाणले आहे, माझ्या उत्तराधिकाऱ्यांनी जाणून घ्यावे असे काहीच उरले नाही'' किंवा ''मी जे जाणतो ते सर्व ठीक आहे, यात तिळमात्रही चूक नाही. बदल कधीच होणार नाही'' असे म्हणण्याजोगी वेळ कधीच येणे शक्य नाही.

काहीजण म्हणतील की, ''आम्ही संकुचित विचार बाळगणारे नाही. पण, विज्ञानाने आजपर्यंत जे संशोधन केले आहे ते सर्व आस्तिकतेच्या प्रतिकूलच आहे. आम्ही तरी काय करू शकतो'' असे ते म्हणतात. म्हणून आजपर्यंतचे विज्ञान आस्तिकतेच्या कितपत प्रतिकूल आहे हे पाहणेही आवश्यक ठरते. अगोदर विज्ञानाच्या साधारण सिद्धांताचा विचार करू. याविषयी आर्मस्ट्राँग यांनी ''God and the soul'' या ग्रंथात केलेले विवेचन पाहण्याजोगे आहे.

''सृष्टि- उत्पत्तीविषयी विज्ञानाचे म्हणणे तपासून पाहणे आवश्यक आहे. सृष्टी पूर्वी एक सूक्ष्म द्रव्य संपूर्ण आसमंतात पसरलेले होते. सूर्य, चंद्र, उपग्रह यांचे मुळी अस्तित्वच नव्हते. सूक्ष्म द्रव सर्वत्र एकसारखा पसरलेला होता. त्यानंतर तो काही विशिष्ट केंद्रस्थानी घनीभूत झाला आणि या केंद्रामध्ये एक प्रकारची गती उत्पन्न झाली. हळुहळू प्रत्येक केंद्र एका गोळयाच्या स्वरूपात परिवर्तित झाले आणि आपल्या अक्षावर द्रुतगतीने फिरू लागले. त्या गतीमुळे त्या केंद्राची लहान-लहान शकले झाली. हे भाग शनीग्रहाप्रमाणे अगोदर कंकणाकृती तयार झाले. त्यानंतर पुन्हा त्यांचे लहान-लहान भाग तयार झाले. हे भाग आपल्या अक्षावर फिरत फिरत सूर्यासारख्या विशाल गोळयाभोवती फिरू लागले. या लहान गोळयापासून काही भाग वेगळे झाले तेच चंद्र बनले. त्यांच्यामध्ये तीन प्रकारची गती उत्पन्न झाली. एक आपल्या अक्षावर, दुसरी उपग्रहाच्या चोहीकडे, तिसरी उपग्रहाच्या सभोवार फिरत फिरत केंद्रस्थानी असलेल्या सूर्याच्या सभोवती. दुसऱ्या ग्रहावर प्राणी आहे की नाही हे विज्ञान जाणत नाही, पण पृथ्वीवर प्राणी आहेत हे मात्र निश्चितपणे जाणते. प्रकृतीचे परमाणू प्राण्यांच्या शरीराचे मूळ कारण असलेल्या प्रोटोप्लाजमची उत्पत्ती होईल अशा रीतीने संयुक्त झाले आहेत असे विज्ञान जाणते. पण, अगदीच वेगळेपणा असलेल्या चेतनतेस उत्पन्न करण्याजोगा परमाणू-संयोग कसा झाला हे मात्र जाणत नाही.

''काही विचारवंत इच्छाशक्तीस जगातून बहिष्कृत करण्याच्या उद्देशाने असे म्हणू लागतात की, गतीच्या नियमांचा परमाणूंवर असा प्रभाव पडतो की, ते दुसऱ्या पद्धतीने कार्य करूच शकत नाहीत. इच्छाशक्तीची अपेक्षा न करताच कार्यास जन्म देणाऱ्या काही स्वाभाविक शक्ती

निसर्गामध्ये (परमाणूंत) आहेत असे स्वीकारले तरी, यांचा आरंभ कसा झाला हा प्रश्न उद्भवतोच. एकसारखा पसरलेला सूक्ष्म द्रव पदार्थ घट्ट कसा बनला? एकसारखेपणा नष्ट होऊन विभिन्नता कशी आली? विकासाच्या सुरुवातीसाठी कोणती तरी एखादी शक्ती आवश्यक आहे. जो द्रव अनादी काळापासून एकसारखा सर्वत्र पसरलेला होता तो त्यापेक्षा वेगळया एखाद्या विशेष शक्तीच्या प्रेरणेशिवाय स्वतः स्थूल केंद्र कसे बनू शकला?

"प्रकृतीच्या (निसर्गाच्या) परमाणूंमध्ये कितीही गुणांची कल्पना केली तरी तीन गोष्टींना अवश्य स्वीकारावे लागते. त्यापैकी ईश्वरीय इच्छाशक्ती एक आहे. विकासाचा प्रारंभ, जीवनाचा प्रारंभ आणि चैतन्याचा प्रारंभ. मनुष्य, पशु, पक्ष्यामध्ये असलेले चैतन्य हे परमाणूतील सूक्ष्म-अव्यक्त चैतन्याचा विकासच आहे असे स्वीकारले तरी चैतन्य व अहंकार यांच्या अनुभवाच्या आरंभासाठी परमाणूंपेक्षा भिन्न असणाऱ्या एखाद्या शक्तीचा स्वीकार करावा लागेल."

(गॉड अँड द सोल : पृ.५४)

वास्तविक पाहता विज्ञान सृष्टि उत्पत्तीच्या पद्धतीचे वर्णन करते. कारणाचे किंवा उद्देशाचे वर्णन करीत नाही. प्रकार किंवा पद्धतीस कारण समजणे ही एक अशी चूक आहे, जी जगातील सर्व नास्तिक करीत आले आहेत. मला एका घड्याळाच्या उत्पत्तीचे कारण जाणावयाचे आहे. एक व्यक्ती विश्लेषण करते की, अगोदर लोखंडाचे कण मातीत मिश्रित झाले होते. त्या अवस्थेत ते पृथ्वीमध्ये होते. खाणीतून ते कण आणले गेले आणि मोठमोठ्या भट्ट्यांमध्ये त्यांना मातीपासून वेगळे करण्यात आले. लहान-लहान कांड्या बनवल्या गेल्या. मग या कांड्यांचे लहान-लहान तुकडे वितळवून वेगवेगळया ठिकाणी कमानी, चाक, झाकण, कार्डबोर्ड, काटे इत्यादी बनवण्यात आले. मग या सर्वांना एकत्र जोडल्यामुळे घड्याळ तयार झाले. ही घड्याळाच्या उत्पत्तीची पद्धत आहे. तिचे कारण नव्हे. मी जर त्याला विचारले की, 'मी घड्याळ बनवण्याची पद्धत जाणू इच्छीत नाही. 'घड्याळ कोणी बनवले' या प्रश्नाचे उत्तर पाहिजे. तो जर असे म्हणू लागला की, 'कुणीच नाही. मी तुम्हास घड्याळाची उत्पत्ती तर सांगितली आहे अजून काय पाहिजे? हे उत्तर तसेच आहे जसे नास्तिक असलेले वैज्ञानिक देत असतात. खरे पाहता, डार्विनचा उत्क्रांतीवाद सुद्धा आस्तिकतेच्या प्रतिकूल नाही. तोसुद्धा एका प्रकारे सृष्टी-उत्पत्तीचा प्रकारच सांगतो. तो बरोबर आहे की चूक हा विषय वेगळा आहे. उत्क्रांतिवाद बरोबर असला तरी त्या उत्क्रांतीस नियमामध्ये ठेवणाऱ्या एखाद्या ज्ञानसंपन्न इच्छाशक्तीची आवश्यकता नाही असे सिद्ध होत नाही.

डार्विनच्या उत्क्रांतीवादामुळे पाश्चात्य नास्तिकांचा आनंद गगनात मावेनासा झाला आहे. मानवास ईश्वरापासून कायमचे दूर सारण्यासाठी, धर्माच्या खुळचट कल्पनांना मूठमाती देण्यासाठीच जणू डार्विनने एक अमोघ अस्त्र त्यांच्या हातात दिले आहे असे त्यांना वाटत आहे. या विचाराची मजल बरीच पुढे गेली आहे. प्राचीन काळात खरोखरच ईश्वराने सृष्टी बनवली असेल तर डार्विनच्या उत्क्रांतीवादानंतर या जगातून ईश्वराने कायमचा निरोप घ्यावा. प्रसिद्ध वैज्ञानिक हक्सले (Huxley) च्या 'ले सर्मन्स' (साधारण व्याख्यान) या पुस्तकातून एका तर्काचा

सारांश देत आहोत. बाह्य परिस्थिती आणि परमाणूंच्या आंतरिक स्वभावामुळे होणारे परिवर्तन वेळेची जाणीव करून देणाऱ्या घड्याळाच्या निर्मितीसाठी कारणीभूत ठरतात. इच्छाशक्ती व बुद्धीची आवश्यकता नसतानाही उद्देश्यपूर्ण घड्याळ तयार होऊ शकते.''

हक्सलेच्या कथनाद्वारे असे दिसून येते की, एखादे वेळी निर्बुद्ध मनुष्य एखादी वस्तू बनवतो. तो काय बनवीत आहे हे तो जाणत नाही. जेव्हा ती वस्तू तयार होते तेव्हा 'या वस्तूपासून दुसरी एक वस्तू बनू शकते' असा विचार तो करतो. आता तो ती वस्तू तयार करतो. त्या वेळी दुसऱ्या एखाद्या वस्तूची आठवण होते. अशा प्रकारे होत होत शेवटी एक फारच उत्तम वस्तू तयार होते. ती वस्तू एका विशेष उद्देशाची पूर्तता करते. अशा प्रकारे प्रारंभापासून एक विशेष उद्देश नसला तरी क्रमाक्रमाने एक विशिष्ट वस्तू सिद्ध होत असेल तर, अगोदरपासूनच विशेष उद्देश समोर ठेवून या सृष्टीची रचना करणाऱ्या ईश्वरास स्वीकार करण्याची काय आवश्यकता आहे ? ईश्वर जर एक विशेष उद्देश समोर ठेवून बुद्धिपूर्वक आमच्या शरीराची रचना करीत असेल तर सुरवातीलाच अशी रचना का करीत नाही? एवढ्या परिवर्तनाची काय आवश्यकता आहे? ईश्वर जर सर्वज्ञ किंवा पूर्वज्ञ असेल तर लहान- लहान प्रयोग करण्याची त्यास काय आवश्यकता आहे?

डार्विन आणि त्यांचे अनुयायी हे सिद्ध करीत असल्यासारखे दिसून येते की, संपूर्ण सृष्टिक्रम कोणतेही उद्देश नसताना स्वतःच स्वाभाविक शक्तीद्वारे उत्पन्न झालेला आहे आणि यासाठी एका ज्ञानपूर्ण शक्तीची आवश्यकता नाही. ते म्हणतात की, या सृष्टीत हे चार नियम कार्य करीत असतात,

१. पितृनियम (Law of Heredity) : म्हणजे एका वस्तूपासून त्याच्या सारखीच दुसरी वस्तू उत्पन्न होणे.

२. परिवर्तनाचा नियम (Law of Variability) म्हणजे उपयोग व अनुपयोगामुळे वस्तूमध्ये परिवर्तन होणे.

३. अधिक उत्पत्तीचा नियम (Law of overproductin) म्हणजे प्राण्यामध्ये आपल्या अस्तित्वासाठी संघर्ष करण्याएवढी संख्यात्मक वाढ होणे.

४. योग्य- विजय : (Survival of the fittest) किंवा स्वाभाविक निवडीचा नियम : (Na tural Selection) म्हणजे अनेक वस्तूंपैकी ज्या सर्वात उत्कृष्ट आहेत त्या जीवित राहणे, उरलेल्या नष्ट पावणे.

आम्ही या ग्रंथात उत्क्रांतिवादाच्या नियमांची वा सिद्धांतांची चीरफाड करीत नाही. मानवाचे शरीर आरंभापासून असेच बनले आहे की क्रमिक विकासाचा परिणाम आहे? हा विषय इथे घेऊ इच्छीत नाही. थोड्या वेळासाठी डार्विनचे हे सिद्धांत बरोबर आहेत असे स्वीकारले तरी प्रश्न हा आहे की, वरील सर्व नियम एका नियन्त्याची अपेक्षा न करताच स्वतःच सृष्टीत कार्य करू शकतात काय?

एका वस्तूपासून त्याच्या सारखीच दुसरी वस्तू उत्पन्न होणे हाच पितृनियम आहे., पण असा

नियम का आहे? समानच वस्तू का उत्पन्न होत आहे? पूर्ण सृष्टी वांझ का नाही? अचेतन शक्तीद्वारे शासित सृष्टीमध्ये संतानोत्पत्तीसाठी व्यवस्था का आहे? उत्पादक - उत्पाद्य (वस्तू) एकसारखे का असावेत? बेडूक आणि त्याच्या पिलामध्ये जेवढी असमानता आहे तीच सर्व जन्य-जनक वस्तूत का राहत नाही? मोठ्या प्राण्यांची संतती सुद्धा उत्पत्तीच्या काळात आपल्या आई-बापापेक्षा भिन्न असलेल्या अनेक श्रेणीतून वाटचाल करते. पण नंतर ते त्यांच्यासारख्याच आकृतीचे का होतात? भौतिक विज्ञान या प्रश्नाचे उत्तर देऊ शकत नाही. पण याचा अर्थ असा होऊ शकत नाही. की, असे प्रश्न विचारले जाऊ नयेत किंवा त्यांचे उत्तर दिले जाऊ नये. या सर्वांचे उत्तर एकच आहे. ते म्हणजे 'सर्वज्ञ' ईश्वर एक आहे. तोच हे विश्व दीर्घकाळापर्यंत जीवनाचे आधार बनून राहावे या उद्देशाने अशा प्रकारची व्यवस्था करतो.''

(फ्लिण्ट : थीज्म)

मनुष्याचा गर्भ पहिल्या महिन्यात मनुष्याकृती नसतो. गाय, ससा, डुक्कर आणि मनुष्य यांच्या मुलांची आकृती गर्भाच्या पहिल्या महिन्यात एकसारखी असते. काही महिन्यानंतर त्यांच्यामध्ये अंतर दर्शविणारी चिन्हे उदयास येतात. उत्पत्तीच्या वेळी ते चिन्ह पूर्णपणे वेगवेगळे दिसून येतात. पेलेच्या घड्याळाच्या उदाहरणादाखल दिलेली हक्सले महोदयांची युक्ती इथे लागू केली तर त्या युक्तीचा फोलपणा लवकरच स्पष्ट होतो. स्त्रीच्या शरीरात असलेला एक महिन्याचा गर्भ पुढे चालून पशुपक्ष्यांच्या शरीराची आकृती का धारण करतो? यावरून हेच सिद्ध होते की, पहिल्या महिन्यात गाय आणि स्त्रीच्या गर्भाची आकृती एकसारखी असली तरी नियन्त्याच्या विचारानुसार जी व्यवस्था आहे त्यामुळे पुढे चालून मानवाचे गर्भ मानव- आकृती, पशूंचे गर्भ पश्वाकृती धारण करीत आहेत. सुवर्णकार काकणासाठी आणि हारांसाठी वापरले जाणारे सोने एकाच प्रकारे वितळवतो त्यापासून दोन कांड्या बनवतो. पाहणाऱ्यास दोन्ही कांड्या एकसारख्याच दिसतात. पण, सुवर्णकार मात्र एका कांडीपासून हार, दुसऱ्या कांडीपासून काकण बनवावयाचे आहे हे जाणतो. म्हणून पुढे चालून त्यांच्या आकृतीत फरक करतो. हीच स्थिती पशुपक्ष्यांच्या गर्भाची आहे. पितृ नियम आस्तिकतेचा विरोधक नाही.

एवढेच नव्हे तर, परिवर्तन नियमाद्वारे परिवर्तनाच्या प्रारंभी, मध्यभागी व शेवटी, या तीन्ही स्थितीत बुद्धीची आवश्यकता बाळगणारे एक उद्दिष्ट सिद्ध होत आहे. परिर्वतनाचा अंत नसलेला स्वभाव कोणत्याही वस्तूमध्ये दिसून येत नाही. प्रत्येक वस्तूत परिवर्तन त्याच्या आकृतीनुसारच होत आहे. डॉ. हक्सलेच्या कथनानुसार व्हेलमध्ये पंख फुटण्याजोगे परिवर्तन कधीच होत नाही. पक्ष्यामध्ये व्हेलमाशाचे हाड उत्पन्न होण्याजोगा बदल कधीच होत नाही. म्हणून ठराविक परिवर्तनामुळे 'प्रयोजन' 'सोद्देश्यता' सिद्ध होत आहे. डार्विनच्या अनुयायांच्या विचारानुसार बदल एका निश्चित मार्गानेच होत आहे. त्याच्या प्रतिकूल नाही. हे पुढेच वाटचाल करते, मागे जात नाही. यामुळे उन्नतीच होते, अवनती नाही, हे असेच का व्हावे? ठराविक परिणाम देऊ शकणाऱ्या वस्तूंचे मिश्रण फारच विचारपूर्वक करण्यात आले हेच याचे कारण होय.

अस्तित्वासाठी संघर्ष करावयास भाग पाडणाऱ्या अधिकोत्पत्ती नियमाचा विचार करू या : या नियमामुळे बुद्धिमान ईश्वराने विशेष उद्दिष्ट सिद्ध करण्याजोगी रचना केली आहे हे दिसून येत नाही काय? जगामध्ये एवढ्या भिन्न प्रकारचे असंख्य प्राणी कशासाठी आहेत हे यावरूनच कळून येत आहे ना! आम्ही जी अधिकोत्पत्ती म्हणत आहोत ती केवळ त्या एका जातीच्या अस्तित्वासाठी लागणाऱ्या आवश्यकतेच्या अपेक्षेनेच आहे. पण, जगात कोणतीही जात केवळ स्वत:साठीच जगत नाही. ज्यांना जेवण आणि सुख पोहोचवावयाचे आहे त्यांचा हिशेब केला तर कदाचित ही उत्पत्ती एवढी अधिक भासणार नाही. वास्तविकपणे, सर्व प्राण्यांच्या आवश्यकतेचा विचार करावयास पाहिजे. केवळ एका प्राण्याचा विचार करून चालणार नाही. सारासार विचार केला तर सृष्टीमध्ये कोणत्याही प्रकारचा अपव्यय होत नाही हे स्वीकारावेच लागेल.

अस्तित्वाच्या युद्धाचा परिणाम चांगलाच असतो हे डार्विनचे अनुयायीसुद्धा स्वीकार करीत आहेत. दु:ख, वेदना आणि वैमनस्य हेसुद्धा शेवटी व्यवस्थेच्या सौंदर्यासाठीच आहेत ना! बुद्धी बाळगणाऱ्या प्राण्यामध्ये ज्या पूर्णता आहेत त्या सर्वांचे कारण हेच युद्ध आहे. यामुळेच सिंहाला शक्ती, हरिणाला वेग, आणि कुत्र्याला बुद्धी प्राप्त होते. यावरून या सर्व पूर्णता या युद्धामुळेच मिळणाऱ्या होत्या हे स्वाभविकपणे अनुमान करता येते. या उद्देशासाठीच अस्तित्वाच्या युद्धाची योजना करण्यात आली आहे. या युद्धामुळे होणारी वेदना, होणारे दु:ख ईश्वराने केवळ सुखाकरिताच प्राण्यांना उत्पन्न केले नसून दुसऱ्या एका विशिष्ट उच्च कोटीच्या उद्दिष्टाच्या पूर्तीसाठी केले आहे, असे सूचित करतो. किंवा ईश्वर प्राण्यांच्या सुखासाठी जेवढे लक्ष देतो, तेवढेच त्यांच्या उन्नतीसाठीही देतो. पण, यावरून जे उद्दिष्ट या युद्धामुळे सिद्ध होत आहे त्यासाठी कोणतीच योजना नव्हती असे म्हटले जाऊ शकत नाही. दुसरी बाब ही आहे की, हे युद्ध केवळ अस्तित्वासाठीच नसून, सुखाच्या पूर्णतेसाठी व प्राण्यांच्या शक्तींच्या स्वतंत्र विकासासाठीसुद्धा आहे. हे सर्व उद्देश दाखवून देतात की, या सृष्टीत एक उन्नत बुद्धी बाळगणारी चेतन सत्ता अस्तित्वात आहे.

स्वाभाविक निवड (Natural Selection) हा एक नियम आहे असे म्हणणे धाडसाचे होईल. भौतिक विज्ञानाने केलेल्या अनुकूल - प्रतिकूल अन्वेषणाधारे या नियमाचे तात्पर्य हे आहे की, एखाद्या कारणाद्वारे उत्पन्न झालेले, जे परिवर्तन एका जातीच्या प्राण्यांसाठी उपयोगी ठरत आहे, ते तर त्यांच्यासाठी नक्कीच उपयोगाचे ठरते, त्याच बरोबर त्याच्या संततीसाठीसुद्धा उपयोगाचे ठरते. त्यामुळे त्या संततीस जिवंत राहण्याचे आणि विकासोन्मुख होण्याचे सौभाग्य मिळते आणि त्यांचे शत्रू, ज्यांच्या जवळ एवढी शक्ती नाही ते, नष्ट होतील. पण ही स्वाभाविक निवड रचनेच्या विरुद्ध नसून, प्रबंध होऊ शकेल अशा व्यवस्थेस दाखवून देत आहे. या मार्गाने प्रबंध होऊ शकत नसेल तर चमत्काराशिवाय दुसरा पर्याय नाही.

केवळ स्वाभाविक निवडीचाच नियम आहे असे नसून ही स्वाभाविक निवडसुध्दा अचेतन

शक्तीच्या व अचेतन नियमाद्वारेच घडून येते असे डार्विन महोदय व त्यांचे अनुयायी म्हणतात. इच्छाशक्ती किंवा बुद्धीची येथे मुळीच आवश्यकता नाही, हे सिद्ध करण्यासाठी ते कोणतेच प्रमाण देत नाहीत. ही एक विचार करण्यासारखी बाब आहे. ज्यांच्या द्वारे ही निवड आणि तिचा परिणाम घडून येतो अशा केवळ अचेतन शक्तीकडे आणि बुद्धिशून्य नियमांकडे हे बोट दाखवीत असतात. ते आपले कार्य कशा प्रकारे करतात केवळ एवढेच त्या नियमामुळे प्रगट होते. तरी पण ते शक्तीद्वारे , नियमाद्वारेच संपूर्ण सृष्टीच्या समस्यांची सोडवणूक करता येते असा विश्वास बाळगतात. शक्ती आणि नियम यांना बुद्धिपूर्वक एका क्रमामध्ये ठेवून कार्य करवून घेणाऱ्या विश्वव्यापी बुद्धीला प्रवेशासाठी मुळीच वाव नाही असे म्हणतात. सृष्टीमध्ये सौंदर्य आणि प्रबंधाचे संपादन करणारे भौतिक साधन,भौतिक उपाय त्यांच्या दृष्टीसमोर आहेत. बुद्धी व विचार त्यांना दिसू लागले नाहीत. म्हणून त्यांना अस्तित्वच नाही असे ते म्हणतात. ते त्यांच्या इंद्रियाद्वारे जाणल्या जाणाऱ्या यंत्राचीच व्याख्या करतात आणि म्हणतात की, ते स्वतःच बनले आहे किंवा त्यास बनविणारा कोणीच नाही. कारण,ज्या बुद्धीने ते यंत्र बनले आहे आणि चालवले जात आहे ती बुद्धी त्यांना दिसत नाही. जे दिसत नाही ते नसतेच या म्हणण्याला कुणीही बुद्धीमान स्वीकारू शकत नाही.

अचेतन शक्ती आपापले काम करीतच असतात. त्यामुळे चेतनशक्तीद्वारे मिळणारे परिणाम या अचेतन शक्तीद्वारेच मिळतात. हे सिद्ध करण्यासाठी स्वाभाविक निवडीसंबंधीची जी उदाहरणे दिली गेली ती सर्व अप्रासंगिक आहेत. ते ज्या उदाहरणांना विरोधी म्हणून प्रस्तुत करीत आहेत ती सर्व अनुकूल आहेत. ती आस्तिकतेचीच पुष्टी करतात. प्रो. हक्सलेंनी दिलेली उदाहरणे मनोरंजक आणि उद्‌बोधक आहेत. बिस्केच्या खाडीच्या लहरी आणि वारे, ब्रिटनच्या तटावर अत्यंत दक्षतेने संख्या आणि परिमाणानुसार समुद्राच्या तटावरील वाळूच्या कणांना वेगवेगळ्या आकारामध्ये रचतात. रात्रीच्या वेळी पडणारे दवबिंदु बागेतील मजबूत अंकुरांना वेगळे करतात आणि दुर्बल, कमकुवत असलेल्यांचा नाश करतात. सोसाट्याचा वारा किंवा वादळ अंकुरास एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी वाहून नेतो. तिथे अंकुरित करतो. पण, हक्सलेंना काय सिद्ध करावयाचे आहे हे मात्र ते पूर्णपणे विसरतात. वाफेच्या यंत्रात अग्नी आणि पाणी अद्‌भुत कार्य करीत आहेत. पण अग्नी आणि पाणी अचेतन वस्तू आहेत. त्यांच्या द्वारे विशेष कार्य करवून घेण्यासाठी बुद्धीची आवश्यकता नाही असे म्हणणाऱ्या मनुष्याच्या तर्कबुद्धीला काय म्हणावे? प्रो. हक्सलेंची युक्तीसुद्धा अशाच प्रकारची आहे. त्यांची दृष्टी अग्नी आणि पाणी यांना वेगवेगळे पाहते. पण, बाष्पयंत्राकडे पाहत नाही. व्यवस्था व नियम यांनी युक्त असलेल्या सृष्टीमध्ये भौतिक संयोगामुळे किंवा परिस्थितीमुळे एखादे कार्य घडून येते म्हणून बुद्धी व विचारांची काहींच आवश्यकता नाही असे ते समजतात. हा तर्क अनुचित व अप्रासंगिक आहे असे दिसते. इंद्रियाद्वारे केवळ भौतिक पदार्थ आणि भौतिक घटना दिसू शकतात. म्हणून ईश्वर किंवा चेतनशक्ती ही नाहीच असे म्हणत असताना, बुद्धीचा निषेध करण्यासाठी बुद्धीची अपेक्षा बाळगणाऱ्या

उदाहरणांची निवड हक्सले करीत आहेत. हे पाहिले म्हणजे आपला पूर्वग्रह सिद्धीस नेण्यासाठी बुद्धिमानही कुठल्या स्तरावर जावू शकतो, हे सहजच कळून येते. बुद्धीचा आश्रय घेऊन बुद्धीचा विरोध करणे हा तर्कशास्त्रात अन्योन्याश्रय दोष आहे.

"लिङ्गसंबंधी निवडीचा नियम (Law of Sexual Selection) हा नियम आहे असे म्हणणे समंजसपणाचे नसले तरी त्याद्वारे विचारशक्ती सिद्ध होत आहे. आकार व रंग यांच्याशी संबंधित सौंदर्याचे संपादन करणे हाच याचा उद्देश आहे. अचेतन, अभौतिक शक्ती बुद्धीच्या सहायाची अपेक्षा न बाळगता सौंदर्यासारखी अद्‌भूत वस्तू उत्पन्न करू शकतात काय?

(फ्लिण्ट : थीज्म : पृ.२०८)

इथे एक आक्षेप घेतला जाऊ शकतो : "तुम्ही डार्विनच्या सिद्धांताधारे तो किंवा त्यांचे अनुयायी स्वीकार करीत नसलेल्या विषयास सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. फ्लिण्ट ईश्वरवादी असल्यामुळे ते वैज्ञानिक विषयांच्या संदर्भात प्रामाणिक मानले जाऊ शकत नाहीत. त्यांनी डार्विनच्या विचारांना कलाटणी देऊन आपले म्हणणे सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे."

या संदर्भात दोन बाबींचा उल्लेख आवश्यक वाटतो. पहिली ही की, फ्लिण्टनी आस्तिकतेचा विरोध करणाऱ्या वैज्ञानिकांच्या सिद्धांताद्वारेच "बुद्धी व इच्छाशक्ती बाळगणाऱ्या चेतनतत्त्वाशिवाय ज्या घडू शकतात असे डार्विन म्हणतो, ती बाब त्यांच्याच नियमाधारे चेतनशक्तीशिवाय घडू शकत नाही" असे दाखवून दिले आहे. यात कुठे चुकले? डार्विनने अधिक विचार केला असता तर तोही कदाचित याच निर्णयाप्रत येऊन पोहचला असता. यापेक्षाही विचित्र अशी दुसरी बाब ही आहे की, आमच्या विचाराचे समर्थन नावाजलेल्या उत्क्रांतीवादी विद्वानाद्वारे होत आहे. आल्फ्रेड रसेल वालेस (Alfred Russel Wallace) चे नाव प्रत्येक उत्क्रांतीवादी वैज्ञानिक जाणतोच. ते डार्विनचे सहयोगी होते. डार्विननंतरसुद्धा त्यांनी त्याच मार्गाने वाटचाल केली. त्यांनी आपल्या अर्धशतकाच्या संशोधनानंतर लिहिलेल्या दी वर्ल्ड ऑफ लाइफ (The world of life) जीवन-जगत् नावाच्या पुस्तकाच्या भूमिकेत एका रहस्याचा उलगडा केला आहे. वैज्ञानिकांना आस्तिकतेच्या जाणीवेसाठी हा उलगडा समर्पक ठरेल.

'......... माझ्या पुस्तकाचे एक मोठे वैशिष्ट्य हे आहे की, मी त्या मूलभूत नियमांचे साधे सोपे पण गंभीर परीक्षण केले आहे, ज्यांना डार्विनने आपल्या आवाक्याबाहेर समजून हेतुपुरस्सर आपल्या ग्रंथात लिहिले नाही. जीवन काय आहे? त्याची कोण-कोणती कारणे आहेत? विशेषतः जीवनामध्ये वाढीसाठी व सन्तानोत्पत्तीसाठी त्या विविध शक्ती कार्यरत आहेत त्यांचे काय कारण आहे? ......... मी या निर्णयाप्रत येऊन पोहोचलो आहे की, पक्षी व कृमी-कीटकांना पाहून एका उत्पादक - शक्तीची जाणीव होते, जी शक्ती या प्रकृतीस (निसर्गास) आश्चर्यजनक घटना घडून आणण्याजोगी बनवीत आहे. वाढीच्या प्रत्येक अवस्थेत आवश्यक असलेल्या आणखी एका संचालिका बुद्धीची ओळख आम्हास होते. आम्ही या वाढीबाबत विचार करणेसुद्धा आवश्यक समजत नाही. पण, समजतो तेवढी ही सामान्य बाब नाही. शेवटी, भूगर्भासंबंधीच्या अनेक

युगापासून या विशाल प्राणी- जगताच्या विकास- यात्रेत ओतप्रोत असलेले एक अंतिम उद्दिष्टही दिसून येत आहे.

" ---The most prominent feature of my book is that I enter into a populer, yet critical examination of those underlying fundamental problems which Darvin purposely excluded from his work as being beyond the scope his enquiry. Such are, the nature and causes of life itself; and more especially of its most fundamental and mysterious powers - growth and Reproduction.

"--- I argue, that they necessarily imply first a creative power, which so constituted matter as to render these marvels possible, next, a directive mind which is demanded at every step of what we term growth, and often look upon as so simple and natural a procces as to require no explanation; and lastly, ultimate purpose in the very existance of the whole vast life- world in all its long course of evolution throughout the eons of geological time."

(A.R. Wallace : World of life : P.6-7)

अशा प्रकारे डार्विनच्या उत्क्रांतीवादाद्वारे आस्तिकतेचे खंडन होत नाही. याउलट ईश्वराच्या विलक्षण बुद्धीचे समर्थन होते. विविध प्रकारचे वृक्ष, कृमी-कीटकांच्या शरीराची रचना, त्यांचे स्वभाव, पद्धती यासंबंधी डार्विनने लिहिलेल्या ग्रंथांच्या आधारे सृष्टीतील अद्‌भुत सौंदर्य, त्यामुळे होणारे अपूर्व ज्ञान यांची ओळख होते. वालेस महोदयाचे सुद्धा हेच मत आहे. उत्क्रांतीवाद आस्तिकतेचा समर्थक आहे. म्हणून आस्तिकांनी उत्क्रांतिवाद स्वीकारला असा अर्थ कोणीही घेऊ नये. उत्क्रांतिवादाच्या आधारे आस्तिकतेचा विरोध केला जाऊ शकत नाही हेच आम्हास इथे दाखवावयाचे आहे. याचा अर्थ आम्ही उत्क्रांतिवादी आहोत असा मुळीच नाही.

खरे पाहता, उत्क्रांतिवाद हा एक सर्वमान्य सिद्धांत आहे असे आज तरी समजले जात नाही. दीर्घकाळानंतरसुद्धा एक विचारणीय बाब (Theory) म्हणूनच या वादाचे अस्तित्व आहे. या वादावर कसा आणि कोठवर विश्वास ठेवावा याबाबतीत वैज्ञानिकसुद्धा निश्चय करू शकले नाहीत. संशोधनाची नवी पाऊलवाट अशा रीतीने चालू आहे की, हा वाद कोणत्या क्षणी धाडकन कोसळेल हे सांगता येत नाही. डार्विनच्या विचारांना आज अनेक प्रकारची विशेषणे जोडली जात आहेत. तीही तपासून पाहणे आवश्यक आहे. डार्विनच्या आणि वालेसच्या कथनामध्ये आकाश-पाताळाचे अंतर आहे. डार्विनचे सुपुत्र प्रो. जॉर्ज डार्विन १६ ऑगस्ट १९०५ रोजी दक्षिण आफ्रिकेत ब्रिटिश असोसिएशनच्या अध्यक्षपदावरून बोलताना म्हणाले, ''जीवनाचे रहस्य आजसुद्धा पूर्वीइतकेच रहस्यमय आहे.'' "The mystry of life remains as impenetrable as ever."

एबर्डीन विद्यापीठाचे प्रो. जे.ए. टाम्सन आणि एडिनबरा विद्यापीठाचे प्रो. पॅट्रिक गेड्सनी

उत्क्रांतिवादाविषयी जे विवेचन केले ते पाहण्याजोगे आहे.

"मानव कुठून आला आणि कसा आला? हे आम्ही जाणत नाही. मानवाच्या विकासाचे (प्रमाण) पुरावे संदिग्ध आहेत हे स्वीकार केले पाहिजे. विज्ञानात त्या पुराव्यांना कोणतेही महत्त्व नाही.

" We do not know when he emerged -- nor do we know how man arose for it must be admitted that the factors of the evolution of man partake largely of the nature of may be's, whick has no permanent position in Science.

(Ideals of science and faith)

९ जून १९०५च्या "टाईम्स लिटररी सप्लिमेंट" मध्ये उत्क्रांतिवादासंबंधी अनेकांनी केलेल्या वादविवादाविषयी लिहिलेला वृत्तांत पाहण्याजोगा आहे.

"असा गोंधळ अगोदर कधीच झाला नाही. हे सर्वजण स्वतःस विज्ञानाचा प्रतिनिधी म्हणवून घेत आहेत, हे एक आश्चर्यच आहे. काहीजण एखाद्या विषयात सहमत आहेत. सर्वमान्य असा एकही विषय नाही. उत्क्रांतिवादाची अशी काही चीरफाड झाली आहे की हा वाद आता नावालाच शिल्लक राहिला आहे."

मानवाच्या माकडापासून उत्पत्तीच्या संदर्भात सर.जी. डब्ल्यू. डॉसन म्हणतात की; "माकड आणि मानव यांच्या अंतर्गत असलेल्या आकृतीविषयी विज्ञान मुळीच जाणत नाही. एवढेच नसून "मानवाचे सर्वात जुने हाड आजच्या हाडासारखे आहे. यावरून मानव शरीराअगोदर झालेल्या उत्क्रांतीविषयी काहीच माहिती मिळत नाही."

प्रो. ओवेन यांचे म्हणणेही विचारात घेण्याजोगे आहे. "मानव- जात ही आपल्या जातीसारखी केवळ एकच आहे आणि आपल्या जातीचा एकमात्र प्रतिनिधी आहे."

"Man is the sole species of his genus and the sole representative of his species."

एवढेच नव्हे तर मानव दिवसेंदिवस उन्नती करीत नसून ऱ्हासाकडे वाटचाल करीत आहे. सिडनी कौलेट लिहितात : "मानव पतनातून उत्थानाकडे वाटचाल करण्याऐवजी ऱ्हासाकडे वाटचाल करीत आहे, असे म्हणण्यासाठी विज्ञान स्पष्टपणे साक्ष देत आहे."

"Science is equally explicit in its testimony, that instead of man having slowly improved from the lower to the higher, the tendency is exactly in the opposite direction."

एवढेच नसून 'आदिम अवस्थेत मानवाची बुद्धी तेवढ्यच उच्च कोटीची होती, जेवढी आज त्याच्या संततीत आहे. काही जणांचे असेही मत आहे की, आदिम अवस्थेतल्या मानवाची अवस्था उत्कृष्ट होती."

या सर्व मतांचा विचार केल्यानंतर डार्विनच्या उत्क्रांतिवादाचा स्वीकार करणे कठीण आहे.

पण, कोणी उत्क्रांतिवादी असो की नसो, ईश्वराच्या अस्तित्वाचा निषेध मात्र कोणीच करू शकत नाही.

विज्ञानाच्या प्रगतीमुळे धर्माचा ऱ्हास होईल असे समजून धर्माचे ठेकेदार, विज्ञानाचा तिरस्कार करतात. "बाबा वाक्यं किं प्रमाणम्? गुरु महाराज म्हणतील ते खरे" असे म्हणून आपल्या अनुयायांमध्ये अंधविश्वास व अंधश्रद्धा रुजवू पाहत आहेत. हे सर्व पाखंड विज्ञानाच्या प्रगतीमुळे राजरोसपणे चालू शकणार नाही, असे त्यांना वाटते. पण, खरे पाहता हा धर्म नाही. स्वार्थाचे, छळ- कपटाचे, अंधविश्वासाचे दुसरे नाव धर्म झाले आहे. स्वार्थामुळेच अनेक पंथ उदयास आले आहेत. अनुयायांना स्वतंत्रपणे विचार करण्यासाठी वाव दिला जाणार नाही तोवरच स्वार्थ साधला जाऊ शकतो. म्हणूनच हे विज्ञानाचा विरोध करतात. खरी आस्तिकता विज्ञानापासून मुळीच भीती बाळगीत नाही. खरे विज्ञान तर आस्तिकतेचे सहायक आहे. सृष्टीतील अज्ञात वस्तूंचे व घटनांचे अन्वेषण करून, त्यांचे रहस्य उलगडून दाखवल्यामुळे सृष्टिकर्ता ईश्वराचे महत्त्व अधिक स्पष्टपणे आम्ही जाणू शकतो.

विज्ञान नाहीसे झाले तर आम्हास ईश्वरविषयीची जाणीव मुळीच होणार नाही. आम्ही डोळे उघडून सृष्टीचे निरीक्षण करू लागताच विज्ञानाची सुरुवात होते. त्या निरीक्षणाचे विकसित रूप प्रयोगशाळेच्या स्वरूपात दिसून येते, जिथे वैज्ञानिक सृष्टिनियंत्या ईश्वराच्या व्यवस्थेसंबंधीच्या नियमांचे संशोधन करतात. वैज्ञानिक जेवढे अधिक परिश्रम करतात तेवढेच अधिक त्यांना ईश्वराच्या सृष्टीचे ज्ञान होते आणि जेवढी वाढ या ज्ञानामध्ये होते, ईश्वराची महानताही त्याच प्रमाणात अधिकतेने त्यांना कळून येते. सर ऑलीव्हर लॉज अगदी बरोबर म्हणतात :

"धर्माचे क्षेत्र आणि पूर्ण विज्ञानाचे क्षेत्र एकच आहे."

"The region of religion and the region of a completed science are one."

**- Sir Oliver Lodge.**

❑❑❑

# अध्याय : सहावा

## ईश्वराचे गुण (१)

आम्ही राहत असलेल्या या विशाल सृष्टीचे अवलोकन केले असता, ज्ञान व इच्छाशक्ती बाळगणाऱ्या एका अदृश्य सत्तेने या जगाची रचना केली आहे, असे दिसून येते. ज्या व्यवस्थेस सृष्टीपासून वेगळे केले तर सृष्टी राहू शकत नाही, त्या व्यवस्थेची रचना बुद्धी आणि इच्छाशक्तीशिवाय होणे शक्यच नाही. घड्याळाच्या सर्व सुट्या भागांना वेगवेगळे केले तर घड्याळीच्या सर्व सुट्या भागांना वेगवेगळे केले असता, ते जसे स्वतः पुन्हा घड्याळ तयार करू शकत नाहीत, तसेच सृष्टीच्या सर्व परमाणूंना वेगळे करून एका क्रमामध्ये मांडणी केली जाणार नाही तोवर ते स्वतः सृष्टिरूपात येऊ शकत नाहीत.

पण, ज्ञान, इच्छाशक्ती बाळगणारी एक सत्ता आहे असे स्वीकारले तरी आस्तिकांचे, धार्मिकांचे उद्दिष्ट सिद्ध होत नाही. कारण, ते ईश्वरामध्ये सृष्टिरचनेसाठी आवश्यक असलेल्या गुणांचाच स्वीकार करीत नाहीत, तर ईश्वरामध्ये नसलेल्या गुणांचेही आरोपण ते करीत आहेत. ज्या गुणांचे आरोपण केले जात आहे त्या बाबतीत कुठलाही पुरावा ते देऊ शकत नाहीत. एवढेच नसून ईश्वरामध्ये आरोपित केलेल्या गुणावरून पाहता तो सृष्टिकर्ता आहे, असेसुद्धा म्हणता येत नाही. ईश्वर एक सत्ता असून ती एखाद्या वस्तूची रचना करीत असेल तर ती रचना आमच्या सृष्टीपेक्षा भिन्न असून कुठे तरी अज्ञातस्थळी असावी असे वाटते. उदाहरणादाखल : सृष्टीतील सर्व घटना नियमानुसार घडून येत आहेत. म्हणून एका विचारशील नियन्त्याची आवश्यकता आहे असे एकीकडे सांगितले जाते. दुसरीकडे चमत्कार दाखवून ईश्वर सर्वकाही करू शकतो म्हणून नियमांचे उल्लंघनही करू शकतो असे म्हटले जाते. खरे पाहता, चमत्कारांचा आणि आस्तिकतेचा फारच घनिष्ठ संबंध झाल्यासारखे वाटत आहे. म्हणूनच स्वतःस संदेशवाहक, ईश्वर-प्रेषित सिद्ध करू इच्छिणाऱ्या प्रत्येक व्यक्तीस चमत्कार दाखविणे भाग पडले. इस्लाम मताच्या संस्थापकाविषयी अनेक चमत्कार सांगितले जातात. ख्रिश्चन मताचे प्रेषित येशू ख्रिस्त यांच्याविषयीसुद्धा असेच सांगितले जाते. इतर मतावलम्बीसुद्धा 'ईश्वर सर्व काही करू शकतो'चा राग आळवीत असतात. म्हणून नास्तिक म्हणतात की, तुम्ही सृष्टी नियमित आहे असे तरी माना किंवा अनियमित आहे असे तरी स्वीकारा. आस्तिकता सिद्ध करण्यासाठी अगोदर सृष्टी नियमित आहे असे स्वीकारता, नंतर अनियमित आहे असे म्हणणे तर्कसंगत नाही. नियमामुळे ईश्वराचे अस्तित्व आहे, असे स्वीकारीत असाल तर नियमांच्या उल्लंघनामुळे ईश्वराच्या अस्तित्वाचा निषेध करावा लागेल. चमत्कार नियमांच्या उल्लंघनाचे सूचक आहेत म्हणून ते कधीच नियन्त्याच्या अस्तित्वास सिद्ध करू शकत नाहीत. नियन्त्याचे अस्तित्व तेव्हाच सिद्ध होईल जेव्हा सृष्टी पूर्णपणे नियमबद्ध आहे हे सिद्ध केले जाईल आणि पूर्ण नियमबद्ध सृष्टी त्याच वेळी सिद्ध होऊ शकेल, जेव्हा चमत्कारांना या सृष्टीत स्थान दिले जाणार नाही. ईश्वर आपल्या नियमांचे कधीच उल्लंघन

करीत नाही, करू शकत नाही याविषयी दृढ विश्वास निर्मित केल्याशिवाय आस्तिकता मूळ धरू शकणार नाही.

याच प्रकारे जे 'ब्रह्मसत्यं - जगन्मिथ्या'- म्हणजे ब्रह्म हे सत्य आहे, जग मिथ्या आहे असे मानणारे भ्रमवादी आस्तिकतेच्या सिद्धीसाठी कोणते पुरावे देवू शकतात? जर जग 'मिथ्या' किंवा भ्रम मात्र आहे तर ते प्रमाणकोटीमध्ये कसे असू शकते? त्याद्वारे एखाद्या प्रमेयाची (प्रमाणाद्वारे सिद्ध केले जाऊ शकणारे) सिद्धी कशी होऊ शकते? एखादे यंत्र विलक्षण आहे म्हणून त्याचा निर्मातासुद्धा अतिशय बुद्धिमान् दिसतो असे म्हणून नंतर ते यंत्र यंत्रच नव्हे केवळ आमच्या इंद्रियांना भ्रम झाला आहे असे म्हणू लागलो तर, त्या यंत्राच्या आधारावर अनुमानित यंत्रनिर्माता आणि त्याचे बुद्धिकौशल्य कसे सिद्ध होऊ शकते? जग जर असत्य आहे, भ्रम आहे तर तुम्हास त्याचा उदाहरण किंवा दृष्टांतासाठी प्रयोग करता येणार नाही. पण, जगत् मिथ्यावादी (भ्रमवादी) श्री शंकराचार्यांनी आपल्या सिद्धांतांना सिद्ध करण्यासाठी याच मिथ्या जगातून उदाहरण घेतले आहे. जसे :

१ 'अस्मिन्' वाक्ये जन्मस्थितिप्रलयानां क्रमदर्शनात् ।
२ अस्य जगतो नामरूपाभ्यां व्याकृतस्यानेककर्तृभोक्तृ -
संयुक्तस्य प्रतिनियतदेशकालनिमित्तक्रियाफलाश्रयस्य
मनसाप्यचिन्त्यरचनारूपस्य जन्मस्थितिभङ्गा यतः
सर्वज्ञात् सर्वशक्तेः कारणाद्भवति तद् ब्रह्मति वाक्यशेषः।
वेदांत शास्त्र : १.१.२
३ अतः समानः पश्वादिभिः पुरुषाणां प्रमाणप्रमेयव्यवहार : ।१.१.२
४ वेदस्य हि निरपेक्ष्यं स्वार्थे प्रामाण्यं रवेरिव रूपविषये ।२.१.२
५ यतस्त्रापि पयोम्बुनोश्चेतनाधिष्ठितयोरेव प्रवृत्तिरित्यनुमीमहे ।२.२.३
६ धेन्वैवदेह्युपयुक्तं तृणादि क्षीरी भवति ।२.२.३

अशा प्रकारे जगातील उदाहरण देणे अशास्त्रीय आहे. खरोखर हे जग जर मिथ्या असेल तर जगाचे कारण ठरणारी बुद्धीसुद्धा भ्रमात्मक असेल. ब्रह्म कधीच होऊ शकत नाही. म्हणून ब्रह्म हे जगाच्या जन्म, स्थिती व लयाचे कारण आहे असे म्हणता येणार नाही.

खरे पाहता, जग हे मिथ्या आहे असे स्वीकार करून आम्ही एक पाऊलसुद्धा पुढे ठेवू शकत नाही. संपूर्ण ज्ञान-विज्ञानाच्या प्राप्तीसाठी मूळ साधन आमची इन्द्रियेच आहेत. यांच्यावर विश्वास ठेवणे आवश्यक व स्वाभाविकच आहे. इन्द्रिये आम्हास फसविण्यासाठी किंवा भ्रमात्मक ज्ञान करून देण्यासाठीच असतील तर ज्ञानप्राप्तीचे सर्व मार्ग बंदच म्हणून समजा. इन्द्रिये ज्ञान मिळवण्यासाठी सहायक ठरत नसतील तर त्यांचा उपयोग काय? इन्द्रियांवर विश्वास नाही ठेवला तर जग मिथ्या आहे हे तरी कसे सिद्ध होईल? म्हणूनच गौतममुनींनी न्यायशास्त्रात इंद्रियांच्या ज्ञानास खोटे न ठरवता त्यांच्या परीक्षणासाठी काही नियम सांगितले आहेत. त्या नियमांद्वारे

सत्यासत्याची परीक्षा करू शकतो. त्यासच 'प्रमाण चतुष्टय' म्हणजे प्रत्यक्ष, अनुमान, उपमान आणि शब्द म्हटले आहे. इंद्रियांद्वारे अनेक विषयांचे ज्ञान होऊ शकत नाही हे खरे असले तरी सूक्ष्म विषयाचे ज्ञान संपादन करण्यासाठी आवश्यक असलेल्या सूक्ष्म बुद्धीच्या विकासाचा आधार इन्द्रियजन्य ज्ञानच आहे. बीजगणित जाणणारी प्रत्येक व्यक्ती वर्गमूळ √-३ आणि घनमूळ ३√-५ या दोन्हीचे अर्थ जाणतो. पण, हे ज्ञान तो कोणत्या इंद्रियाद्वारे मिळवू शकला हे विचारले तर तो सांगू शकणार नाही. तरी पण त्याने ३, ५ वर्गमूळ, घनमूळ, बेरीज, वजाबाकी या सर्वांचे ज्ञान पंच ज्ञानेन्द्रियांद्वारेच मिळवले आहे. त्या ज्ञानाच्या आधारावरच संपूर्ण गणितशास्त्राची विशाल इमारत उभी आहे. आमची इंद्रिये आम्हास फसविणारी नाहीत, जग हे मिथ्या नाही हे स्पष्ट दिसून येत आहे. भ्रमाचा स्वीकार करून आस्तिकता सिद्ध केली जाऊ शकत नाही. श्री. शंकराचार्य म्हणतात की :

'अविद्यावद् विषयाण्येव प्रत्यक्षादीनि, प्रमाणानि शास्त्राणि च'

"प्रत्यक्षादी प्रमाण व शास्त्र अज्ञानविषयक आहेत. त्याद्वारे ज्ञान होऊ शकत नाही." असे श्री शंकरांनी म्हणावे यापेक्षा मोठे आश्चर्य ते कोणते? उपनिषद् प्रभृती शास्त्रांना शंकराचार्य अविद्येचे प्रतिपादक ग्रंथ समजतात, आणि आपल्या मताच्या स्थापनेसाठी त्यांचाच आधार घेतात. यासाठी त्यांनी दिलेला तर्कदेखील बरोबर वाटत नाही. ते लिहितात :

'पश्वादिभिश्चाविशेषात् — (शारीरिक भाष्य - भूमिका)

इथे श्री शंकराचार्यांना प्रत्यक्षादी प्रमाण केवळ अविद्यामात्र आहेत हे सिद्ध करावयाचे होते. यासाठी 'मनुष्य पशूसमान असल्यामुळे' हा तर्क त्यांनी दिला आहे. पशू काठी घेऊन येत असलेल्या मनुष्यास पाहून पळून जातात, हिरवा चारा आणणाऱ्या व्यक्तीस पाहून सामोरे येतात. अशाच प्रकारे मनुष्यसुद्धा तीक्ष्ण हत्यार धारण करणाऱ्यास पाहून पळून जातात. म्हणून पशू आणि मनुष्य सारखे आहेत. पशू अज्ञानी आहेत हे सर्वजण जाणतातच. म्हणून मनुष्यसुद्धा अज्ञानीच आहे.

हा किती विसंगत आणि अजब तर्क आहे याचा विचार वाचकांनी करावा. हा तर्क श्री शंकरासारख्या नावाजलेल्या तत्त्ववेत्त्याने दिला नसता, एका सामान्य व्यक्तीने दिला असता तर तो हास्यास्पद ठरला असता. पशूंचे 'काठी पाहून पळणे, गवत पाहून जवळ येणे' या व्यवहाराद्वारे अज्ञानी म्हणता येत नाही. ते जर या उलट वागले असते तर मात्र अज्ञानी ठरले असते. अशाच प्रकारे प्रत्यक्षादी प्रमाणावर विश्वास ठेवून तीक्ष्ण हत्यार धारण करणाऱ्यास पाहून पळतो, खाद्यपदार्थ पाहून जवळ येतो, म्हणून त्याला अज्ञानी म्हणता येत नाही. अनुमान वगैरे प्रमाणांचा योग्य उपयोग करून ज्ञान संपादन करू शकत नसल्यामुळे पशूंना अज्ञानी म्हटले जाते. मनुष्य आणि पशू यांमध्ये थोडेसे साम्य आहे. अनेक बाबतीत असमानतादेखील आहे. श्री शंकरांच्या वरील तर्काच्या आधारे प्रत्यक्षादि प्रमाण 'अविद्या' आहेत हे सिद्ध होऊ शकत नाही. या अविद्यारूपी आधारावर 'जगन्मिथ्या'वादाचे महाल उभारले जाऊ शकत नाही.

खरे पाहता, अशा प्रकारचे तर्क मनुष्यास आस्तिकतेपासून दूर सारून नास्तिकतेकडे घेऊन जातात. अनेक वेळा 'ईश्वर आहे की नाही' अशा संभ्रमात मनुष्य सापडतो आणि 'संशयात्मा विनश्यति' हे गीतेचे वाक्य सार्थक होते. अर्धवट ज्ञान बाळगणाऱ्या आस्तिकांनी जगामध्ये नास्तिकतेचा जेवढा प्रसार केला त्याच्या शतांशही नास्तिक म्हणवून घेणाऱ्या वैज्ञानिकांनी केला नाही असे विचार केल्यास आढळून येईल. हे आस्तिक, केवळ नावाचेच आस्तिक राहिले. पण, ईश्वराच्या नावावर अनेक प्रकारचे अत्याचारही करीत राहिले. ईश्वराच्या नावावर नाच-तमाशे उभारले. बालहत्या, मनुष्यहत्या, गोहत्या अशा अनेक प्रकारच्या क्रूर हत्या करण्यात आल्या. ईश्वराच्याच नावावर मनुष्यांना जिवंत जाळण्यात आले. यांनी आपल्या इच्छेनुकूल कल्पित मूर्तींना समोर ठेवल्या आणि जी शक्ती आपल्या नियमांद्वारे जगावर शासन करीत आहे त्या जगत् नियंत्या परमेश्वरास पूर्णतः विसरले. वैज्ञानिकांनी आध्यात्मिक क्षेत्रात उन्नती केली नाही. ईश्वराच्या नावाचा तिरस्कार केला असला तरी, जगामध्ये दिसणाऱ्या ईश्वरीय नियमांकडे ते आदराने पाहत राहिले. पण, आस्तिकांचे तर 'तेलही गेले, तूपही गेले' या म्हणीप्रमाणे ईश्वर आणि त्याचे नियम या दोन्हींच्या ज्ञानापासून विमुख होऊन बसले. जगामध्ये नास्तिकतेचा प्रसार केला तो तर वेगळाच. वैज्ञानिकांनी किमान भौतिक क्षेत्रामध्ये तरी यश मिळवले.

नास्तिकतेमुळे नास्तिकांचीही खूप हानी झाली. कारण, वास्तविक शांती देऊ शकणाऱ्या एका महान शक्तीच्या संपर्कापासून ते दूर राहिले. पण, ईश्वराविषयी प्रत्यक्ष, अनुमान वगैरे प्रमाणांचा आधार न घेता आपल्या मनाला येईल तशी कल्पना करणाऱ्या नावापुरत्या आस्तिकांनासुद्धा शांती मिळाली नाही.

आम्ही आत्तापर्यंत, दिसणाऱ्या या विशाल विश्वाच्या आधारे ज्ञान व इच्छाशक्ती बाळगणारी एक चेतन सत्ता सृष्टीची रचना करीत आहे हे सिद्ध केले.

या सृष्टीद्वारेच ज्ञानेच्छाशक्ती बाळगणारी ईश्वर नावाची सत्ता केवळ एकच आहे, अनेक नाहीत असे दिसून येत आहे. या विश्वात ती महाशक्तीच नसून इतर अनेक लहान- लहान प्राणीसुद्धा शक्तिशाली दिसत आहेत. मनुष्य व इतर प्राणी आपापल्या विभागात वेगवेगळे कार्य करीत असतात. जसे मी एक सत्ता आहे. मी माझ्या शरीरास चालवतो. हाताने लिहितो, डोळ्यांनी पाहतो, तोंडाने बोलतो, अनेक वस्तूंमध्ये बदल करून इच्छेनुकूल बनवू शकतो. माझ्यासारखी असंख्य माणसे या जगामध्ये आहेत. ते माझ्यापेक्षा कमी-अधिक कार्य करीत आहेत. याशिवाय असंख्य पशु-पक्षी व कृमी-कीटक त्यांच्या शक्तीनुसार कार्य करीत आहेत आणि आपापली वेगळी सत्ता प्रगट करीत आहेत. पण, या सत्तेत आणि सृष्टीवर शासन करणाऱ्या पहिल्या सत्तेत अंतर आहे. लहान सत्ता काही विशेष नियमांच्या आधीन राहूनच कार्य करू शकतात. सृष्टीच्या नियमांचे पालन करण्याची जबाबदारी यांच्यावर आहे. हे नियमांवार शासन करत नाहीत, त्यांचे अनुसरण करतात, मनुष्याने एखादे घर बांधण्याची इच्छा केली तर त्यासाठी सहायक नियमांचे ज्ञान आवश्यक आहे. थोडीशी चूकसुद्धा उद्देशाची पूर्ती होऊ देत नाही, घर बांधणारी आणि ज्या

वस्तूद्वारे घर बांधले जाते ती, या दोन्हीही सत्ता लहानच आहेत. पण, घर बांधणारी सत्ता चेतन आहे आणि घरासाठी वापरलेली वस्तू अचेतन आहे. या चेतन व अचेतनामध्ये अंतर एवढेच आहे की, अचेतनवस्तू ज्ञानाशिवाय सृष्टीच्या नियमांचे पालन करीत आहेत. काही नियमांचे पालन करावे, काहींचे करु नये असा विचार जड वस्तू करू शकत नाहीत. पण, चेतनसत्ता सृष्टीतील अनेक नियमांपैकी स्वतःसाठी आवश्यक असलेल्या नियमांना वेगळे करू शकते आणि त्यानुसार कार्य करण्याचे सामर्थ्यही बाळगते. उदाहरणादाखल : शेतीच्या नियमांना जाणून घेऊन, त्या नियमांचे पालन करून गहू पिकवू शकतो किंवा विमानाच्या निर्मितीचे नियम जाणून घेऊन विमान बनवू शकतो. या दोन्हीपैकी कोणत्याही कार्याची निवड करू शकतो. अचेतन चेतनाप्रमाणे स्वतःसाठी नियमांची निवड करू शकत नाहीत. नियमच त्यांना व्यवस्थेत चालवीत असतात.

या नियमांना चालवणारी शक्ती फार मोठी आहे. तिचा प्रभाव या सृष्टीत सर्वत्र दिसून येत आहे. ही शक्ती एक आहे की अनेक, हे पाहावयाचे आहे. सृष्टीच्या नियमांचा मागे विचार केला गेला. त्या वेळी विश्वातील स्वतंत्र घटना वेगवेगळया नसून एका नियमाद्वारे परस्परांशी संबद्ध आहेत असे दर्शविण्यात आले आहे. उदाहरणादाखल : 'क' नावाचा गहू एका शेतात पेरला जातो आणि 'ख' नावाच्या परिस्थितीत ठेवल्याने त्यात गहू पिकतात. त्याच प्रकारे कुठेतरी दूर ठिकाणी 'ग' नावाचा गहू 'ख' नावाच्या परिस्थितीत पेरल्याने गहूच उत्पन्न होतात. यावरून 'क' 'ग' नावाचे दोन्ही गहू कोणत्या तरी एका 'घ' नावाच्या विशेष नियमात बांधले गेलेले आहेत असे दिसते. इथे 'घ' नावाचा नियम 'क' 'ग' यांच्या आश्रित नाही, हे लक्षात घ्यावयास पाहिजे. जर 'क' 'ग'च्या आश्रित असता तर दोन नियम झाले असते. कारण 'क' 'ग' हे एकमेकावर आधारलेले नसून देश, काळामुळे एकमेकापासून दूर आहेत. दोन नियम वेगवेगळे स्वीकार करण्यात काय दोष आहे असे म्हणाल तर, व्यक्ती आणि नियम यांच्यात अंतर कोणते राहिले? 'क' एक व्यक्ती आहे ती नियमरूप कशी होऊ शकते? तसेच 'ग' एक व्यक्ती नियमाशी एकरूप कशी होऊ शकते? अनेक घटनांना आपल्या अंतर्गत ठेवणारेच नियम होऊ शकते. किंवा अनेक घटना एकसारख्या घडल्या तर त्यावरून नियमाची ओळख होते. म्हणून गव्हापासून दुसरे एक पीक उत्पन्न होण्याचा नियम 'क' व 'ग' च्या आश्रित नाही. 'क' व 'ग' हेच उलट त्या नियमाच्या आश्रित आहेत. या नियमांचे आधारस्थान कोणते आहे? ही बाब विचारणीय आहे. नियमः स्वतःच्या आधारास सोडून राहू शकत नाही. वस्तू देशकाळाच्या अपेक्षेने अत्यंत भिन्न आहेत. त्यामुळे फुलाच्या हारातील धाग्याप्रमाणे प्रत्येक वस्तूत तो नियम ओवला जाऊ शकत नाही. म्हणून घटकांना नियमाश्रित राहण्यासाठी भाग पाडणाऱ्या एका विशेष बुद्धीचा आश्रय त्या नियमांना आहे, असे स्वीकारल्याशिवाय गत्यंतर नाही. हा विषय दुसऱ्या एका उदाहरणाद्वारे अधिक स्पष्ट होतो. 'अ' लंडनमध्ये एक विशेष गुन्हा करतो त्यास 'स' दंड होतो. मुंबईत सुद्धा एक 'ब' तोच अपराध करतो ज्याचा 'अ' शी कोणताच संबंध नाही. त्यास सुद्धा 'स' दंड मिळतो. हा एक नियम झाला. या नियमाची स्थिती 'अ' आणि 'ब' व्यक्तीमध्ये नाही. नियमांचे आश्रयस्थान

'राज्य' म्हटल्या जाणाऱ्या बुद्धीमध्ये किंवा बुद्धी-समूहामध्ये आहे. 'लंडन' आणि 'मुंबई' ही दोन्ही त्या राज्याच्या अंतर्गत व आधीन आहेत.

अनेक व्यक्ती एका नियमाच्या आश्रित असल्याप्रमाणे नियमसुद्धा मोठ्या नियमांच्या आधीन असतात. ते नियम त्यांच्यापेक्षा मोठ्या नियमांच्या आधीन असतात. अशा प्रकारे क्रमशः पुढे जात गेलो; तर शेवटी संपूर्ण सृष्टी एकाच नियमाच्या आधीन आहे असे सिद्ध होते. त्या नियमासच वेदामध्ये 'ऋत' म्हटले जाते. हे 'ऋत' एकच आहे, अनेक नाहीत. संपूर्ण सृष्टी या 'ऋत'च्या आश्रित आहे. लहान- लहान नियम एक एक वेगळे विज्ञान बनवतात. जसे वनस्पती शास्त्राचे नियम, ज्योतिषशास्त्राचे नियम, रसायनशास्त्राचे नियम. पण, ज्याप्रमाणे गणितशास्त्राच्या अंतर्गत बरेचसे लहान-लहान शास्त्र आहेत; ज्यांना अंकगणित, बीजगणित, रेखागणित, त्रिकोणमिति वगैरे नावांद्वारे ओळखले जाते, त्याचप्रमाणे ही मोठ-मोठी शास्त्रेसुद्धा त्याच 'ऋत'च्या आधीन आहेत, आणि हे 'ऋत' त्या अपार बुद्धीमध्ये आश्रित आहे. ज्यास आस्तिक 'ईश्वर' म्हणतात :

ऋतञ्च सत्यञ्चाभीद्धात्तपसो ऽध्यजायत ।

ऋ. १०.१९०.१

म्हणजे 'ऋत' आणि 'सत्य' 'अभीद्ध' व 'तपस' पासून उत्पन्न झाले, असे वेदाचे विवेचन आहे. संपूर्ण सृष्टीवर शासन करणारे जे नियम आहेत, त्यांस 'ऋत' म्हणतात. 'सत्य' ती शक्ती आहे जी त्या नियमाच्या आधीन राहण्यासाठी जगातल्या प्रत्येक वस्तूस व घटनेस भाग पाडीत आहे. जगामध्ये न्यायाधीश ज्याप्रमाणे न्यायालयात अमुक व्यक्तीस अमुक दंड दिला जावा असा निश्चय करतो आणि पोलिस त्यास दंड देतो; त्याचप्रमाणे 'ऋत'ला बाळगणाऱ्या बुद्धीचे नाव 'अभीद्ध' आहे. सत्यास बाळगणाऱ्या शक्तीचे नाव 'तपस' आहे. ही बुद्धी आणि शक्ती जगातल्या न्यायाधीश व पोलीस यांच्यासारखी वेगवेगळी नाही. या दोन्ही त्या एकाच सत्तेचे गुण आहेत, ज्यास आम्ही 'ईश्वर' म्हणतो. अशा प्रकारे 'ईश्वर' एकच आहे; अनेक नाहीत असे सिद्ध होते. ईश्वराच्या 'एकते'विषयी योग्य त्या ठिकाणी अधिक विवेचन करू.

ईश्वर सर्वव्यापक आहे काय? हा आणखी एक प्रश्न आहे. प्रो. जे. एस. मिल महोदयांनी आपल्या 'धर्माविषयी तीन लेख' यामध्ये या प्रश्नाचा उहापोह केला आहे. हा प्रश्न खरोखरच अत्यंत गूढ आणि चिंतनीय आहे. घड्याळ बनवणारा घड्याळात व्यापक असत नाही. कुंभार माठाच्या कणाकणात दडलेला नाही. तरी पण हे सर्व आपापले कार्य करतातच ना! अल्पसामर्थ्य बाळगणाऱ्या कुंभाराने बनवलेला माठ त्याच्या व्यापकतेशिवाय कितीतरी वर्षे काम करू शकतो तर, त्या ईश्वरास, ज्याची शक्ती व ज्ञान अमर्यादित आहे, सृष्टीत व्याप्त होवून - (सर्वत्र) राहण्यासाठी का भाग पाडण्यात यावे? त्याच्या व्यापकतेशिवायही सृष्टी कार्य का करीत नाही? वेदांती ईश्वरास निमित्तकारण न मानता उपादान कारण मानतात. श्री शंकराचार्यांनी

"तदनन्यत्वमारम्भणशब्दादिभ्यः' वे. २.१.१४

या सूत्राचे भाष्य करताना छान्दोग्योपनिषदामधील हे वाक्य उद्धृत केले आहे :

“यथा सोम्यैकेन मृत्पिण्डेन सर्वं मृण्मयं विज्ञातं स्याद्
वाचारम्भणं विकारो नामधेयं मृत्तिकेत्येव सत्यम्”

माठात माती ज्याप्रमाणे व्यापक असते त्याचप्रमाणे ईश्वर या सृष्टीत सर्वत्र व्यापक आहे, 'मिल'सारखे पाश्चात्य तत्त्ववेत्तेच नव्हे तर इतर मतानुयायीसुद्धा 'ईश्वर असला तरी त्यास व्यापक असण्याची आवश्यकता दिसत नाही' अशा भ्रमात वावरत आहेत. ईश्वराची व्यापकता जणू एक कोडेच होऊन बसले आहे. वेदांती ईश्वराच्या सर्वव्यापकतेचा निषेध करीत नाहीत. पण, निमित्तकारणाचा निषेध करतात. हासुद्धा एक प्रकारे वास्तविक आस्तिकतेवर वज्रपातच आहे. पण विविध मतानुयायी कुणी ईश्वर सातव्या आकाशात, कुणी चौथ्या, कुणी क्षीरसागरात, कुणी वैकुंठात, कुणी कैलासात राहतो असे मानतात, त्यांची स्थिती केविलवाणी झाली आहे. एकीकडे ईश्वरास (हाजिर नाजिर) सर्वव्यापक म्हणतात आणि दुसरीकडे ईश्वर एका विशिष्ट ठिकाणी राहतो असेही म्हणतात. या परस्परविरोधी विचारांचा ताळमेळ बसवण्यासाठी विलक्षण अशा तर्क-वितर्काचा आधार घेतात. या तर्क-वितर्कामध्ये वाक्छल अधिक प्रमाणात दिसून येतो. काही जण, सूर्य आकाशात एका विशिष्ट ठिकाणी राहून आपल्या प्रकाशाद्वारे संपूर्ण भूमंडळात व्यापक असल्याप्रमाणे ईश्वर एका ठिकाणी राहूनसुद्धा संपूर्ण विश्वात व्यापक सर्वत्र राहतो असे म्हणतात. ईश्वर स्वतः व्यापक नसला तरी प्रकाशस्वरूपात तो व्यापक आहे. तो चौथ्या किंवा सातव्या आकाशात आहे, पण सर्व वस्तूंना पाहू शकतो असा यांचा विश्वास आहे. काही जण म्हणतात की, जॉर्ज चक्रवर्ती लंडनमध्ये राहून भारतावर शासन करीत असल्याप्रमाणे ईश्वर एका ठिकाणी राहून आपल्या शक्तीद्वारे संपूर्ण सृष्टीमध्ये व्यापक आहे.

अगोदर “निमित्तकारण (Efficient Cause) कार्यामध्ये व्यापक असते की नाही?” या विषयाची चर्चा करु या. 'जिथे कर्ता स्वतः असत नाही त्या ठिकाणी तो कोणतीच क्रिया करू शकत नाही' ही बाब सर्वांना मान्य आहेच. माझ्या हातात असलेल्या वस्तूवर माझा अधिकार आहे. जिथे मी नाही तिथे माझ्याद्वारे कोणतीच क्रिया घडू शकत नाही. एका क्रियेत अनेक लहान-लहान क्रियांचा केव्हा केव्हा समावेश होत असतो. त्यापैकी एक क्रिया एक व्यक्ती करते व उरलेल्या क्रिया दुसऱ्या व्यक्ती करतात. पण, व्यवहारासाठी त्या सर्व क्रिया एकानेच केल्या आहेत असे आपण म्हणतो. ती एक पद्धत आहे. वास्तविकता नव्हे. उदाहरणादाखल : 'ताजमहाल शहाजहानने बांधला' असे म्हणतो. ताजमहालची निर्मिती ही एक क्रिया नव्हे. त्यात असंख्य क्रिया समाविष्ट आहेत. शहाजहानने इच्छा केली. त्यासाठी होणाऱ्या खर्चासाठी धन देण्याची आज्ञा त्याने दिली. एक किंवा अनेक तांत्रिकांनी मिळून 'नकाशा' (Plan) तयार केला. माती, दगड, विटा, मजुरांनी एकत्रित केल्या. 'शहाजहानने ताजमहाल बांधला' असे नाव शहाजहानचे असले तरी असंख्य व्यक्तींनी क्रिया केल्या तेव्हा ताजमहाल तयार झाला. या क्रियांपैकी, ज्या क्रिया शहाजहानने केल्या, त्या क्रिया ज्या देशकाळात करण्यात आल्या तिथे शहाजहान उपस्थित होता.

इतरांच्या क्रियेसाठी इतर उपस्थित होते. त्यांपैकी एकटा जरी नसता तर त्याच्या द्वारे होणारी क्रिया झाली नसती आणि ताजमहालच्या बांधकामात अडचण निर्माण झाली असती. एवढेच नसून, काही क्रिया अशा आहेत की ज्यांचा आम्ही विचार देखील केला नाही. जसे, ताजमहाल बनवीत असताना शहाजहानने केवळ मनुष्याद्वारे केल्या जाऊ शकणाऱ्या क्रियेसाठी योग्य व्यक्तीचा शोध घेतला. मनुष्याच्या सहायतेशिवाय होणाऱ्या शेकडो क्रिया अशा होत्या ज्या त्या वेळी घडत होत्या. ताजमहालच्या निर्मितीत त्याचे सहकार्य त्याचप्रमाणे आहे. जेवढे इतर क्रियांचे आहे. त्या क्रिया झाल्या नसत्या तर तेवढया वस्तूची जमवाजमव करूनही ताजमहाल बनू शकले नसते. त्या क्रिया कोणत्या? सूर्योदय होणे, वेळेवर पाऊस पडणे, गुरुत्वाकर्षणात कोणताही बदल न होणे या सर्व क्रिया मानवेतर आहेत. अशा प्रकारे ताजमहालच्या निर्मितीत केवळ शहाजहान व त्यांच्या कारागीरांच्या क्रियाच कारणीभूत नसून इतर शक्ती, ज्यांच्या आश्रयावर मनुष्यांच्या क्रिया आधारलेल्या आहेत. त्याही कारणीभूत आहेत. ज्या अंशामध्ये मनुष्य कर्ता होता तेवढ्या अंशात ते व्यापकच होते. ज्या ठिकाणी मानवेवर अदृश्यशक्तीचे कर्तुत्व होते, तिथे मनुष्याच्या व्यापकतेची आवश्यकता नाही.

घड्याळाचे समर्पक असे उदाहरण घेऊ. ताजमहालप्रमाणे घड्याळाची निर्मिती ही एक क्रिया नाही. यात अनेक क्रिया समाविष्ट आहेत. घड्याळ बनविणारा ''सर्व अवयवांना - सुट्या भागांना एका कुसात ठेवण्याची'' केवळ शेवटची क्रिया करीत आहे. ही क्रिया तो ज्या ठिकाणी आहे त्याच ठिकाणी करू शकतो. त्याने केलेल्या शेवटच्या क्रियेपूर्वी कितीतरी क्रिया झाल्या आहेत. त्या क्रिया झाल्या नसत्या तर तो घड्याळाच्या सुट्या भागांची मांडणी व्यवस्थितपणे करण्यात यशस्वी झाला नसता. त्या क्रियेपैकी काही मानवी व काही मानवेतर क्रिया आहेत. जसे खोदकाम करून खाणीतून लोखंड काढणे, आणणे, स्वच्छ करणे, वितळवणे, सुटे भाग तयार करणे, या सर्व क्रिया-समूहाचा संबंध असंख्य व्यक्तींशी आहे. हे सर्व मनुष्य आपापली क्रिया करताना त्या क्रियेत व्यापक होते. पण याशिवाय हजारो मानवेतर क्रियासुद्धा होत्या. जसे, लोहाराने एक सुटा भाग बनविला. 'बनविला' या शब्दाचा हाच अर्थ आहे की, लोखंडाचे पूर्वीचे रूप पालटून दुसरे रूप (Shape) दिले. पण, लोखंडाचे परमाणू एका विशिष्ट काळापर्यत परस्पर संयुक्त का राहिले? या संयोगाचा कर्ता लोहार नाही. लोहाराने सुटे भाग बनविण्यासाठी लोखंडच का निवडले? लाकूड का निवडले नाही? त्याचे कारण लोखंडाचे परमाणू एका विशिष्ट काळापर्यंत संयुक्त राहतील, लाकडाचे राहू शकणार नाहीत हे तो जाणत होता. परमाणूंच्या संयोग- वियोगाचे क्षेत्र त्याच्या अधिकाराबाहेरचे आहे. तो परमाणूंच्या संयोगाचा कर्ता नाही. तो परमाणूंना संयुक्तही करीत नाही. टिकवूनही ठेवीत नाही. तो केवळ असलेल्या परिस्थितीचा उपयोग करून घेतो. अशा प्रकारे घड्याळ बनवणारा घड्याळामध्ये व्यापक नसला तरी घड्याळ चालवीत आहे हे म्हणणे बरोबर नाही. तो ज्या क्रियेचा जबाबदार आहे, तेवढ्याच क्रियेशी त्याचा संबंध होता. घड्याळाच्या चेतन- नियमाचा कर्ता घड्याळ बनविणारा नाही. ते नियम पूर्वीच अस्तित्वात होते.

त्याचे संचालन सुद्धा एका अदृश्य शक्तीच्या आधीन आहे. घड्याळ बनविणाऱ्यास घड्याळीच्या निर्मितीनंतरसुद्धा चालविण्यासाठी जबाबदार स्वीकारले तर, घड्याळीत बिघाड होईल तेव्हा त्याचा जबाबदार कोण? घड्याळीचा कर्ता, कमी -अधिक काळापर्यंत चालू शकणाऱ्या सुट्या भागांच्या निवडीपर्यंतच जबाबदार आहे. जसे 'अ' व 'ब' या दोन वस्तू आहेत अशी कल्पना करा. 'अ' 'ब' पेक्षा निर्बळ आहे. घड्याळ निर्मात्याने आपल्या घड्याळासाठी 'अ'ची निवड करावी की 'ब'ची, ही त्याची जबाबदारी आहे. पण, 'ब', 'अ' पेक्षा कमी का चालतो याचा त्याच्याशी काहीच संबंध नाही. 'अ'च्या परमाणूंना विशिष्ट काळापर्यंत संयुक्तावस्थेत ठेवणाऱ्या शक्तीने आपले काम करणे सोडले तर त्या वेळी घड्याळीचा निर्माता काहीच करू शकणार नाही.

निमित्तकारण कार्यामध्ये व्यापक होऊन राहण्याची आवश्यकता नाही, असे जेव्हा आम्ही म्हणतो, तेव्हा कार्याच्या फक्त एकाच बाजूचा विचार करतो. संबंध कार्य आमच्या दृष्टीत राहत नाही. हीच बाब दुसऱ्या एका उदाहरणाद्वारे स्पष्ट करू. कल्पना करा की, तुम्ही माझ्या तळहातावर वाळूच्या कणांपासून 'अ' अक्षर बनवले आणि अमुक व्यक्तीस दाखवून या असे म्हटले. तेव्हा तुम्ही केवळ 'अ' लिहिण्यापुरतेच कर्ता आहात. तळहातावर त्या अक्षरास त्याच स्थितीमध्ये ठेवणे हे माझे काम आहे. मीच या कामाचे निमित्तकारण आहे. त्या अक्षरास, मध्यंतरीच बिघडून टाकण्याचा मला अधिकार आहे. पण, मी तसे करणार नाही असा माझ्यावर तुमचा पूर्ण विश्वास आहे. अशाच प्रकारे घड्याळीच्या सुट्या भागांना एका क्रमामध्ये जमविण्यासाठी निर्माता निमित्तकारण आहे. पण ते सुटे भाग त्याच्या विश्वासाप्रमाणे चालण्यासाठी तो निमित्तकारण नाही. त्याचे निमित्तकारण अदृश्य शक्ती आहे. म्हणून जगामध्ये मानवनिर्मित वस्तू पाहिल्यानंतर त्या वस्तूचे निमित्तकारण केवळ मनुष्यच नसून अदृश्य शक्तीही आहे हे जाणून घेणे आवश्यक आहे. मनुष्य केवळ काही अंशामध्ये निमित्तकारण आहे. म्हणून निमित्तकारण क्रियेबरोबर असते, वेगळे असत नाही. जोपर्यंत निमित्तकारण आहे तोपर्यंतच क्रिया होते हेही समजून घेणे आवश्यक आहे.

सृष्टीकडे विचारपूर्वक पाहिल्यानंतर ईश्वर सर्वव्यापक आहे हे आपोआपच सिद्ध होते. कारण, पर्वतांची निर्मिती, नद्यांचे वाहणे, सूर्याच्या उदयास्ताचे नाव सृष्टी नाही. ''दोन परमाणूंचा परस्पर संयोग, संयुक्तपणे राहणे, केव्हातरी वेगळे होणे'' हे सर्व कार्य सृष्टीच्या अंतर्गतच आहेत. या असंख्य क्रिया प्रत्येक क्षणी प्रत्येक ठिकाणी होत असतात. यांपैकी काही अतिसूक्ष्म तर काही स्थूल आहेत. सूर्योदय ही एक स्थूल क्रिया आहे. पण, सूर्यकिरणामध्ये सात रंगांचे मिश्रण, मिश्रित अवस्थेत राहणे, विभिन्न परिस्थितीत वेगळे होणे, या सर्व क्रिया अतिसूक्ष्म आहेत. म्हणून या क्रियांच्या उत्पत्ती, स्थिती, लयासाठी एक सूक्ष्मातिसूक्ष्म व महत्तम सत्तेची आवश्यकता आहे. म्हणूनच घड्याळीचे उदाहरण ईश्वर अतिसूक्ष्म व सर्वव्यापक आहे असे सिद्ध करते. घड्याळीच्या निर्मात्याप्रमाणे ईश्वर घड्याळरुपी सृष्टीपासून वेगळा असता तर, राज्य चालविण्यासाठी चक्रवर्ती

राजा सेवकावर आश्रित असतो त्याप्रमाणे सृष्टीस चालविण्यासाठी ईश्वरास इतर शक्तींच्या आश्रित राहावे लागले असते. सेवकांच्या मनावर चक्रवर्ती राजाचा अधिकार चालत नाही त्याप्रमाणे ईश्वराचाही अधिकार इतर शक्तींवर राहणार नाही. सेवक राजाच्या आज्ञेच्या उल्लंघनासाठी दंडास पात्र ठरतात. तसेच इतर शक्तींनीसुद्धा ईश्वराविरुद्ध उलट-पालट केली असती. सम्राट आपल्या राज्यात व्यापक नसल्यामुळे प्रजा अनेक प्रकारचे दुष्कृत्य करीत असते. राजाच्या इच्छेविरुद्ध वर्तन करीत असते. ईश्वर एकदेशी झाला असता तर ईश्वराचेही तसेच झाले असते.

सृष्टीच्या अवलोकनाद्वारे खालील गोष्टी दिसून येतात :

१. सृष्टी नियमानुकूल आहे.
२. नियमांद्वारे एका विशाल बुद्धीची ओळख होते.
३. नियम अटळ आहेत.
४. हे नियम अतिसूक्ष्म वस्तूवरसुद्धा शासन करतात.

कोणतीही वस्तू या नियमांचे उल्लंघन करू शकत नाही. म्हणून ईश्वर :

१. नियन्ता आहे.
२. ज्ञानवान् : सर्वज्ञ आहे.
३. एकरस - अपरिवर्तनशील आहे.
४. अतिसूक्ष्म व सर्वशक्तिमान् आहे, हे सिद्ध होते.

अगोदरच्या तीन विषयांना सर्व आस्तिक मानतात. चौथ्या विषयात बरेच मतभेद आहेत. हा मतभेद दुसऱ्या पद्धतीने प्रगट केला जातो. ईश्वर सूक्ष्म व सर्वशक्तिमान आहे या सिद्धांताचा कोणीही आस्तिक निषेध करीत नाही. पण, याबरोबरच अनेक जण ईश्वर साकार आहे किंवा साकार होऊ शकतो असेही स्वीकारतात. साकार-निराकार वाद दीर्घकाळापासून कलह, वादविवादाचे जणू केंद्रच बनले आहे. यामुळे अनेक मतभेद उदयास आले आहेत. साकार-निराकाराचा हा प्रश्न सुटला तर जगातील सर्व आस्तिक एकत्र येतील, आणि नास्तिकसुद्धा नास्तिकता सोडून आस्तिक बनतील असा माझा विश्वास आहे. पण, खरी अडचण ही की, मतभेद बाळगणारे आपल्या पारंपरिक विचारांचा दुराग्रह बाळगतात. त्यामुळे सत्याच्या स्वीकृतीसाठी ज्या उदारतेची व समजूतदारपणाची आवश्यकता आहे ती लुप्त होत चालली आहे.

'साकार' याचा अर्थ काय आहे? आकार किंवा आकृतीचा संबंध इंद्रियांशी आहे. साकार वस्तूस डोळ्याने पाहू शकतो व हाताने स्पर्श करू शकतो. ज्या वस्तूस पाहू शकत नाही, स्पर्श करू शकत नाही ती वस्तू निराकार आहे, असे म्हणतात. सृष्टीत दोन्ही प्रकारच्या वस्तू अस्तित्वात आहेत. शतपथ ब्राह्मणमध्ये लिहिले आहे – 'द्वे वाव ब्रह्मणो रूपे मूर्तं चैवामूर्तं च' (१४.५.३.१) म्हणजे सृष्टीची दोन रूपे आहेत. एक साकार व दुसरे निराकार. पाण्याची जेव्हा वाफ होते तेव्हा ते निराकार होते, म्हणून दिसत नाही. पण, जेव्हा वाफ घनरूप धारण करून ढग बनते तेव्हा

ती साकार होते. वायू निराकार आहे. आकाश निराकार आहे. त्यांना पाहू शकत नाही. ईश्वर निराकार आहे की साकार हा एक प्रश्न आहे. साकार वस्तू नक्कीच स्थूल असेल. सृष्टीत असलेल्या स्थूल वस्तू सूक्ष्म वस्तूत व्यापक होऊन राहू शकत नाहीत. म्हणून ईश्वर साकार असेल तर सर्वव्यापक होऊ शकत नाही. सर्वव्यापक असेल तर साकार होऊ शकत नाही. साकार होऊन सर्वव्यापक होणे मुळीच शक्य नाही. साकार आहे असे स्वीकारून सर्वव्यापकतेचा निषेध केला तर ईश्वर सृष्टीकर्ता होऊ शकत नाही. सृष्टि-कर्तृत्वाचा निषेध केला तर ईश्वर ईश्वरच राहत नाही आणि आस्तिकतेचा पायाच नाहीसा होईल. म्हणून आस्तिकांचे ईश्वरास साकार मानणे आपल्याच विचारांना मूठमाती देणेच ठरते. एवढेच नव्हे तर नास्तिकाकडून हसे करून घेण्यासारखे आहे. ईश्वर साकार असता तर तो दिसला असता. दुसरे, तो सूक्ष्मवस्तूत व्यापक नसता. सृष्टीतील नियम अतिशय सूक्ष्म असल्यामुळे त्यांच्यावर शासन करण्यासाठी एका अतिसूक्ष्म निराकार सत्तेची आवश्यकता आहे. म्हणून ईश्वरास साकार म्हणणे बरोबर नाही.

काहीजण निराकार वस्तू शक्तिसंपन्न असू शकत नाहीत असे समजतात. म्हणून सर्वशक्तिमान होण्यासाठी ईश्वरास साकार असणे आवश्यक आहे. पण असे विचार तत्त्ववेत्त्यांचे नाहीत. तरी पण व्यावहारिक दृष्टिकोनातून बुद्धिमान व्यक्तीसुद्धा एखाद्या वेळी स्वीकार करतात. काहीजणांचा प्रश्न असा असतो की, ईश्वरास हात नसतील तर तो सृष्टिरचना कशी करतो? डोळे नसतील तर पाहू कसे शकतो? पण, बिचाऱ्यांना हे माहीत नाही की, निराकार वस्तूपेक्षा साकार वस्तू फारच दुर्बळ असते. निराकार वस्तूचे साकार वस्तूवर प्रभुत्व असते. साकार निराकारावर कधीच प्रभुत्व गाजवू शकत नाही. माझी शक्ती निराकार आहे. ती साकार असलेल्या माझ्या हातास इच्छेनुकूल फिरवते. एका वेळी मी हाताने लिहितो. केव्हा डोके खाजवतो. पण, ही शक्ती हातात व्यापक असूनसुद्धा हातापेक्षा वेगळी आहे. जेव्हा ही शक्ती निघून जाते तेव्हा हात साकार, स्थूल असूनसुद्धा काहीच कार्य करू शकत नाही. सिंह किंवा हत्ती माणसापेक्षा कितीतरी पटीने स्थूल असतो. पण, माणसात असलेली सूक्ष्म बुद्धी त्यांच्यात नाही. ती सूक्ष्म बुद्धी असंख्य सिंहांना, हत्तींना स्वाधीन करू शकते. ही बुद्धी स्थूल मांस, रक्त किंवा हाड नव्हे. ही एक सूक्ष्म शक्ती आहे. विद्युतशक्ती सूक्ष्म आहे. पण, किती टन वजनाच्या यंत्रांना फिरवते त्याची कल्पनाही करू शकत नाही. म्हणून साकार हे शक्तिसंपन्न, निराकार हे शक्तिहीन असते, असे समजणे फार मोठी चूक आहे. **जर ईश्वर सर्वशक्तिमान आणि व्यापक आहे तर तो निराकारच असला पाहिजे.**

वाफ निराकार आहे पण ढगांच्या रूपात साकारसुद्धा होऊ शकते. याच प्रकारे अगोदर ईश्वर निराकार आणि मग साकार होतो असे स्वीकारले तर काय वाईट आहे? असे काहीजण म्हणतात. ईश्वर इतर वस्तूंना निराकारापासून साकार बनवू शकतो तर तो स्वतःस साकार का बनवू शकत नाही?

असा विचार करणारे वास्तविकता जाणत नाहीत. वाफ, ढग बनत आहे याचा अर्थ काय?

वाफ ही एक वस्तू नाही, पाण्याच्या लहान-लहान परमाणूंचा समूह आहे. हे परमाणू जेव्हा विखुरलेले असतात तेव्हा दिसत नाहीत, म्हणून वाफ सूक्ष्म आहे असे आपण म्हणतो. परमाणूंच्या परस्पर संयोगामुळे स्थूलता येते आणि ढग दिसू लागतात. हे परमाणू वेगवेगळया परिमाणामध्ये संयुक्त झाल्यामुळेच पाण्याच्या वाफ, ढग, गारा, बर्फ, यांच्या रूपात वेगवेगळया आकृत्या बनतात. कुठलीही साकार वस्तू सूक्ष्म आणि पुनः स्थूल करता येऊ शकते.

यावरून सर्व स्थूल प्राकृतिक वस्तू अनेक परमाणूंच्या परस्पर संयोगाद्वारे उत्पन्न झाल्या आहेत हे कळून आले. ईश्वर एक आहे, एकरस आहे. म्हणून तो निराकार आहे. साकार होऊ शकत नाही. वाफेचा एक परमाणू वाफेस स्थूल बनवू शकत नाही. त्यासाठी अनेक परमाणूंची आवश्यकता आहे. त्याचप्रमाणे अनेक ईश्वरांचा संयोग होणार नाही तोपर्यंत एक ईश्वर साकार होऊ शकत नाही. दुसरी गोष्ट ही आहे की, स्थूल वस्तू व्यापक होऊ शकत नाही. दुसरी गोष्ट ही आहे की, स्थूल वस्तू व्यापक होऊ शकत नाही. वाफेद्वारे इंजिन चालते. तसे बर्फ किंवा गारांपासून चालू शकत नाही. म्हणून ईश्वर साकार नाही आणि होऊही शकत नाही.

स्थूल वस्तू एकदेशी असतात. त्यांना प्रारंभ आणि शेवट (आदी, अंत) दोन्ही असतात. काही निराकार वस्तूसुद्धा एकदेशी असू शकतात पण कोणतीच स्थूल किंवा साकार वस्तू सर्वदेशी होऊ शकत नाही. म्हणून ईश्वरास साकार समजणे खरे पाहता ईश्वराच्या अस्तित्वाचाच निषेध करणे आहे.

'सर्वशक्तिमान्' शब्दाबाबतीत विचार करणे आवश्यक आहे. सृष्टीतील सर्व वस्तूंना नियमांद्वारे आपल्या स्वाधीन ठेवणारी सत्ता (शक्ती) ईश्वर आहे असे वर्णन करण्यात आले आहे. एखाद्या वस्तूवर शासन करावयाचे असेल तर त्या वस्तूपेक्षा अधिक शक्तिसंपन्न असणे आवश्यक आहे. ईश्वर सृष्टीतील अचेतन (निर्जीव) वस्तूंनाच नव्हे तर सजीवांनासुद्धा आपल्या नियंत्रणामध्ये ठेवतो. सर्व प्राण्यांपेक्षा स्वतःस बलिष्ठ समजणारा मानवसुद्धा ईश्वराधीनच आहे. 'मनुष्य अल्प आहे' या अध्यायात मनुष्य बलिष्ठ असूनही निर्बळ आहे. त्याच्यापेक्षा असंख्य पटीने अधिक असलेल्या शक्तीने त्यास आपल्या स्वाधीन ठेवले आहे असे दाखवण्यात आले. सृष्टीतील चेतन- अचेतनापेक्षा अधिक बलसंपन्न असून या सर्वांवर शासन करीत असल्यामुळे "ईश्वर सर्वशक्तिमान आहे" या बाबतीत दुमत असण्याचे काहीच कारण नाही. सृष्टीचा प्रत्येक नियम एका शक्तीच्या आधीन आहे असे मागील विवेचनात दाखवून दिले आहे. एका प्रकारे ते नियमच विविध शक्तींच्या स्वरूपात ओळखले जातात. त्या सर्व शक्तींना आपल्या आधीन ठेवीत असल्यामुळे ईश्वर "सर्वशक्तिसंपन्न' म्हटला जातो. खरे पाहता, या सर्व शक्ती एकाच शक्तीची विविध रूपे आहेत. ती शक्ती ईश्वराधीन असते. म्हणून कधी कधी ईश्वर 'शक्ती' नावाने व्यवहृत होतो. खरे पाहता, ईश्वर शक्ती नव्हे, शक्तिमान आहे म्हणून सर्व शक्ती बाळगणारा, शक्ती असलेल्या सर्व पदार्थांपेक्षा अधिक शक्तिसंपन्न असे दोन 'सर्वशक्तिमान्' शब्दाचे अर्थ होऊ शकतात.

जगामध्ये कृमी-कीटकापासून सिंह, हत्ती, मानवापर्यंत सर्व प्राणी शक्तिसंपन्न आहेत. मी दगड उचलू शकतो. अचेतन वस्तूमध्ये संयोग-वियोग करू शकतो. मुंगी खाद्यपदार्थास आपल्या वारुळामध्ये घेऊन जाऊ शकते. पतंग उडू शकतात. हे सर्व कमी- अधिक शक्ती बाळगत असल्यामुळे शक्तिमान म्हटले जातात. पण हजारो वस्तू अशा आहेत ज्या माझ्या आधीन नाहीत. त्यांना मी स्वतःच्या नियंत्रणात ठेवू शकत नाही. सर्व प्राणी आपल्या शक्तीच्या मर्यादेत व्यवहार करतात. म्हणून ते शक्तिमान असूनही अल्प आहेत. ईश्वर या प्राण्यांनासुद्धा आपल्या स्वाधीन ठेवतो. आज ज्या हाताने मी लेखणी उचलू शकतो, दुखापत झाल्यास त्याच हाताने दुसऱ्या वेळी लेखणी उचलू शकत नाही. पंखाच्या साहाय्याने आकाशात उडू शकणारा पक्षी एखाद्या अवस्थेत कसलीच हालचाल करू शकणार नाही. पण, ईश्वराचे तसे कधीच होत नाही. त्याच्या सर्वशक्तिमत्तेत कुठलाही फरक कधीच आढळणार नाही. म्हणून ईश्वर शक्तिसंपन्न असलेल्या सर्व वस्तूपेक्षा अधिक शक्ती बाळगत असल्यामुळे ईश्वर सर्वशक्तिमान आहे, जे दोन अर्थ वर दिले आहेत त्यांचे तात्पर्य एकच आहे. विचार करण्याची पद्धत वेगळी असली तरी मतितार्थ एकच आहे.

ईश्वराच्या कोणकोणत्या शक्ती आहेत? त्या अनंत आहेत की सांत? त्यांची एखादी संख्या सांगता येऊ शकते का? 'सर्वशक्तिमान्' या शब्दातील सर्व शब्द अनंतता बोधक आहे की सांतता बोधक? सृष्टिनियमाची व्याख्या करत असताना सृष्टीमध्ये नियम एक नसून असंख्य आहेत असे दाखवले आहे. प्रत्येक नियम असंख्य घटनांवर शासन करीत आहे. सृष्टीसुद्धा अनंत आहे. भूत, भविष्य, वर्तमानकाळाचा विचार केला तर घटनांना अंतच दिसत नाही. म्हणून अनंत नियमांच्या अनंत शक्ती स्वीकारल्या तर ईश्वरामध्ये असलेल्या शक्ती अनंतच होतील. नियमानुसार घटनांना, पदार्थांना स्वाधीन ठेवणे हेच शक्तीचे स्वरूप (व्याखा) आहे. एखाद्या वस्तूवर शासन करणे म्हणजे 'वर उचलू शकणे, खाली फेकू शकणे, इकडे - तिकडे फिरवू शकणे, दोन वस्तूंना परस्पर संयुक्त करू शकणे, त्यांना वेगळे करू शकणे' हा अर्थ आहे. सृष्टीत असलेल्या सर्व स्थूल-सूक्ष्म परमाणूंना ईश्वर वर उचलू शकतो, खाली फेकू शकतो, संयुक्त - वियुक्त करू शकतो म्हणून तो सर्वशक्तिमान आहे. ईश्वराच्या शासनाच्या अधिकारात नसलेली वस्तू या विश्वात नाही.

'सर्वशक्तिमान्' शब्दाविषयी आस्तिकांमध्ये बरेच मतभेद आहेत. ईश्वर सर्वशक्तिमान् असेल तर तो सर्व काही करू शकतो असे साधारणपणे सर्वजण समजतात. पण ते 'सर्व' शब्दाच्या अर्थावर विचार करत नाहीत. सर्व म्हणजे वर उल्लेखिलेल्या प्राकृतिक पदार्थांच्या उत्क्षेपण, अवक्षेपण, एकीकरणादी क्रिया होत. यापेक्षा अधिक अर्थ तो कोणता असू शकेल? या अर्थाप्रमाणे ईश्वर सर्व काही करू शकतो. एखाद्या राजाविषयी त्याचा प्रजेवर सर्वाधिकार आहे असे म्हटले तर तो आपल्या प्रजेस वाटेल तसे ठेवू शकतो असाच अर्थ होतो. अशाच प्रकारे ईश्वर सर्वशक्तिमान् आहे म्हणजे सृष्टीतील सर्व परमाणूंना; सर्व प्राण्यांना आपल्या नियंत्रणात ठेवू शकतो, सर्व प्राणी त्याच्या स्वाधीन आहेत हाच अर्थ घ्यावयास पाहिजे.

पण, अनेकजण 'सर्व करू शकतो'चा असा अर्थ घेत नाहीत. हे त्यांच्या सिद्धांतावरून दिसून येत आहे. जसे 'काही जण ईश्वर अवतार घेतो' असे म्हणतात. दुसरे काही जण ईश्वर शून्यातून पदार्थांची निर्मिती करतो असे म्हणतात. काही जण ईश्वराच्या इच्छेशिवाय झाडाचे पानही हालत नाही असे म्हणतात. काही जण ईश्वर सर्वशक्तिमान आहे म्हणून तो मनुष्यांना खोटेही बोलावयास लावतो असे म्हणतात. अशा प्रकारे ईश्वराची सर्वशक्तिमत्ताही जणू काय जादूगाराची (गारुड्याची) एक झोळी झाली आहे. यातून वाट्टेल तशा चांगल्या-वाईट वस्तू बाहेर पडू शकतात. उदाहरणादाखल : येशू ख्रिस्तास कुमारिकेने कसा जन्म दिला? ईश्वराच्या सर्वशक्तिमत्त्वामुळेच. मोहम्मद पैगंबरांनी चंद्राचे दोन तुकडे कसे केले? 'ईश्वराच्या सर्वशक्तिमत्वामुळेच. श्रीकृष्णाने गोवर्धन पर्वत आपल्या बोटावर कसा उचलला? ईश्वर प्रल्हादाच्या रक्षणासाठी नृसिंहाचे रूप कसे धारण करू शकला? सर्वशक्तिमत्वामुळे. खरे पाहता, ईश्वरातून अशा चमत्कारिक असलेल्या सर्वशक्तिमत्तेस नाहीसे केले तर जगातून अनेक मत-पंथ समूळ नष्ट होतील. अनेक प्रकारच्या पूजा संपुष्टात येतील. लक्षावधी पुजाऱ्यांच्या उदरभरणाची साधने नाहीशी होतील. म्हणून सत्याची अवहेलना करून, पंथांच्या रक्षणासाठी, पुजाऱ्यांची खळगी भरण्यासाठी ईश्वरामध्ये अशा निरर्थक सर्वशक्तिमत्तेचे आरोपण करावे लागते. नियमांचे पालन न करणाऱ्या, स्वैराचाराने धाकटदपशा दाखवून आतंक निर्माण करणाऱ्यांना जगामध्ये शक्तिशाली म्हटले जाते. ईश्वराच्या बाबतीतही तसेच दिसून येत आहे. ईश्वर न करू शकणारे, करू न शकलेले असे कोणतेच कार्य नाही असाही अर्थ सर्वशक्तिमत्तेचा घेतला जातो. ईश्वर नियमांच्या आधीन झाला तर तो सर्वशक्तिमान् किंवा स्वतंत्र राहू शकत नाही असेही अनेकांना वाटते. नियमांच्या अनुकूल चालणे हीच स्वतंत्रता आहे. हे त्यांना माहीत नाही. जो नियमांच्या आधीन नाही तो अनियमिततेचा उच्छृंखलतेचा दास होईल. नियम आणि अनियम यांच्या आधीन नसलेली अशी कोणतीच सत्ता जगामध्ये नाही. अनियमिततेच्या, उच्छृंखलतेच्या आधीन होणे हे दुर्बलतेचे सूचक आहे. ते शक्तीचे चिन्ह नव्हे. नियमानुकूल कार्य करण्याची शक्ती नसणेच अनियमितपणा आहे. नियमानुकूल चालण्यासाठी बळाची आवश्यकता आहे. नियमोल्लंघन हे अज्ञान आणि दुर्बलतेचे सूचक आहे. जगामध्ये अनेकजण दररोज कितीतरी नियमांचे उल्लंघन करतात, त्याचे काय कारण आहे? नियमांचे पालन करणे हे त्यांचे कर्तव्य आहे हे त्यांना समजत नाही. काही जण समजूनही कर्तव्यपालन करू शकत नाहीत. बरेच जण खोटे बोलणे बरोबर नाही हे जाणतात. पण, खोटे बोलतच असतात. चोरी करणे बरोबर नाही हे जाणूनही चोरी करतात. दारू पिणे हानिकारक आहे हे समजूनही दारू पितात. अनेकजण प्रतिज्ञा करूनही नियमांचे उल्लंघन करतात. पुन्हा पश्चात्तापही करतात. 'आम्ही काय करू शकतो' 'आमची दुर्बलताच आम्हास नियमांचे पालन करू देत नाही' असे निराशेचे उद्‌गार काढतात. खरे पाहता, नियम बनवणे हे 'ज्ञाना'चे काम आहे. आणि त्यांचे काटेकोरपणे पालन करणे हे 'शक्ती'चे काम आहे. ज्ञानसंपन्न, दुर्बळ व्यक्ती नियम बनवू शकते पण त्याचे पालन करू शकत नाही. शक्ती असून ज्ञान नसेल तर स्थिर व उपयुक्त अशा नियमांनाच बनवू

शकत नाही. ज्ञान आणि शक्ती हे दोन्ही नसलेल्या विषयी तर लिहिणेच नको.

जगामध्ये स्थिर नियमांचे अस्तित्वच ईश्वराच्या अस्तित्वासाठी पुरावा आहे असे अनेक वेळा स्पष्ट केले आहे. हे नियम जर अटळ नसतील तर ते कायम तर होणारच नाहीत, जगातील वैज्ञानिकांची विज्ञान-संपदा केराच्या टोपलीतच टाकावी लागेल. सज्जनांचा सर्व व्यवहार बंद होईल. गहू पेरल्यामुळे हरबऱ्याचे अंकुर निघत असतील तर गहू पेरण्याचे कष्ट कोण शहाणा घेईल? नियम किंवा कायदा नसलेल्या राज्यास अराजक म्हणता येईल, शक्तिशाली राज्य कधीच म्हणता येणार नाही. अशाच प्रकारे, ईश्वर आपली सर्वशक्तिमत्ता, स्वतंत्रता किंवा महानता दाखविण्यासाठी नियमाचे उल्लंघन करीत असेल तर त्यासाठी खालील दोन कारणांपैकी एक कारण नक्कीच असेल. पहिले कारण, नियम बनवीत असताना एखादा नियम भविष्यात लाभदायक ठरण्याऐवजी हानिकारक ठरेल असा विचार केला नसावा. जसे, ख्रिश्चन पंथाच्या ग्रंथात बायबलमध्ये ''सृष्टीत पाप अधिक झाले तेव्हा पापाचे आधिक्य असलेली सृष्टी मी का बनविली असे म्हणून (ईश्वर) दुःखी झाला,'' असे लिहिले आहे. ही स्थिती ईश्वराच्या अज्ञानतेची जाणीव करून देते. दुसरे कारण, नियमाचे पालन करून श्रमामुळे ईश्वर थकला आणि आज त्या नियमात बदल करण्याची आवश्यकता भासली. अशा प्रकारे नियमांचे उल्लंघनसुद्धा ईश्वराधीन आहे असे स्वीकारले तर ईश्वरच सिद्ध होऊ शकत नाही.

महर्षी दयानंदांनी ईश्वर सर्व काही करू शकतो याबाबत दोष दाखविण्यासाठी दोन प्रश्न केले आहेत.

१. ईश्वर स्वतःस नष्ट करू शकतो काय?

२. ईश्वर आपल्यासारख्या दुसऱ्या एखाद्या ईश्वराची निर्मिती करू शकतो काय?

ही दोन्ही कार्ये ईश्वराच्या शक्तीच्या बाहेरची आहेत हे सर्वजण स्वीकारतात. जी सत्ता जगामध्ये सर्वत्र (व्यापक) आहे ती स्वतःचा नाश कशी करु शकेल? एखादी वस्तू एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी जाऊ शकते पण ती 'शून्य' होऊ शकत नाही. ईश्वर सर्वव्यापक असल्यामुळे जाईल कुठे, येईल कुठे? त्याच्यासाठी 'जाणे, येणे' हे दोन्हीही अशक्य आहेत. आपल्यासारख्या ईश्वराची निर्मिती करणेही अशक्य आहे. समजा या ईश्वराने एकसारखी शक्ती असलेला दुसरा एक ईश्वर बनविला तर या दोन्हीत अंतर राहीलच. १) नवीन ईश्वर बनलेला असेल आणि जुना बनलेला नसेल. २) या ईश्वरास प्रारंभ असेल, पूर्वीचा अनादी असेल. हा फरक कायमच राहील. यातून सुटका नाही. म्हणून 'ईश्वर' आपल्यासारखा दुसरा ईश्वर बनवू शकतो' असे म्हणणे मूर्खता आहे.

एका ख्रिश्चन विद्वानाने आणखी एक प्रश्न विचारला आहे. तो सुसंगत आहे. ईश्वर वेश्येस कुमारिका बनवू शकतो काय? कुमारिका ती आहे जी आजपर्यंत ब्रह्मचारिणी आहे. वेश्या कधीच कुमारी होऊ शकत नाही. ते कार्य करण्याची शक्ती ईश्वरामध्ये नाही. कारण, तो ईश्वर आहे. ईश्वर तसेच कार्य करतो जे त्याच्यासाठी योग्य आहे. योग्य नसलेले कार्य तो कसे करेल?

ईश्वर एका त्रिकोणास वर्तुळ बनवू शकातो काय? बनवू शकत नसेल तर का बनवू शकत नाही? सृष्टीतील सर्व परमाणू त्याच्याच आधीन आहेत ना! होय. हे खरे असले तरी, परमाणू त्रिकोणाकृती ठेवल्याने त्रिकोण, वर्तुळाकार ठेवल्याने वर्तुळ बनते. त्रिकोणाकृती ठेवत असताना वर्तुळ कधीच बनू शकत नाही. सर्व कोन मिळून दोन समकोनापेक्षा कमी ना अधिक होऊ शकणारा त्रिकोण ईश्वर बनवू शकत नाही. कारण कोणताही त्रिकोण असला तरी त्याच्या कोनांची बेरीज दोन समकोनापेक्षा कमी ना अधिक न होता समानच असते.

ईश्वर चोरी करू शकतो काय? आपल्यासारखा दुसरा ईश्वर बनवू शकतो काय? असे विचारले असता, लगेच काही जण, होय 'करू शकतो, पण करत नाही. बनवू शकतो पण बनवीत नाही' असे उत्तर देतात.

हे उत्तर खरे पाहता त्यांना कुठलीही मदत करू शकत नांही. थोड्या वेळेसाठी मनोरंजन मात्र नक्कीच होते. पण, खरे पाहता भूत-भविष्य -वर्तमान या तिन्ही काळात ईश्वराशी संबंध जोडणे अगदीच व्यर्थ आहे. काही जण विचार न करता ईश्वरास नियमानुकूल राहण्याची आवश्यकता नाही असे समजून अशा प्रकारची उत्तरे देत असतात. ईश्वराच्या स्वरूप (Nature & Attributes) शक्ती इत्यादीबरोबर मुळीच संबंध न ठेवणाऱ्या कार्याशी त्याचा संबंध जोडणे अविवेकच नव्हे तर ईश्वराच्या ईश्वरत्वाचासुद्धा नाश करणे होय. ईश्वराचे उच्चाटनच करणे होय.

□□□

# अध्याय : सातवा

## ईश्वराचे गुण (२)

### पाप – दुःख

ईश्वराच्या सर्वनियन्तृत्व, सर्वशक्तिमत्व या दोन गुणांना जाणून घेतल्यानंतर त्याच्या कल्याणकारितेविषयी जाणण्याची इच्छा उत्पन्न होते. कल्याणकारिता ही उन्नती, मांगल्य, सद्भावनांशी निगडित आहे. नियम आणि कल्याण यांचा एक घनिष्ठ संबंध आहे. नियम कल्याणासाठीच बनवले जातात. कल्याणाचा, उन्नतीचा विचार नसेल तर नियमाची आवश्यकता नाही. जगातील कठीण नियमातसुद्धा कोणते तरी कल्याण निहित असते. अनियमितता ही कल्याणाची शत्रू आहे. सृष्टीमध्ये संगठन व प्रयोजन (उद्देश) हे दोन्ही आहेत असे पूर्वी दाखवले आहे. यांच्याद्वारेच ईश्वर बुद्धिमान आहे हे सिद्ध करण्यात आले होते. बुद्धिमान आणि शक्तिमान वस्तूंना संस्कृतमध्ये 'चेतन' शब्द वापरला गेला आहे. ज्ञान, प्रयत्न (बुद्धी, शक्ती) हे दोन गुण असलेली वस्तू चेतन म्हटली जाते. म्हणून आस्तिक ईश्वरास चेतनस्वरूप म्हणतात. ज्ञानयुक्त प्रयत्न एखाद्या विशेष उद्देशाची अपेक्षा न बाळगता घडू शकत नाही. विशेष उद्देशाच्या पूर्ततेसाठीच ज्ञानपूर्वक प्रयत्न केला जातो. उद्देश हा कल्याणकारक असतो. जगामध्ये कल्याणाची कामना नसेल तर सर्व प्राणी उद्देशरहित होतील. उद्देश नसेल तर शक्ती आणि नियम दोन्ही उद्भवू शकत नाहीत. म्हणून ईश्वर कल्याणकारी, मंगलकारी आहे हे सिद्ध होते. कल्याणकारितेतच ईश्वराची दयाळूता व न्यायकारिता दडलेली आहे. म्हणजे ईश्वर कल्याणकारितेमुळे दयाळू व न्यायकारी सिद्ध होतो. प्रसंगानुसार वेगवेगळया शब्दाचा व्यवहार केला जातो. यांची व्याख्या पुढे केली जाईल.

सृष्टीच्या नियमावरून कल्याणकारितेसाठी सबळ पुरावे आढळून येतात. म्हणूनच ज्ञानी व्यक्ती या कल्याणकारितेस ईश्वराच्या अस्तित्वास सिद्ध करण्यासाठी प्रमाणरूपात स्वीकारतात. महर्षी दयानंदांनी 'सत्यार्थप्रकाश' या ग्रंथात दिलेले विवेचन पाहण्याजोगे आहे.

"आत्मा मन व इतर इंद्रियांना अशुभ किंवा शुभ कार्यासाठी प्रेरित करतो. त्याच क्षणी जीवात्म्याचे ज्ञान, इच्छा वगैरे सर्व गुण त्या इच्छित कार्याकडे वळतात. पण, एखाद्या अशुभ कार्याचा विचारदेखील मनात उद्भवताच भय, शंका व लज्जा यांचा अनुभव होऊ लागतो. तसेच शुभ कार्याचा विचारदेखील उदयास येताच निर्भयता, निःशंकता, आनन्द, उत्साह यांची अनुभूती होते. या गुणांच्या जाणिवेचे कारण परमेश्वर आहे. जीवात्मा निर्मळ होऊन जेव्हा परमेश्वराचा विचार करण्यासाठी तत्पर होतो तेव्हा त्यास आत्मा (Self) आणि परमात्मा दोन्हीची अनुभूती होऊ लागते."

'सत्यार्थप्रकाश'मधील हे ईश्वराच्या सिद्धतेबाबत मांडलेले विचार ईश्वराच्या अस्तित्वासाठी

प्रमाण (पुरावा) देतात. मानव - अंतःकरणात वावरणारी, योग्यायोग्य कार्यात अंतर दर्शविणारी शक्ती ईश्वर-प्रदत्त असल्यामुळे ती प्रमाणकोटीत समजली जावू शकते. इंग्रजी भाषेत याच शक्तीस (Conscience) 'कांशेस' म्हणतात.

"काही ग्रंथकार मानव- अंतःकरणाद्वारे जाणवणाऱ्या सदाचारसंबंधी नियमांना ईश्वराच्या अस्तित्वासाठी सबळ पुरावा म्हणून स्वीकार करीत आहेत. त्यांच्या दृष्टीत इतर पुराव्यांची आवश्यकताच नाही. मनुष्य आपल्या तर्क व बुद्धीचा उपयोग ईश्वराविषयी जेवढा अधिक करेल तेवढा अधिक तो भ्रमाच्या जाळयात अडकून बसेल" असे आपल्या तर्कबुद्धीने निर्णय घेतलेल्या कांट (Kant) महोदयांनी म्हटले की, व्यावहारिक बुद्धी, अंतःकरणाद्वारे मिळणारी साक्ष, या दोन्हीद्वारे ईश्वराचे अस्तित्व खात्रीने सिद्ध होते. आचरणासंबंधी ज्ञानार्जनाची मनुष्यात असलेली पात्रताच ईश्वराच्या अस्तित्वासाठी, जीवात्म्याच्या अमरत्वासाठी श्रेष्ठप्रतीचा पुरावा आहे." असे सर विलियम हेमिल्टन सुद्धा स्वीकारतात. डॉ. जौन न्यू मैन अंतःकरण हे धर्माचे मूळ आधार आहे असे म्हणतात. एवढेच नसून 'प्राकृतिक (नैसर्गिक) धर्माच्या सिद्धांताना याच मुख्य नियमाच्या आधारावर निश्चित केले पाहिजे असा ही त्यांचा आग्रह आहे. जर्मनीचे आस्तिक डॉ. शैंकिल यांनी आपल्या संपूर्ण आस्तिकतेचा मूळ आधार हे अंतःकरणच आहे, अंतःकरण आत्म्याचे धर्माशी संबंधित इंद्रिय आहे, त्या द्वारेच आम्ही ईश्वराचे प्रत्यक्ष ज्ञान मिळवू शकतो, असा त्यांचा मूळ व प्रारंभिक सिद्धांत आहे.

(फ्लिण्ट : आस्तिकवाद पृ. २१०-११)

या विवेचनापेक्षाही पुढील विवेचन अधिक हृदयस्पर्शी आहे. फ्लिण्ट म्हणतात :

ईश्वरासंबंधीचा असा एकही व्यावहारिक विश्वास नाही जो अंतःकरणातून आरंभ होत नाही. कार्यकारणवाद, सृष्टीद्वारे समजून येणारी ईश्वराची सर्वज्ञता, अपार बुद्धिमत्ता मानव-हृदयात ईश्वराची आठवण नेहमी टिकवून ठेवण्यासाठी पुरेशी नाही. प्राकृतिक (नैसर्गिक) जगाच्या किंवा मानव-समाजाच्या एखाद्या घटनेच्या चिंतनाने मानव हृदयात ईश्वराचा प्रत्यक्ष व स्वतःबरोबर असलेला संबंध योग्य पद्धतीने समजून येत नाही. 'आम्ही ईश्वराजवळ आहोत. आम्ही त्याच्याशी तो आमच्याशी संबंध ठेवतो' असे प्रत्यक्ष ज्ञान होण्यासाठी संवेदनशील व उन्नत अंतःकरणाची अत्यंत आवश्यकता आहे. आम्हाकडे सदाचारासंबंधी ज्ञान नसते तर ईश्वराचा स्वभाव आणि त्याचे साम्राज्य हे चांगले आहे की वाईट आहे हे आम्ही कधीच समजू शकलो नसतो, समजू शकत नाही. त्याच्या शक्तीसमोर आम्ही भीतीने कंपितही झालो असतो, आमचा थरकापही उडाला असता; त्याच्या बुद्धिमत्तेची प्रशंसाही केली असती, पण त्याची कल्याणकारिता आम्हास जाणवली नसती. त्याच्या सदाचारसंबंधी नियमांना समजूच शकलो नसतो. प्राकृतिक हानिलाभापेक्षाही त्याची इच्छा कल्याणासाठी अधिक कार्य करते हे आम्हाला अंतःकरण नसते तर जाणवले नसते. कल्याणकारिता नसेल तर ईश्वर ईश्वरच नव्हे. सदाचार नसलेली उपासना ही उपासनाच नव्हे. अंतःकरणरूप आरशातच ईश्वराच्या कल्याणकारितेचे दर्शन होते. शक्ती,

बुद्धिमत्ता वगैरे गुण आम्हामध्ये भीती, उत्सुकता उत्पन्न करू शकतात, पण सत्याच्या अवलंबनासाठी आवश्यक असलेले प्रेम, श्रद्धा व भक्ती केवळ अंतःकरणाद्वारेच उत्पन्न होऊ शकतात. खरे पाहता ईश्वराच्या अस्तित्वाचा आणि अंतःकरणाचा अतिशय रहस्यपूर्ण आणि निकटचा संबंध आहे.''

(फ्लिण्ट : थीज्म : पृ. २१३)

ईश्वरामध्ये अनेक गुण आहेत असे आम्ही वर्णन केले आहे. पण, त्याच्याशी आमचे घनिष्ठ संबंध असण्याचे कारण तो कल्याणकारी आहे. त्याची उपासना केल्याने आमचे कल्याण होते. खरे पाहता, आमच्या हृदयात ईश्वराच्या कल्याणकारितेचे बीज नसले तर आम्ही त्याच्याविषयी एवढा विचार कधीच केला नसता. विजा चमकणे, ज्वालामुखीचा विस्फोट होणे, अशा अनेक चित्तथरारक, बुद्धीला स्तब्ध करणाऱ्या घटना घडत असल्या तरी या घटना ईश्वराविषयी प्रेमभावना निर्मित करू शकत नाहीत, कुठलाही संबंध जोडू शकत नाहीत. बलिष्ठ शत्रू आमच्या मनांत भीती उत्पन्न करू शकत नाही. ईश्वर कल्याणकारी असून कल्याण करतो म्हणूनच सृष्टीच्या प्रारंभापासून मानव समाज त्याच्याकडे आकर्षिला जात आहे. आस्तिकांना ईश्वरापासून विमुख करण्यासाठी नास्तिकाद्वारे उपयोगात आणले जाणारे महत्त्वाचे साधन ''ही सृष्टी दुःखपूर्ण आहे'' हे विधान आहे. ईश्वर दयाळू असता तर अशी सृष्टी बनवलीच नसती. भूकंप, ज्वालामुखी, अतिवृष्टी, अनावृष्टी, अनेक प्रकारचे रोग, या सर्वांना उदाहरणादाखल देऊन ईश्वराचे अस्तित्वच नाही हे सिद्ध करण्याचा नास्तिक प्रयत्न करतात. सृष्टीचे नियम मानवाच्या नाशासाठीच आहेत, सुख देण्यासाठी नाहीत, असे सांगतात. पण दुःखी मूल दुसऱ्यापासून झालेली भीती नाहीशी करण्याकरिता आईच्या कुशीत शिरते, त्याचप्रमाणे व्यक्ती किंवा समाज, त्याच्यावर आपत्तीची कुऱ्हाड कोसळली असताना ईश्वरास शरण गेले आहेत याची साक्ष इतिहास देत आहे. हे कसे घडले? मानवी अंतःकरणात योग्य-अयोग्य; चांगले - वाईट ओळखण्याची शक्ती आहे आणि ती आपले कल्याण करणाऱ्या शक्तीकडे आकर्षित होण्यासाठी मनुष्यास भाग पाडीत आहे.

खरे पाहता, सृष्टीमध्ये उद्देश नसता किंवा आमचे कल्याण न करणारा उद्देश असता तर उचित- अनुचित यांच्यामध्ये फरक करणारे साधन कोणते? चांगले आणि वाईट यांचा निकष कोणता? सृष्टिकर्त्याने एक विशेष उद्देश ठेवून सृष्टी बनवली नसती तर सृष्टीमध्ये नियम शिल्लक राहिले नसते आणि सृष्टीत उचित-अनुचितासाठी कोणतेही स्थान राहिले नसते. कारण, सत् उद्देशाची पूर्ती करणारे उचित आणि बाधक असलेले अनुचित असेच आम्ही समजतो. सदुद्देशाचा विचार केला नाही तर वंध्यापुत्राप्रमाणे उचित- अनुचित अभावारूपच झाले असते. जगामध्ये उचित-अनुचित अशी कोणतीच बाब नाही असे म्हणावे तर ते जाणण्याची शक्ती मानवाच्या अंतःकरणात का असावी? प्रकाशच नसता तर डोळे कशासाठी दिले असते? शब्द नसता तर कान तरी का बनवले असते? स्पर्शच नसता तर त्वगेन्द्रिय का बनविले असते? आमच्या इंद्रियांद्वारेच सिद्ध होत आहे की, त्यांच्याद्वारे जाणल्या जाणाऱ्या विषयांचे सुद्धा अस्तित्व आहे.

अशाच प्रकारे आमचे अंतःकरणरूप इंद्रियसुद्धा उचित- अनुचित या दोन्हींचे अस्तित्त्व आहे हे सिद्ध करीत आहे. त्याद्वारे ईश्वर कल्याणकारी आहे हे प्रमाणित करणारे विशेष उद्दिष्टसुद्धा सृष्टीमध्ये दिसून येत आहे.

येथे अतिशय अवघड असे दोन प्रश्न उपस्थित होत आहेत. पहिला, ईश्वर दयाळू कल्याणकारी असेल तर जगामध्ये एवढे दुःख का आहे? सूर्य प्रकाशित होत असताना अंधकार राहणे शक्य आहे काय? अग्नी प्रज्वलित झाला असेल तर थंडी दूर होणार नाही काय? जग दुःख, कष्ट व वेदना यांची जणू खाणच आहे, याचा निषेध कोण करू शकतो? मोठमोठे आस्तिकसुद्धा जग हे असार आहे, दुःखमय आहे असे म्हणतात ना! हे दुःखमय जग जर ईश्वरानेच निर्मिले असेल तर दुःखसुद्धा ईश्वरनिर्मित असेल ना! मग तो कल्याणकारी, दयाळू कसा होऊ शकतो? जगात सुख आहेच कुठे? जगामध्ये काही जण पुत्रवियोगामुळे रडत आहेत तर काही पतिवियोगामुळे टाहो फोडीत आहेत. काही आई-वडिलांच्या वियोगामुळे दुःखीकष्टी होत आहेत. सृष्टी हा प्रत्यक्ष नरक आहे हे पाहावयाचे असेल तर सकाळी सकाळी इस्पितळातून फेरफटका मारावा. मानव शरीरात अनाकलनीय, भीषण अशा एक ना अनेक रोगांनी घर केले आहे. रुग्णांच्या व्यथा पाहून कष्टाच्या, वेदनेच्या पराकाष्ठेची जाणीव होते. एवढेच नसून जगामध्ये एकीकडे दरिद्रता, दुसरीकडे कलह, भांडण-तंटे, तिसरीकडे मित्रवियोग; हे आणि ते म्हणण्यापेक्षा सर्वच काही दुःखमय आहे. असे असतानासुद्धा ईश्वर कल्याणकारी आहे असे आस्तिक म्हणतात. हे बरोबर असेल तर दुःख कोणी उत्पन्न केले? दुःखाची एकाने, सुखाची दुसऱ्याने उत्पत्ती केली आहे काय? अर्धी सृष्टी कल्याणकारी ईश्वर आणि अर्धी अकल्याणकारी राक्षस बनवतो काय? ईश्वर एवढा निर्बल आहे काय की तो राक्षसाद्वारे दिल्या जाणाऱ्या दुःखाचा नाश करू शकत नाही. दुर्बळ राजा जसे प्रजेला शत्रूच्या तावडीतून सोडवू शकत नाही तशीच स्थिती ईश्वराची आहे काय?

दुसरा प्रश्न आहे : जगामध्ये पापाचे एवढे आधिक्य का आहे? जगामध्ये धार्मिक कमी, अधार्मिक अधिक आहेत याबद्दल कोण दुमत बाळगेल? सदाचारी, प्रामाणिक व्यक्ती शोधून पाहता किती सापडतील? धर्माचे आचरण तलवारीच्या धारेवर चालण्यासारखे आहे असे आस्तिक म्हणतात. असे का? दयाळू परमेश्वराने धर्माचा मार्ग सुकर, फुलासारखा कोमल का बनविला नाही? तसे झाले असते तर सगळेच धर्मात्मे झाले असते ना! मानवांना धर्मात्मा होताना ईश्वरास पाहवले नाही काय? पौराणिकांचा ईश्वर असलेला इंद्र धर्माचरण करून इंद्रासन मिळवणाऱ्याचा द्वेष करतो तसे ईश्वर करतो काय?

खरोखरच हा प्रश्न विचारणीय आहे. दुःखाप्रमाणे पापसुद्धा राक्षसानेच बनविले आहे काय? ईश्वराने स्वतःच्या कल्याणकारितेस मातीत मिसळणाऱ्या राक्षसास का बनविले? असे नसेल तर राक्षससुद्धा ईश्वरासारखा शक्ति संपन्न आहे काय? ईश्वराचे त्याच्यासमोर काहीच चालत नाही काय?

हे दोन्ही प्रश्न गुंतागुंतीचे आहेत. नास्तिक 'ईश्वर नावाची वस्तूच नाही'' असे म्हणून या प्रश्नाची उडवा-उडवी करतात. या सर्व कल्पना मूर्खतेच्या आहेत, असे म्हणतात. पण, आस्तिक अशा प्रकारे या प्रश्नाकडे कानाडोळा करू शकत नाहीत. तसे केल्यामुळे लाभही काही नाही. खरे पाहता, नास्तिकांनीसुद्धा या प्रश्नाचा गंभीरतेने विचार करावा. नास्तिक असो की आस्तिक, राहावयाचे तर त्यांनासुद्धा याच ईश्वराच्या सृष्टीमध्ये आहे. केवळ नास्तिक झाल्यामुळे कोणी सुटका करून घेऊ शकत नाही. सृष्टीच्या नियमांचे पालन तर करावेच लागते.

अधिक गंभीरपणे विचार केला तर हे प्रश्न भासतात तेवढे कठीण नाहीत. अगोदर दुसऱ्या प्रश्नाचा विचार करू. सृष्टीमध्ये पाप का आहे? यासाठी ईश्वर कुठपर्यंत जबाबदार आहे? पाप म्हणजे काय हे अगोदर विचार करणे आवश्यक आहे. मनुष्य करीत असलेली सर्व कामे, एका वेळी पुण्य आणि दुसऱ्या वेळी तीच कामे पाप समजली जाऊ शकतात. कोणतेही काम स्वतः पुण्यही नाही, पापही नाही. उदाहरणादाखल : शाळेच्या परीक्षार्थ्यांचा विचार करू या. एखाद्या कॉलेजमध्ये बी.ए.च्या परीक्षा चालू असताना प्रश्न-पत्रिका ठराविक वेळेच्या अर्धा तास अगोदर किंवा उशिरा दिली तर ते पाप आहे असे म्हटले जाते. एका अवस्थेत देणे पाप आहे, न देणे कर्तव्यपालन पुण्य आहे, तर दुसऱ्या अवस्थेत न देणे पाप आहे, देणे पुण्य आहे. एकाच कामासाठी दोन प्रकारची व्यवस्था का आहे?

व्यवस्थेतील हा फरक शाळा आणि विश्वविद्यालयापर्यंतच मर्यादित नसून मानव जीवनाच्या सर्व विभागांत याची उदाहरणे आढळतील. मानव जीवनाच्या आरंभापासून अंतापर्यंत काही तरी कार्ये करीतच असतो. त्यातील प्रत्येक कर्म पुण्य तरी किंवा पाप तरी असतेच. केव्हा केव्हा साधारण पापासाठी मृदू शब्दांचा वापर केला जातो. एखाद्या पापास निर्बलता, काहींना दोष, काहींना अपराध म्हटले जाते. या सर्वांपेक्षा अधिक दोषपूर्ण कार्यास पाप म्हटले जाते. पण, हे सर्व पापाचेच प्रकार आहेत. अनेक कर्तव्यविमुख व्यक्तींना समाज लक्ष न देताच सोडून देतो. काही कर्तव्ये अशी आहेत की, ज्यांचे पालन नाही केले तर समाजचे लक्ष तर वेधले जाते पण तो दंड देत नाही. काहीसाठी समाज किंवा राज्यसंस्था दंड देते. मनुष्य असेही काही भयंकर अपराध करतो की, ज्यांचे दंड राजाही देऊ शकत नाही. त्या गुन्हेगारांसाठी संपूर्ण सृष्टीचा राजा असलेला परमेश्वरच दंड देतो. पण, ही सर्व कामे पापाच्या अंतर्गतच आहेत. पापाविषयी विवेचन केल्याप्रमाणे पुण्याविषयीही विवेचन करता येईल. त्यातसुद्धा लहान-मोठा भेद राहीलच. एका वेळी किंवा एका अवस्थेत जे कार्य पाप असते तेच दुसऱ्या अवस्थेत पुण्य असू शकते.

कोणत्याही कार्यात स्वतः पापपुण्य नसेल तर त्या कार्यास पाप आणि पुण्य बनवणारी वस्तू कोणती आहे हा विचार करणे आवश्यक आहे. वस्तुस्थिती ही आहे की, कोणतेही कार्य आपली स्वतंत्र सत्ता ठेवीत नाही. त्या कार्याचा कोणत्या तरी नियमाशी संबंध असतो. कार्यांचासुद्धा परस्पर एकमेकांशी संबंध असतो. माझा डोळा किंवा कान स्वतः त्याच्यासाठी बनविली गेली नाहीत. त्यांचे कार्य शरीराच्या आवश्यकतेच्या अपेक्षेनेच आहे. शरीर नसते तर तेही नसते. त्यांची

स्वतंत्र स्थिती असती तर त्यांचे स्वरूप आता असलेल्या स्वरुपांपेक्षा वेगळेच असते. अशाच प्रकारे एखाद्या उद्दिष्टाच्या सिद्धीसाठी कार्यांची एक शृंखला आवश्यक आहे. जगात जेवढी उद्दिष्टे, जेवढे नियम आहेत तेवढ्याच कार्यशृंखलाही आहेत. एखादे काम आपल्या शृंखलेत असते तोवरच ते पुण्य म्हटले जाते. जेव्हा बाहेर होते तेव्हा ते पाप होते. जसे, पोलादाच्या साखळीमध्ये अनेक कड्या असतात. त्याचप्रमाणे कामाचीही एक साखळी असते आणि प्रत्येक काम त्याची कडी असते. साखळी मजबूत ठेवणे आणि आपले कार्य करणे ही त्या कडीची उपयोगिता आहे. एखादी कडी सुंदर, चमकदार आणि बहुमूल्य आहे, पण साखळीमध्ये राहू शकत नाही तेव्हा ती कडी निरूपयोगी आहे. त्या कडीस वेगळे केले पाहिजे. आमच्या कार्यरूप शृंखलेचेही असेच आहे. ''जे कार्य आमच्या नियमरूपी साखळीची कडी बनू शकते ते पुण्य, जे बनू शकत नाही ते पाप आहे. उदारहणादाखलः एक आई आपल्या मुलास अनुचित कार्य करीत असलेले पाहून त्या कार्यापासून परावृत्त करण्यासाठी एक थापड मारते. तसे करणे हे पुण्य आहे. पण जर विनाकारण तिने तसा व्यवहार केला असता तर ते पाप झाले असते. राजा गुन्हेगारास दंड देत असेल आणि विद्वानाचा सत्कार करीत असेल तर पुण्य; याउलट पाप आहे.

पापपुण्याशी अधिक निगडित अजून एक बाब आहे. ती कर्त्याची स्वतंत्रता. **'स्वतंत्रः कर्ता'** हे पाणिनी मुनीच्या अष्टाध्यायीचे सूत्र आहे. कर्ता तो आहे जो स्वतंत्र आहे. जो स्वतंत्र नाही तो 'कर्ता' नसून 'करण' आहे. 'करण' आणि 'कर्ता' या दोन्हीत हाच फरक आहे. कर्ता स्वतंत्र असतो. 'करण' कर्त्याच्या हातामध्ये परतंत्र असतो. '' मी हाताने लिहीत आहे'' किंवा ''माझा हात लिहीत आहे'' हे दोन्ही प्रयोग बरोबरच आहेत. पण, हात लिहिण्यामध्ये स्वतंत्र नाही. मी आज्ञा देतो तेव्हा तो लिहितो, आज्ञा देत नाही तेव्हा लिहीत नाही. म्हणून कर्त्याचे कर्तृत्व त्याच्या स्वतंत्र होण्यामध्येच आहे. स्वातंत्र्य नसेल तर कर्तृत्वाच्या ठिकाणी करणत्व प्राप्त होते. राजाच्या आज्ञेमुळे जल्लाद एखाद्यास फासावर लटकवतो. पण तो बऱ्यावाइटाचा पूर्णताः जबाबदार नाही. तो पूर्णतः दोषी होत नाही. त्याचे कर्तव्य राजाची आज्ञा पाळणे एवढेच आहे. एखादा मनुष्य निर्दोषी असला तरी राजाची आज्ञा झाल्यावरही फाशी देत नसेल तर तोच दोषी ठरतो. गुन्हेगारास शिक्षेचा निर्णय करण्याचे स्वातंत्र्य फाशी देणाऱ्यास नाही. तो राजाचा केवळ करण किंवा साधन मात्र आहे. पण तो राजाची आज्ञा पाळण्यात किंवा न पाळण्यामध्ये मात्र स्वतंत्र आहे. राजाची आज्ञा पाळली तर तो निर्दोषी, नाही तर दोषी होईल. अशा प्रकारे फाशी देणाऱ्यास जेवढी स्वतंत्रता तेवढेच कर्तृत्व आहे. तेवढ्याच पापपुण्याशी त्याचा संबंध आहे. स्वातंत्र्य नसलेल्या ठिकाणी कर्तृत्वही नाही, पापपुण्यही नाही. एक व्यक्ती एका बाबतीत स्वतंत्र, दुसऱ्या बाबतीत परतंत्र असते. ज्या बाबतीत परतंत्र आहे त्याच प्रमाणात करणत्व आहे. म्हणून येथे पापपुण्याचा विचार करता येत नाही. एका कारागृहातील कैद्यास गुन्ह्यासाठी दोन वर्षांची शिक्षा ठोठावण्यात आली असेल तर कैद्यांकडून घेतल्या जाणाऱ्या कामात तो परतंत्र आहे. घोंगडी तयार करणे, दळणे, शौचालय स्वच्छ करणे या सर्व कार्यामध्ये पापपुण्याला तो जबाबदार नाही. जेलरच्या आज्ञेप्रमाणे

दळण दळेल. कैदी कर्ता नसून 'करण'आहे. जेलरने दळणाऐवजी घोंगडीचे काम दिले तर दोषी जेलरच आहे. पण, जेलरच्या आज्ञेचे पालन करणे, न करणे या बाबतीत मात्र कैदी स्वतंत्र आहे. म्हणून जिथे स्वतंत्रता आहे तेथे कर्तृत्व आहे. अशा प्रकारे एखादे काम करण्यासाठी, न करण्यासाठी मनुष्यास स्वातंत्र्य आहे. तो ते काम उद्दिष्टाच्या पूर्ततेसाठी उचित समजूनही करीत नसेल तर पाप आणि त्या विपरीत पुण्य आहे.

अनेक नास्तिक या बाबतीत एक आक्षेप घेत असतात. मनुष्य समाजाच्या व्यवस्थेची उदाहरणे ईश्वरासाठी का वापरता? ईश्वराजवळसुद्धा पापपुण्याची व्यवस्था अशाच प्रकारची आहे काय? उत्तरादाखल असे सांगू इच्छितो की, पापपुण्याच्या समस्येविषयी विचार करताना मानव समाजातूनच तुम्हीसुद्धा उदाहरणे घेता ना! जगात पाप अधिक का आहे? असा प्रश्न करते वेळी मानव समाजाच्या घटनेपेक्षा पापपुण्यासाठी वेगळी कसोटी कोणती होती? खरे पाहता, पापपुण्याचा उलगडा जो इथे करून दाखवला आहे तो अगदी समर्पक व पूर्ण आहे. यापेक्षा अधिक विवेचन कोणीही कोणत्याही देश, काळ, परिस्थितीमध्ये दाखवू शकत नाही. पापपुण्य शब्दाचा वापर कोणीही केला असला तरी तो याच अर्थामध्ये केला आहे. म्हणून मानव समाजातील उदाहरणे देऊन या प्रश्नांचे विवेचन केले ते काही अयोग्य नव्हे.

पापपुण्याची जी व्याख्या आम्ही वर केली. त्यावरून दोन बाबी दिसून येतात.

१. मनुष्य उद्दिष्टरूप शृंखलेत, आपल्या कार्याचे स्थान शोधू शकतो. म्हणजे कोणते कार्य, उद्दिष्ट सिद्ध करते हे तो जाणू शकतो.

२. कार्य करण्यासाठी मनुष्यास स्वातंत्र्य आहे.

पहिल्या बाबीविषयी एक प्रश्न उपस्थित होऊ शकतो. त्याचे विवेचन इथेच करणे योग्य आहे. कोणत्या तरी एखाद्या विशिष्ट उद्दिष्टाचे साधक पुण्य, बाधक पाप असेल तर प्रत्येक कर्माच्या औचित्य अनौचित्याचा निर्णय करण्यासाठी त्या त्या परिणामांच्या आश्रित राहावे लागेल. धर्म, सदाचार हे सापेक्ष आहेत. प्रत्येक अधार्मिक व्यक्ती आपल्या अधर्मासुद्धा त्याच्या उद्दिष्टाचे साधक असल्यामुळे धर्म समजेल. इंग्रजीत एक म्हण आहे "END JUSTIFISE MEANS" साध्य हेच साधनाचे निर्णायक आहे. या म्हणीचा जगात एवढा दुरुपयोग करण्यात आला आहे की, ती बदनाम झाली आहे. अभीष्ट उद्दिष्टाचे साधक हेच पुण्य आहे, असे सर्वसामान्यांना समजले तर असत्य, खून, बलात्कार, अत्याचार हे सर्व धर्मच होतील. मानव समाजात पशुता राजरोसपणे वावरू लागेल.

या ठिकाणी या प्रश्नाचे विस्ताराने विवेचन करणे प्रसंगानुकूल होणार नाही. पण धर्माधर्माची व्यवस्था क्षुद्र उद्दिष्टाद्वारे ठरविली जात नाही हे उत्तर पुरेसे आहे. केव्हा केव्हा खोटे बोलणेसुद्धा लहान - लहान उद्दिष्टाची पूर्ती करते. पण, अल्प उद्दिष्ट हे महत् उद्दिष्टाचे अंशमात्र आहे. एखादे वेळी एखादे अल्प उद्दिष्ट साधत असेल तरी मुख्य उद्दिष्टासाठी बाधक ठरत असले तर ते अधर्मच होईल. एखादा रुग्ण रोगातून मुक्त होऊ इच्छीत असूनही अपायकारक पदार्थ खाण्यासाठी उद्युक्त

होतो. रोगनिवृत्ती हे मुख्य उद्दिष्ट पूर्ण होण्यात ही तत्परता बाधक ठरत असल्यामुळे ते पापच होईल. म्हणून पापपुण्याची व्यवस्था जीवनाच्या अंतिम उद्दिष्टाच्या अपेक्षेनेच केली जाते. म्हणून पापपुण्य हे निरपेक्ष नाहीत, सापेक्ष आहेत. अपेक्षित बाब सर्वसामान्यांच्या लक्षात येत नाही. ती त्यांना समजू शकणे थोडेसे कठीण आहे. म्हणूनच सामान्य मनुष्यांना निरपेक्ष धर्माचाच उपदेश केला जातो. मानव जीवनाचे अंतिम उद्दिष्ट विचारात घेऊन पापपुण्याचा निर्णय करणे, ही सामान्य माणसाच्या आवाक्याबाहेरची बाब आहे. म्हणूनच हे कार्य अत्यंत ज्ञानी व निष्पक्ष पुरुषांच्या हातात सोपवलेले आहे. त्यांना शास्त्रकार 'आप्त' असे म्हणतात. शास्त्रात लिहिलेले आहे. ''आप्तोपदेशः शब्दः'' जीवनाच्या अंतिम उद्देशाचा विचार करून व्यवहार करणारे आप्त आहेत. उपनिषदात मैत्रेयी म्हणते :

'येनाहं नामृतास्यां तेनाहं किं कुर्याम्''

जे कार्य माझ्या अंतिम उद्दिष्टाची पूर्ती करीत नाही त्याचे मी काय करू? पण, जगातील सर्वजण मैत्रेयी होऊ शकत नाहीत. म्हणूनच त्यांना निरपेक्ष धर्माचा उपदेश करण्यात आला आहे.

''सत्यं वद धर्मं चर''; ''खरे बोल, धर्माचे आचरण कर''. पण, जगातील प्रचलित दुःख किंवा पापाचा उलगडा करावयाचा असेल तर प्रश्नाच्या तळाशी पोहोचावे लागेल. म्हणून, जीवनाच्या अंतिम उद्दिष्टाची पूर्ती करू शकणारे, कर्त्यास स्वातंत्र्य असलेले कार्य पुण्य आहे. या दोन्ही बाबी - दोन्ही अटी पूर्ण होणे आवश्यक आहे. यात स्वातंत्र्य असणे महत्त्वाचे आहे.

आता मूळ प्रश्नाकडे वळू या. आक्षेप अशा प्रकारचा आहे की, जगामध्ये ईश्वराने पाप का उत्पन्न केले? या प्रश्नाचे रूपांतर असे होईल : ''ईश्वराने मानवास अंतिम उद्दिष्टाचे ज्ञान आणि त्याच्या साधनांना प्राप्त करण्याची स्वतंत्रता का दिली?''

सृष्टी बनवण्या अगोदर आक्षेप करणाऱ्यांना 'तुम्ही संतुष्ट होण्यासाठी सृष्टीची रचना कशी करावी?'' असा प्रश्न ईश्वराने विचारला असता तर 'स्वातंत्र्य आहे म्हणून आक्षेप घेणारे दुःखी, असमाधानी आहेत म्हणजे अर्थापत्तिद्वारे यांना परतंत्रता पाहिजे असे सिद्ध झाले असते. स्वतंत्रता किंवा परतंत्रता यांपैकी कुठले तरी एक स्वीकारणे आवश्यक आहे. मधला मार्ग कोणताच नाही.

''सृष्टीमध्ये पाप न राहता पुण्यच असणारी सृष्टी ईश्वराने रचली असती तर किती बरे झाले असते!'' असा विचार सर्वसामान्य माणसे करतात. याचा अर्थ काय? ईश्वराने मानवास स्वतंत्र ठेवले नसते तर त्यांनी आपल्या स्वातंत्र्याचा दुरुपयोग केला नसता हाच अभिप्राय स्पष्ट होतो. पण अशा सृष्टीमध्येसुद्धा आमचे नास्तिक बांधव समाधानी राहिले नसते हे विचाराअंती लक्षात येईलच. तेव्हा ते ''ईश्वर कसा क्रूर आहे? सृष्टीस एक कारागृहच बनविले आहे. आम्हास स्वेच्छेने पाहण्याचे स्वातंत्र्य नाही, चालण्याचे स्वातंत्र्य नाही'' असा आक्षेप करण्यास तयार झाले असते. डोळयावर झापण्या बांधलेल्या, कुठे जावयाचे ते माहीत नसलेल्या, नीट नाकासमोर धावणाऱ्या टांग्याच्या घोड्यासारखी मानवाची स्थिती झाली असती. त्या अवस्थेत नास्तिकांना 'आम्हास स्वातंत्र्य का नाही?' अशा प्रकारचा हा प्रश्न विचारण्याचीही स्वतंत्रता राहिली नसती.

स्वराज्यप्राप्तीसाठी काहीही न करू शकणाऱ्या गुलाम संस्थानिकांसारखी नास्तिकांची अवस्था किती तरी शोचनीय झाली असती.

अशी अवस्थासुद्धा काही जणांना आवडते. पारतंत्र्य सर्वांनाच नको असले असते तर जगामध्ये हे नावरूपालाही राहिले नसते. पण, विलासिता आणि आळस यांची सवय झाली की, पारतंत्र्यसुद्धा माणसाला आवडू लागते. दीर्घकाळ कारागृहात राहिलेला कैदी शिक्षा भोगून बाहेर पडताना दुःखी होतो. पण, मनुष्य स्वभावाने पारतंत्र्याची आवड बाळगत नाही. ते सहन करीत असला तरी त्याला काही कारण असते. खरे पाहता, मनुष्यच नव्हे तर पशू, पक्षीही परतंत्र होऊन राहू इच्छीत नाहीत.

यापेक्षाही अधिक गंभीरपणे विचार केला तर आणखी एक प्रश्न उद्भवतो. मनुष्य परतंत्र झाला तर त्याच्या जीवनाचा उद्देश काय असेल? तो कोणाच्या अपेक्षेने असेल? मनुष्याच्या स्वतःच्या अपेक्षेने की ईश्वराच्या? ईश्वर स्वतःसाठी केव्हाच काहीच करीत नाही. यामुळे ईश्वराचे कोणतेच उद्दिष्ट सिद्ध होत नाही. अशा स्थितीत परतंत्र मनुष्याच्या उद्दिष्टाचा निर्णय कोण करील? ते कसे सिद्ध होईल. उद्दिष्टच नसेल तर कार्य कशासाठी केले जाईल? मला एखाद्या विशेष स्थळी जावयाचे नसेल तर यात्रेचे कष्ट मी का सहन करीन? आणखी एक समर्पक उदाहरण पाहू : शिक्षक विद्यार्थ्यांना शिकवतो. परीक्षा घेतो. पन्नास जणांना दिलेल्या प्रश्नपत्राचे उत्तर लिहिणे न लिहिणे याबाबत स्वतंत्रता आहे. योग्य किंवा अयोग्य उत्तरही लिहू शकतो. योग्य उत्तर देणारे उत्तीर्ण व बाकीचे अनुत्तीर्ण होतील. हा एकच नियम आहे. ही स्थिती पाहून नास्तिक म्हणतात की, ''हा किती वाईट नियम आहे. विद्यार्थ्यांना उचित-अनुचित उत्तरे लिहिण्यासाठी स्वातंत्र्य का देण्यात आले? शिक्षकानेच सर्वांकडून योग्य उत्तर का लिहून घेतले नाही? चूकच झाली नसती ना!''

हा आक्षेप बरोबर असू शकतो काय? विद्यार्थ्यांचे स्वातंत्र हिरावून घेऊन योग्य उत्तरे शिक्षकांनीच लिहून दिली आणि ते जरी प्रथम श्रेणीत उत्तीर्ण होत असले तरी ते त्यांच्यासाठी हितकारक, उन्नतीकारक ठरेल काय? विद्यार्थ्यांना परिश्रम करावे लागणार नाही यात मुळीच शंका नाही. पण, त्यांना विद्यार्थी म्हणू शकतो काय? ते दगडाप्रमाणे ज्ञान, क्रियाशून्य होणारे नाहीत काय? त्यांच्यात आणि ते बसत असलेल्या टेबलामध्ये फरक राहील काय? धर्म-अधर्म यांपैकी एकाचा स्वीकार आणि दुसऱ्याचा त्याग करण्यासाठीच ज्ञानाची आवश्यकता आहे. जर असे नाही केले तर ज्ञान आणि क्रिया यांचे अस्तित्वच संपुष्टात येईल. यांचे प्रयोजनच शिल्लक राहणार नाही. शाळेत विद्यार्थ्यांना स्वातंत्र्य नसेल. शिक्षकच उत्तरपत्रिका लिहावयास लावीत असतील तर शाळा उघडणे, परीक्षा घेणे, उत्तर लिहिणे या सर्व कार्य-कलापांची आवश्यकताच काय? खरे पाहता, आम्हास स्वातंत्र्यच नसते तर आमच्यामध्ये फरकच राहिला नसता. ज्ञानही राहिले नसते, कार्य करण्याची अभिलाषाही राहिली नसती. मग आम्ही तरी कशासाठी राहिलो असतो? ही सृष्टी तरी कशासाठी राहिली असती?

ईश्वर मनुष्यांना पाप करण्याची आज्ञा किंवा अनुमती का देतो? असा प्रश्न विचारणारे ईश्वरासंबंधी तिळमात्रही ज्ञान बाळगत नाहीत. ईश्वर पाप करण्यासाठी आज्ञा तर देतच नाही, तो पाप सहनसुद्धा करत नाही, हे त्यांनी जाणावे. विद्यार्थ्याने उत्तर बरोबर नाही लिहिले तर शिक्षक त्याच्याकडून तसे लिहून घेतो किंवा त्याचा स्वीकार करतो, ते सहन करतो असे समजणे चुकीचे आहे. योग्य उत्तर लिहिणाऱ्या विद्यार्थ्यास उत्तीर्ण घोषित केल्याप्रमाणे चूक उत्तर लिहिणाऱ्यासही उत्तीर्ण केले असते तर शिक्षक, परीक्षक दोषी ठरला असता. शिक्षक नेहमीच सांगतात की, चूक उत्तर लिहिणारा अनुत्तीर्ण होईल. असे असताना तो आज्ञा देतो किंवा चूक उत्तरांना सहन करतो असे दोषारोपण करणे बरोबर कसे होऊ शकते? याच प्रकारे ईश्वर पाप-पुण्य जाणण्याची साधने देऊन पाप केले तर दुःख, पुण्य केले तर सुख देत असताना तो पाप करण्यासाठी आज्ञा देतो किंवा ते सहन करतो असे दोषारोपण करणे अन्याय्यच नव्हे तर्कशास्त्राचा दुरुपयोग करणेही आहे. मनुष्य कर्म करण्यात परतंत्र आहे, स्वातंत्र्य त्याच्या उन्नतीसाठी आवश्यक आहे. ईश्वर पाप सहन करीत नाही हे परिणामाच्या पारतंत्र्यावरून सिद्ध होते. म्हणून कर्म करण्यात स्वतंत्रता, फळ (परिणाम) प्राप्तीमध्ये परतंत्रता हे दोन्ही मनुष्याच्या हितासाठीच आहेत.

ईश्वराने जीवात्म्यास पूर्णपणे धर्मात्मा का बनविले नाही? असा प्रश्न काही जण विचारीत असतात. आंधळयाला बोलाविले नसते तर दोघे कशाला आले असते? खरोखरच, या प्रश्नाने बऱ्याच आस्तिकांनासुद्धा भ्रमित केले आहे. फ्लिण्ट महाशयांचे उत्तर ख्रिश्चन पंथाच्या अपूर्णतेची जाणीव करून देणारे आहे. ते पाहणे मनोरंजक ठरेल.

"ईश्वराने सर्वांना धर्मात्मा का बनविले नाही असे जर तुम्ही विचाराल तर त्याचे उत्तर मी देऊ शकणार नाही. हा प्रश्न असा आहे की ज्याचे उत्तरच असू शकत नाही आणि प्रश्नही निरर्थकच ठरेल. मानवांना देवदूताप्रमाणे का बनविले नाही असे विचाराल. इथेच न थांबता रानटी माणसापेक्षा देवदूत जेवढे उच्चकोटीचे आहेत तसे देवदूतापेक्षाही तेवढेच उच्च असलेल्या प्राण्यांना ईश्वराने का बनवले नाही? अशा प्रकारे अनवस्था (अंतहीनतेचा) दोष उत्पन्न होईल.

फ्लिंट महोदयांची आस्तिकता सदोष असल्यामुळे त्यांना आपल्या निर्बलतेचे प्रदर्शन करावे लागले आहे. त्यांची आस्तिकता पुराव्याआधारे सिद्ध केली जाऊ शकत नाही. केवळ ईश्वरच अनादी आहे. हा त्यांचा सिद्धांत आहे. ईश्वरानेच जीवात्म्यांना व संपूर्ण सृष्टीस बनवले असे ते मानतात. असे असेल तर "वैर-विरोध, कलह-पाप आणि दुःखांनी ओतप्रोत अशा सृष्टीची रचना करण्याची परमेश्वरास काय आवश्यकता भासली?" असा प्रश्न नास्तिक विचारू शकतात. ईश्वरास स्वतःसाठी कोणत्याही वस्तूची आवश्यकता नाही. ईश्वराशिवाय दुसरा कुणीही नाही. मग ईश्वराने सृष्टी रचलीच कशासाठी? आपला मोठेपणा प्रदर्शित करण्यासाठी? कोणा समोर? त्याच्याशिवाय दुसरे कोणीच नव्हते ना! आपण बनविलेल्या वस्तूसमोर मोठेपणा प्रदर्शित करणे ही हसण्याजोगी बाब आहे. अशा ईश्वराच्या अस्तित्वासाठी जगात एकही प्रमाण (पुरावा) सापडत नाही. आम्हीसुद्धा या पुस्तकात अशा ईश्वराची सिद्धी केली नाही. 'सृष्टिनियमांच्या

आधारावर, परमाणू आणि जीव यांना सृष्टिरूपात परिवर्तन करणाऱ्या शक्तीचे (सत्तेचे) नाव 'ईश्वर' आहे असे आम्ही सिद्ध केले आहे. ईश्वर जीवांची रचना करीत नाही. तो त्यांच्या सुखासाठी सृष्टीची रचना करतो. त्यांच्या उन्नतीसाठी सहायक होणाऱ्या साधनांची निर्मिती करतो. ईश्वर सर्वान्तर्यामी रूपाने जीवात्म्यात राहून त्यांना धर्ममार्गाने चालण्याची प्रेरणा देतो. सन्मार्गापासून दूर झाल्यानंतर आईवडिलांप्रमाणे दुःखरूप दंड देतो. त्यामुळे ते दुष्ट मार्ग सोडून श्रेष्ठमार्गाने वाटचाल करतात. या कार्यात ईश्वराचे स्वतःचे असे कोणतेच अभीष्ट नाही. तो आपल्या गौरवासाठी, आनंदासाठी किंवा इतर कोणत्याही स्वार्थासाठी सृष्टी बनवीत नाही. जीव आणि परमाणू ईश्वराप्रमाणेच अनादी आहेत. पण, ईश्वर अधिपती आहे आणि हे सर्व त्याच्या आधीन आहेत. परमाणू जड (अचेतन- निर्जीव) आहेत. पण जीव चेतन (ज्ञान, क्रिया, इच्छा, स्वभाव असणारा) आहे. ईश्वरामध्ये अपूर्णता नाही म्हणून त्याचा उन्नती, अवनतीशी काहीच संबंध नाही. परमाणू अचेतन असल्यामुळे त्यांचा ही उन्नती - अवनतीशी मुळीच संबंध नाही. हा प्रश्न केवळ जीवांशी निगडित आहे. जीव पुण्य करीत उन्नतीकडे, पाप करीत अवनतीकडे वाटचाल करतात. परमाणूंद्वारे जीवांसाठी शरीर व त्यांच्या पालनपोषणासाठी आवश्यक असणाऱ्या इतर वस्तूंची निर्मिती करणे हेच परमेश्वराचे कार्य आहे. सृष्टि-रचनेचे हेच उद्दिष्ट, हेच प्रयोजन आहे. जे.एस. मिलचे एक वाक्य आम्ही तिसऱ्या अध्यायात उद्धृत केले होते. त्या वाक्यात त्यांनी 'There is in nature a permanent element & also changeable' म्हणजे जगामध्ये एक स्थायी तत्त्व आणि दुसरे एक अस्थायी तत्त्व आहे'' असे सांगितले आहे. जीव आणि प्रकृतीचे परमाणू स्थिर तत्त्व आहेत पण जीवांचे शरीर अस्थिर तत्त्व आहेत. ईश्वर स्थायी तत्त्वांना बनविणारा नाही, त्यांच्यावर शासन करणारा आहे. तो त्यांची निर्मिती करु शकत नाही, नाशही करीत नाही. तो ज्यांची निर्मिती करतो त्यांचाच नाश करू शकतो. या सिद्धांताच्या स्वीकारामुळे 'ईश्वराने सर्वांना धर्मात्मा का बनवले नाही? असा प्रश्नच उद्भवू शकत नाही. जीव (जीवात्मा) ईश्वराप्रमाणे अनादी असताना त्यांच्या स्वभावामध्ये, स्वरूपामध्ये परिवर्तन कसे घडवू शकतो? तो केवळ त्यांच्या उन्नतीसाठी सृष्टी बनवू शकतो. त्या सृष्टीद्वारे जीव उन्नतीचे सर्वोच्च शिखर गाठू शकतात. ईश्वराने जीवांच्या उन्नतीसाठी दिलेल्या साधनांद्वारे जीवांनी आपले हित नाही साधले तर त्यात ईश्वराचा काय दोष?

गंभीरपणे विचार केला तर, जीवांच्या उन्नतीसाठी साधन होऊ शकणारी, या सृष्टीपेक्षाही अधिक उत्तम सृष्टी रचली जाऊ शकत नाही हे सहज कळून येईल. जीवांना ज्ञानाची आवश्यकता आहे म्हणून त्यांना पाच ज्ञानेंद्रिये देण्यात आली आहेत. त्यांना अनुकूल असलेले विषयही देण्यात आले आहेत. सृष्टीमध्ये जे काही रचले गेले आहे ते सर्व जीवांच्या सुखाकरिताच आहे. एवढेच नसून पापाचे मूळ कारण समजली जाणारी स्वतंत्रता हीच पुण्याचे आधारस्थान आहे. या स्वातंत्र्याच्या आधारेच मनुष्य धर्मात्मा होण्यासाठी प्रयत्न करीत असतो. ''जगामध्ये धर्मात्मा होण्यासाठी आवश्यक असलेली प्रेरणादायक साधने नाहीत,'' हे म्हणणे चूक आहे. खरे पाहता,

संपूर्ण जग आम्हास धर्मात्मा होण्यासाठीच प्रेरणा देत आहे. ईश्वराने आम्हास स्वतंत्रच केले नसून आम्हास आमच्या मार्गापासून अधिक दूर जाऊ न देण्यासाठी, इतर शक्ती आमच्यावर मर्यादेच्या बाहेर आक्रमण न करू शकण्यासाठी चोहींकडे काट्याचे कुंपणही रचले आहे.

आम्हास सन्मार्गावर चालविण्यासाठी आमचे अन्तःकरणच सर्वांपेक्षा अगोदर उपस्थित आहे. त्यासच महर्षी दयानंद परमेश्वराचा उपदेश म्हणत आहेत. खरोखरच अंतःकरण किती मोठे रक्षक आहे? जगातील कितीतरी व्यक्तींनी अंतःकरणाचा उपदेश ऐकून स्वतःला सन्मार्गापासून विचलित होऊ दिले नाही. भवसागरात तरंगणाऱ्या जीवनरूपी नौकेसाठी हा एक फार मोठा प्रकाशस्तंभ आहे. त्याच्या साहाय्यांने पापरूपी पर्वताच्या धक्क्यापासून आम्ही स्वतःचा बचाव करून घेऊ शकतो. पतितांचे आधार अंतःकरणच आहे. अंतःकरणाने आम्हास धर्म-अधर्म यांचा उपदेश केला नसता तर आम्ही किती पाप केले असते हे सांगणे कठीणच! जेव्हा जगातील सर्व उपदेष्टे थकतात, संपूर्ण प्राकृतिक प्रकाश लयास जातो, अंधाऱ्या रात्री घोर अरण्यामध्ये मनुष्याचे अंतःकरण आपल्या अतुल प्रकाशाद्वारे मानवास सन्मार्ग दाखवते. अंतःकरणाची हाक न ऐकणाऱ्या व्यक्ती फारच थोडक्या सापडतील. जगातील पतितांनी, पतित होत असलेल्यांनी या अंतःकरणाचा उपदेश ऐकूनच असत्य मार्गापासून स्वतःस दूर सारले आहे.

अन्तःकरणाच्या ज्योतीचा तिरस्कार करणाऱ्या, जगास पापाची खाण समजणाऱ्या महाभागांनो! तुम्ही पापी जनांच्या हृदयामध्ये शिरून तिथे काय चालले आहे हे कधी पाहिले आहे काय? दुर्बळ आणि नीच माणसाच्या मनाचे तुम्ही कधी निरीक्षण केले आहे काय? जर केले असेल तर खरे सांगा, त्यांचे अंतःकरण त्यांना पापापासून कधीच वाचवीत नाही काय? अन्तःकरणरूपी अस्त्र त्यांच्या जवळ नसते तर ते एवढेच पापी राहिले असते काय? जगामध्ये पापाचे आधिक्य आहे म्हणणारे फार मोठी चूक करीत आहेत. महापापीसुद्धा आपला अधिक वेळ पाप-कार्यात घालवीत नाहीत. एखाद्याने शंभरापैकी दहा कामे जरी पापाची केली तरी सर्वजण घृणेच्या, तिरस्काराच्या दृष्टीने त्याकडे पाहू लागतात. त्याला जीवन जगणे कठीण होऊन जाते. असे का होते? धर्माच्या विस्तारासाठीच सृष्टी बनविण्यात आली आहे, हेच ते कारण आहे. बागेभोवती असलेल्या काट्याच्या कुंपणास पाहून सबंध बाग काट्यांनीच भरलेली आहे असे समजणारे किती मोठी चूक करीत आहेत! अरे अज्ञानी माणसा, जगामध्ये काटे असले तरी तुला ते पापापासून वाचविण्यासाठीच आहेत, पापामध्ये लिप्त करण्यासाठी नव्हे! व्यक्ती किंवा समाजाच्या हृदयात पापाविषयी एवढी घृणा का आहे? एखादा पापी प्रबळ होत असलेला पाहून आम्ही सुद्धा विद्रोह का करू लागतो? सर्व जग सदाचाराची अपेक्षा करते हेच त्याचे कारण आहे. जगाची आधारशिला सदाचारच आहे. सदाचार हाच सृष्टि रचनेचा उद्देश आहे. जगातील सर्व नियम आम्हास सदाचाराकडेच घेऊन जात आहेत. जगामध्ये स्वतंत्रता आहे ती लोकांनी धर्माचे महत्त्व समजावे यासाठी. थोडेसे पापही असेल तर ते तुलना करून पुण्य-ज्योती अधिक प्रकाशित व्हावी यासाठीच.

पापाविषयी जगामध्ये जशी अतिशयोक्ती आहे तशीच दुःखाविषयीही आहे. ईश्वर चांगला

असेल तर त्याच्या सृष्टीमध्ये दुःख असूच नये असे लोकांना वाटते. पापाविषयी जे काही लिहिले गेले आहे त्याच्या आधारे ईश्वर चांगला आहे हे वाचकांना समजलेच असेल. जगातील दुःख सुद्धा ईश्वराच्या चांगुलपणाचेच द्योतक आहे, हे जाणून घेतले पाहिजे. ते त्याच्या दयेचे सूचक आहे, निर्दयतेचे नाही. दुःखामुळेच मनुष्य पापापासून स्वतःचा बचाव करीत आहे. पापाचा परिणाम दुःख असते तर पुण्याची वाढ कशी होऊ शकली असती? एखाद्या चांगल्या राजाच्या राज्यामध्ये न्यायालय, कारागृह आहेत त्याचे कारण राजाची सदयताच आहे, निर्दयता नव्हे. पण, दंडाच्या परिमाणाने सीमेचे उल्लंघन करावयास नको आहे. दंडाअभावी अराजकता जशी पसरते, तशीच सर्व दुःख़ाच्या अभावी उन्नतीसुद्धा कमी होते, हे जाणले पाहिजे.

दुःखाची मीमांसा केली तर, दुःख दोन प्रकारचे आहे हे समजून येईल. एक दुःख उन्नतीसाठी प्रेरणा करणारे, दुसरे पापापासून दूर सारणारे. पहिल्या प्रकारचे दुःख खरे पाहता दुःखच नव्हे. मनुष्य केव्हा केव्हा आपल्या गरजांनाच दुःख म्हणतो. भूक लागते, तहान लागते, वस्त्रांची आवश्यकता भासते. हे जर कष्ट न करता मिळाले तर मनुष्य स्वतःस सुखी समजतो. त्याच्या प्राप्तीसाठी हातपाय हलवावे लागले म्हणजे तो स्वतःस दुःखी समजतो. आवश्यकतेची पूर्ती करणाऱ्या साधन-सामग्रीच्या अभावास दुःख समजणे हे चूक नव्हे तर काय आहे? त्यांच्या संपादनासाठी हातपाय नाही हलविले तर मनुष्याने काम तरी कशासाठी करावयाचे? काम नाही केले तर त्याच्या शक्तींचा विकास तरी कसा होणार? प्रयोग करण्याची आवश्यकता भासली तरच शक्ती विकसित होतात. साधन-सामग्री जवळ नसेल तेव्हाच शक्तीचा प्रयोग करावा लागतो. श्रीमंत व्यक्ती स्वैराचारी, विलासी होऊन आपल्या शक्तीचा अल्पकाळातच नाश करून घेतात. यासाठी व्यक्ती, समाज, साम्राज्य उदाहरणादाखल घेता येतील. इतिहासाची साक्ष आम्हास दाखवून देत आहे की, ज्यांचे जीवन संकटाच्या काळयाकुट्ट मेघांनी आच्छादित झाले होते त्यांनीच सर्वशक्ती एकवटून उन्नतीकडे वाटचाल केली आहे. साखरझोपेचा अनुभव घेणारे झोपेशिवाय दुसरे करू तरी काय शकणार? श्रीमंतांच्या श्रीमंतीचा इतिहास पाहा. त्यांचे पूर्वज दारिद्र्यामुळे पीडित होऊन परिश्रमी झाले. घोर परिश्रम करून त्यांनी धनार्जन केले. आता त्यांच्या वंशजांची काय स्थिती आहे? त्यांच्यामध्ये पूर्वजासारखी कष्ट सहन करण्याची क्षमता, प्रवृत्ती आहे काय? जगामध्ये सर्व सुख विनासायास मिळू लागले तर उन्नती करण्यासाठी एकही साधन राहणार नाही. जो संघर्षामध्ये अटीतटीने झुंज देतो, विजयश्री त्याच्याच गळयात माळ घालते. जो कष्ट सहन करतो, यशाचा धनीही तोच होतो. जीवनसंघर्षामध्ये कष्ट सहन करणे, अटीतटीची झुंज देणे हे दुःख नाही, सुखाचे पूर्वरूप आहे. यास दुःख समजणे फार मोठी चूक आहे. ऑल्फ्रेड रसेल वालेसनी आपल्या जीवन-जगत् (The World of life) मध्ये दुःखाचे विस्तृत विवेचन केले आहे. ते नास्तिकांच्या आक्षेपाचा विचार करताना म्हणतात :

"जगातील दुःखांना पाहून आम्हास घृणा होते म्हणून आम्ही ही सृष्टी सर्वज्ञ, सर्वशक्तिमान् दयाळू ईश्वराने बनविली नाही असे म्हणतो."

"All this is so utterly abhorrant to us that we can not resoncide it with an author of the universe who is at once all power, and all Good."

(Alfred Russel Wallace : The World of life P.369)

पण, ते या मताचा स्वीकार करीत नाहीत. ईश्वराची हकालपट्टी करू इच्छिणाऱ्या, जगामध्ये दयेचे, सुखाचे किरणसुद्धा न पाहू शकणाऱ्या उत्क्रांतिवाद्याविषयी वालेस महोदय पुढीलप्रमाणे लिहितात :

'या लेखकांनी, उत्क्रांतिवाद्यांनी दुःखाचे मूळ शोधून काढण्याचा कधीच प्रयत्न केला नाही. दुःख विकासासाठी किती तरी आवश्यक आहे हे ते जाणत नाहीत. प्राण्यासाठी दुःखाची एक उपयोगिता, एक आवश्यकता आहे हे त्यांना माहीत नाही. खरे पाहता, आवश्यकतेच्या, उपयोगितेच्या प्रमाणातच दुःख आहे.'

यानंतर वालेस महोदय लिहितात : 'डार्विननी एका नियमावर अधिक भर दिला आहे. तो हा आहे की, कोणतेही इंद्रिय, शक्ती किंवा वेदना जोपर्यंत त्याच्या जमातीसाठी उपयोगी नसेल तोपर्यंत कोणत्याही प्राण्यामध्ये उत्पन्न होत नाही. म्हणून प्रत्येक प्राणि-वर्गामध्ये आवश्यकतेनुसारच इंद्रिय, शक्ती, वेदना उत्पन्न झाल्याचे दिसून येते. त्यापेक्षा अधिक मुळीच नाही.''

"None of these writers, however, nor so for and know, any evolutionist, has ever gone to the root of the problem by considering the very existance of pain as being one of the essential factors in evolution, as having been developed in the animal world for a purpore as being strictly sub ordinated to the law of utility, and therefore never developed beyond what actually needed for the preservation of life."

(The world of life P.372)

"One of these principles much insisted on by Darwin is, that no organ , faculty, or sensation can have arisen in animal except throngh its Utility to the species. The sensation of pain has been thus developed and must therefore be proportionate in each species to its needs, not beyond there needs."

(Ibid P.379)

याच विषयाबाबत फ्लिण्ट महोदय खालीलप्रमाणे विवेचन करतात –

''दुःख परिश्रम करण्यासाठी प्रेरणा देते. परिश्रमाद्वारे आमच्या शक्ती नियमित आणि विकसित होऊ शकतात. इच्छेमुळे आवश्यकतेचा अनुभव होतो. आवश्यकतेचा अनुभव हेच दुःख आहे. पण, जीवामध्ये इच्छा आणि त्या इच्छेद्वारे उत्पन्न होणारे प्रयत्न नसतील तर जीवांचे अस्तित्व कशासाठी? ते आता जसे विकसित आणि सुंदर आहेत तसे राहू शकले असते काय? सशास भीती नसती तर तो आता जसा वेगवान आहे तसा राहिला असता काय? सिंहास भूक

लागली नसती तर तो आता जसा बलिष्ठ आहे, तसा राहिला असता काय? जीवनात विविध संकटांशी 'झुंज देण्याची परिस्थिती उद्‌भवली नसती तर मनुष्य आज जसा बुद्धिमान, प्रयत्नवादी, चतुर, शिक्षित आहे, तसा असू शकला असता काय? दुःख प्राण्यांच्या पूर्णत्वाचे साधन आहे. दुःखाचा परिणाम चांगलाच होतो. या परिणामामुळेच दुःखाची उपयोगिता स्पष्ट होते. पूर्णतेचा अंत आनंद नसता तरीही उपयोगिता सिद्ध झाली असती. पूर्णता स्वतः एक उच्च कोटीचे साध्य आहे. या साध्याची पूर्तता करणारे दुःख कधीच वाईट असू शकत नाही. या आक्षेपाची चिंता करण्याचे मुळीच कारण नाही. प्राणिवर्गाच्या जीवनाचा आदर्श वधासाठी तयार न केलेल्या, निष्क्रिय व सुपोषित वराहासारखा असावा हे माझ्या लक्षातच येत नाही. प्राणिवर्गाच्या शक्ती-विकासासाठी व त्यांच्या प्रकृतीच्या उन्नतीसाठी आवश्यकता असेल तेवढेच दुःख देण्यात आले आहे. प्राण्यांच्या जीवनाचा मुख्य उद्देश सुखाची प्राप्ती आहे असे म्हणणे ईश्वराच्या सृष्टिरचनेच्या उद्दिष्टाची अवहेलनाच करणे आहे. दुःख केवळ पूर्णतेचे साधन असते आणि सुखाचे साधन नसते तरी त्यामुळे ईश्वराची परम करुणाच सूचित झाली असती. पण, दुःख हे केवळ पूर्णतेचेच साधन नसून, सुखाचेसुद्धा साधन असल्यामुळे ईश्वराच्या दयेची विपुलता क्षणोक्षणी दिसून येते. प्रयत्नासाठी प्रेरणा करणारे दुःख आणि प्रयत्न करीत असताना होणारे दुःख हे दोन्हीही शेवटी आनंदाची प्राप्ती करविणारेच आहेत. बहुतेक, सुखाच्या अनुभवासाठी दुःखाचा अनुभवही आवश्यक आहे. प्राण्यांच्या शरीरांनी कष्ट व दुःखाचा अनुभव केला नसता तर ते सुखाचाही अनुभव करू शकले नसते. त्यांच्या शरीराची रचनाही अशीच केली आहे. प्राण्यांना परिश्रमासाठी प्रेरणा करणारे दुःख सर्व जीवांसाठी आनंदाचे साधन आहे. दुःखाची उपयोगिता लहान प्राण्यापेक्षा मनुष्यामध्ये चांगल्या प्रकारे दिसून येते. येथे शारीरिक दुःखापेक्षा मानसिक दुःख हे अधिक दिसून येते. हे अन्तःकरणाची परिशुद्धी व शिक्षणामध्ये अतिशय सहायक ठरत आहे. दुःखामुळे हृदयाची कठोरता कमी होते, अहंकाराचा नाश होतो, धैर्य व साहसाची वाढ होते. सहानुभूती अधिक होते. धर्मामध्ये श्रद्धा उत्पन्न होते. सारांश हाच आहे की, दुःखामुळे मानव-प्रकृती परिशोधित, सुदृढ व उन्नत होते. दुःखाच्या भट्टीमध्ये भाजून निघालेला मनुष्य शुद्ध सुवर्णाप्रमाणे दीप्तिमान होतो. दुःखास योग्य रीतीने सहन करणाऱ्या कोणत्याही व्यक्तीने त्यास आवश्यकतेपेक्षा अधिक दुःख सहन करावे लागले असा आक्षेप केला नाही. एवढेच नव्हे तर, मानवजातीसाठी आदर्श समजल्या जाणाऱ्या श्रेष्ठ व्यक्तींनी आपल्या जीवनातील अनुभवांद्वारे दुःख हे वाईट नसते असेच समजून घेतले आहे. दुःख हे सुदैवानेच मिळते असे त्यांचे मत आहे. अमर यशाच्या प्राप्तीसाठी मनुष्याने पवित्रतेकडे आणि उन्नतीकडे नेणाऱ्या दुःखाच्या प्रभावापासून लाभ घेत जीवनाची यात्रा केली पाहिजे.

(फ्लिण्ट : थीज्म. २४७-५०)

आतापर्यंत भूक, तहान यांसारख्या इच्छारूपात आपल्या गरजांची जाणीव करून देणाऱ्या दुःखांचे वर्णन केले आहे. खरे पाहता, हे दुःखच नाही. कर्तव्यतत्पर होण्यासाठी प्रेरणेचे स्रोत

आहेत. पण, अनेक दुःखे प्राण्यांचा सर्वनाश करतात. मृत्यू हे त्यांचे लहान स्वरूप आहे. त्यामुळे मनुष्य कर्तव्यविमुख होतो. त्याचे धैर्य खचते. निराशापूर्ण आणि आळशीपणाचे जीवन व्यतीत करतो. दुःखांना भारतीय चिंतकांनी तीन प्रकारे विभागले आहे.

१. आध्यात्मिक : हे शरीर व मनामध्ये उत्पन्न होतात. अनेक प्रकारचे रोग, अंधत्व, बधिरत्व, ईर्ष्या, द्वेष, काम वगैरे मानसिक व्याधी यांचा समावेश या श्रेणीत होतो.
२. आधिभौतिक : एका प्राण्यापासून दुसऱ्या प्राण्यांना होणारे दुःख.
३. आधिदैविक : प्राकृतिक शक्तींच्या प्रकोपामुळे होणारे अतिवृष्टी, अनावृष्टी, भूकंप वगैरे.

पहिल्या आध्यात्मिक दुःखांपैकी काही शारीरिक व काही मानसिक दुःखे प्रयत्नासाठी प्रेरणा करणारी आहेत, हे आम्ही समजू शकतो. पण, उरलेले अनेक रोग, दुसऱ्या तिसऱ्या श्रेणीची दुःखे एवढी भयंकर आहेत की, त्यांचा उपयोगच लक्षात येत नाही. अत्यंत दयाळू व उच्च कोटीच्या आस्तिक व्यक्तीकडूनसुद्धा 'ईश्वर असेल तर तो फार क्रूर आहे' असेच उद्गार एकेकदा ऐकावयास मिळतात. लहान-सहान प्राण्यांपासून प्राण्यांचा मुकुटमणी असलेल्या मनुष्यापर्यंत सर्वच एक दुसऱ्याच्या रक्तपानासाठी आसुसल्यासारखे दिसतात. लहान मासा मोठ्या माशांचे भक्ष्य होताना पाहतोच. एक व्हेलमासा किती लहान माशांना भक्ष्य बनवतो हे ठरवणे कठीणच. मगर असो की बगळा, इतर प्राणी यांच्यासाठी भक्ष्य होणारच! बगळयांचे एका पायावर उभे राहून केले जाणारे तप हे माशांसाठीच. मनुष्य तरी कमी आहे असे वाटते काय? मुळीच नाही. जंगलात एक सिंह दोन-चार प्राण्यांना पोट भरण्यासाठी मारीत असेल, पण शहरात राहणारे सुशिक्षित महाभाग हजारो मेंढरांची, शेळयांची, डुकरांची, गायींची आपल्या उदराग्नीत आहुती देत असतात. हजारो प्राण्यांना मनुष्यासाठी आपले जीवन समर्पित करावे लागत आहे. मांजर, पाल, घार यांना उंदीर, दिव्याचे किडे, लहान पक्षी यांना पकडण्यासाठी थोडा वेळ लागू शकेल. कारण त्यांचा आहार ठरलेला आहे. पण, सभ्य आणि सुशिक्षित गृध्ररूपी मानवाच्या तावडीतून चार पाय बाळगणाऱ्यामध्ये बाज आणि उडणाऱ्यांमध्ये कागदी पतंगच काय ते शिल्लक राहिले आहेत. मोठ्या माशाच्या कचाट्यातून लहान मासे वाचू शकतील, पण दोन पाय आणि दोन हात असलेले मानवरूपी मगर जेव्हा आपले जाळे अंथरतात तेव्हा घटकाभरातच समुद्रदेखील रिकामे करून टाकतात. सभ्य आणि सुशिक्षित देशाच्या प्रतिष्ठित सज्जनांच्या अल्पोपाहारासाठी एकेका शहरामध्ये शेकडो प्राण्यांचे डोके क्षणार्धात धडापासून वेगळी करणारी यंत्रे निर्मिली आहेत. सभ्य देशातील हॉटेल्स व खानावळीचे एक वेळा परीक्षण तरी करून पहा. मृत्यूची वेदना जगात सर्वात मोठी वेदना समजली जात असेल तर हे उपाहारगृह प्राण्यांना सर्वात अधिक पीडा, वेदना देणारी वधस्थळेच आहेत. वायुमंडळात प्राण्यांच्या दुःखाचे एखादे चिन्ह बनू शकत असेल तर संपूर्ण भूमंडळ प्राण्यांच्या हाहाकाराने आणि करुण-क्रंदनाने भरलेले आहे असे म्हणण्याशिवाय गत्यंतर नाही. खानावळी, इस्पितळे, शाळा-कॉलेज या सर्वांवर एक दृष्टी फेका. जणू असेच दिसून येत आहे की, मनुष्य इतर प्राण्यांना प्राणीच समजत नाही. वाट्टेल त्याला कापून काढले, वाट्टेल त्याला

  

अर्धमेल्या अवस्थेत तडफडत सोडून दिले. जणू सर्व प्राणी याच्यासाठीच निर्माण झाले आहेत!

आधिदैविक दुःखेसुद्धा आधिभौतिक दुःखापेक्षा कमी नाहीत. पाऊस आला म्हणजे हजारो प्राणी मरतात. एक पूर आला की हजारोंना प्राणास मुकावे लागते. एक भूकंप झाला की शहरेची शहरे ओसाड पडतात. ज्वालामुखीचा एक उद्रेक हजारो गावांना बेचिराख करतो. समुद्राची एक लाट वर उसळली की, अवाढव्य अशा जहाजाची दाणादाण करून टाकते. मृत्युदेवता घारी आणि गिधाडाप्रमाणे आमच्या डोक्यावर जणू घिरट्या घालीतच आहे. त्यांचे सैन्य एका मोर्चावर असेल तर सामना तरी करता येईल! पण कुठे मृत्युदेवता दुष्काळाच्या रूपात अवतरते तर कुठे कॉलरा आणि कुठे विद्युत्पाताच्या रूपात तर कुठे सुषुप्ति रोगाचे (Sleeping disease) वेष धारण करून मांजराच्या पावलाने चाहूल न लागू देता अवतरते. झोपलेल्या माणसास कण्हण्याचीसुद्धा संधी मिळू देत नाही. यांच्याशी झुंज कशी आणि कोण देणार?

एवढे दुःख असताना ईश्वर दयाळू आहे असे म्हणून त्याच्या दयाळुतेची तुतारी फुंकण्याचा आस्तिकांना काय अधिकार आहे? हीच दयाळुता असेल तर क्रूरता काय असेल? म्हणूनच नास्तिक म्हणतो की, ईश्वर दुःख निवारण करू इच्छितो, पण करू शकत नाही, म्हणून तो दुर्बल असला पाहिजे किंवा दुःख- निवारण करू शकतो पण इच्छीत नाही, म्हणून क्रूर असला पाहिजे किंवा निवारणही करू इच्छीत नाही, आणि करूही शकत नाही म्हणून क्रूर आणि निर्बल दोन्ही असला पाहिजे किंवा निवारण करूही शकतो आणि तसे इच्छितोसुद्धा तरी पण दुःख नाहीसे होत नाही.

आमच्या मते ईश्वर दुर्बलही नाही, क्रूरही नाही. तो दुःख राहू नये अशी इच्छा करतो आणि त्यांचे निवारणही करू शकतो. पण 'पाप' प्रकरणात आम्ही विवेचन केल्याप्रमाणे ईश्वर जीवांचे स्वातंत्र्य हिरावून घेऊ शकत नाही. तसे करणे जीवांसाठी कल्याणकारकही होणार नाही.

पहिल्या प्रकारचे दुःख प्राण्यांना परिश्रमासाठी प्रेरित करते, उन्नतीसाठी सहायक ठरते. दुसऱ्या प्रकारचे दुःख त्याच्या पापासाठी दंडरूप ठरत आहे. आम्ही दुःखाविषयी विचार केल्याप्रमाणे सुखाविषयी विचार करीत नाही हीच दुःखाची बाब आहे. निष्पक्षपातीपणाने विचार केला तर जगामध्ये दुःखापेक्षा सुखच अधिक आहे. जगामध्ये दुःखाचे राज्य नसून सुखाचेच राज्य आहे असे दिसून येईल. महर्षी दयानंद सत्यार्थप्रकाशच्या आठव्या समुल्लासात लिहितात :

"सृष्टीतील सुख-दुःखाची तुलना केली असता सुख कितीतरी पटीने अधिक असते. अनेक पवित्र- आत्मे (जीव) मुक्तीच्या साधनांचा अवलंब करून मोक्षाचा आनंद सुद्धा प्राप्त करतात."

मनुष्य दुःखासाठी ईश्वरास जेवढा दोष देतो तेवढा सुखासाठी त्याच्याविषयी कृतज्ञता व्यक्त करीत नाही, ही मनुष्याची चूक आहे. मनुष्याने आपल्या जीवनातील साधनावर विचार केला तर त्याला ईश्वराविषयी कृतज्ञ व्हावेच लागेल. आम्ही शारीरिक व्याधीसाठी ईश्वरास शिव्यांची लाखोली वाहतो. पण, कधी विचार केला आहे का, की जो काही आनंद आम्ही जीवनात अनुभवतो तोसुद्धा ईश्वरानेच दिला आहे म्हणून? आमचे डोळे किती सुखदायक आहेत ते

आंधळयास विचारले तर समजेल. मनुष्याला आनंदाच्या साधनांची बहुमूल्यता त्यांच्या नाशानंतरच समजते. साधारणपणे तो सृष्टीच्या आनंदात एवढा मग्न होतो की, तो स्वतःस तर विसरतोच, पण त्याच बरोबर आपले कर्तव्यही विसरून बसतो. डोळयाने किती सुंदर दृश्य पाहत आहोत! आकाशाला गवसणी घालणारे पर्वत, पतिराज समुद्राच्या भेटीसाठी उन्मुक्त स्वच्छंद खळखळाट करीत प्रवाहित होणाऱ्या नद्या, आकाशाचे इंद्रधनुषी नयनमनोहर स्वरूप, वृक्ष आणि फुलांचे अपार सौंदर्य, फुलावर बसलेल्या रंग-बिरंगी फुलपाखरांच्या आनंददायक आकृती -- ईश्वराने डोळे दिले नसते तर हे सर्व कसे पाहू शकलो असतो? सुखचा अनुभव कसा झाला असता? षड्रसयुक्त पंचपक्वान्नाच्या जेवणाची चव जिव्हेच्या अभावी अनुभवता आली असती का? जिव्हा आणि स्वादु पदार्थ यांना ईश्वरानेच बनविले नाही काय? या सर्व वस्तू आम्हास आनंद देत नाहीत काय? श्रवणेंद्रियांना विचारून पाहा! ते काय म्हणतात? बधिर आणि कान बाळगणारा हे दोन्ही सारखेच आहेत काय? कान आनंदाचे साधन नाहीत काय? मनोहर राग आणि चित्ताकर्षक वाजंत्र्या, गोड-गोड गाणी कान नसते तर कसे ऐकू आले असते? कानासाठी संपादित केल्या जाणाऱ्या वस्तू ईश्वराने रचल्या नाहीत काय? नास्तिकाद्वारे दुःखमय म्हटल्या जाणाऱ्या सृष्टीचेच अंश नव्हेत काय? जगामध्ये सुख आणि दुःख किती आहे याचा विचार आता तरी करावयास पाहिजे. अत्यंत दुःखी असलेल्या पुरुषाचे उदाहरण घेऊन त्यास २४ तासांत होणाऱ्या दुःखाचा हिशोब करा. तो १२ तासांपेक्षा अधिक काळ दुःखाचा अनुभव करतो काय? एखादी व्यक्ती ३० वर्षे जगत असेल तर ती १५ वर्षे दुःखाचा अनुभव करते काय? मुळीच नाही. जीवनात दुःख अवश्य होते, पण ते डाळीमध्ये जेवढे मीठ असते तेवढेच असते. हे दुःख पूर्वजन्मी केलेल्या पापाचे फळ (परिणाम) मात्र आहे. हा दंड नसेल तर अंतःकरणावर असलेले कुसंस्कार व अशुद्धी यांचे निवारण करता येत नाही. आम्ही या अल्पकालिक जीवनासच जीवन समजतो म्हणूनच अनेक दुःखांची उपयोगिता आम्हास समजून येत नाही. खरे पाहता, हे जीवन आमच्या अनादी आणि अनंत जीवनाचा एक लहानसा अंश आहे. जे लोक पुनर्जन्माचा स्वीकार करीत नाहीत त्यांच्यासाठी गुंतागुंतीची समस्या आहे, आमच्यासाठी नाही. म्हणूनच फ्लिण्ट महोदय पशु-पक्ष्यांच्या दुःखांचा त्यांच्या पापाशी संबंध शोधू शकले नाहीत. ते लिहितात :

'मनुष्यांच्या दुःखापेक्षा पशु-पक्ष्यांचे दुःख अधिक अनिर्वचनीय आहेत. कारण, मनुष्याच्या दुःखांचा पापाशी संबंध आहे. पण पशुपक्ष्यांच्या नाही. दुःख प्रत्येक प्राण्यास होते.

या प्रश्नाचे उत्तर फ्लिण्ट जवळ नाही. ते हताश होऊन म्हणतात.

''मनुष्याचे मस्तिष्क बहुतेक या प्रश्नाचे पूर्ण उत्तर देऊ शकत नाही.''

"The suffering of the animals is, in fact more mysterious than the suffering of man, Just because so little of the farmer and so much of the latter can be traced directly or indirectly to Sin. But every animal is made subject to suffering."

  

"The human mind may very probably be variable. fully to answer this question.

(Flient : Theism : P.246)

नास्तिक फ्लिण्टची या असमर्थतेस आपला सर्वात मोठा विजय समजतील. खरोखरच फ्लिण्टच्या आस्तिकता बरोबर असती तर या प्रश्नाचे उत्तर देणे अशक्यच झाले असते. ते एका ठिकाणी पशु-पक्ष्यांच्या दुःखाची उपयोगिता ही त्यांच्या संरक्षणासाठी आहे असे लिहितात. पण ते केवळ भूक, तहान, भीतीसारख्या उन्नती करण्यासाठी व आत्मरक्षणासाठी उपयोगात येणाऱ्या दुःखाच्या बाबतीतच लागू पडते. पण यापेक्षाही भयंकर दुःख, कष्ट, वेदना ज्यांचा पशु-पक्ष्यांच्या जीवनात काहीच उपयोग नाही, तिथे हे उत्तर अपुरे ठरते.

आल्फ्रेड रसेल वालेसनी या दुःखाची मीमांसा खालील प्रकारे केली आहे.

''अशा प्रकारे 'जीवन-जगता'मध्ये असलेली व्यवस्था पाहून लहान प्राण्यांची उपयोगिता मोठ्या प्राण्यांच्या आहारासाठीच आहे हे आम्ही जाणले आहे. याचा परिणाम अत्यंत आश्चर्यजनक आणि उत्तम झाला आहे. यामुळे एक सर्वोत्कृष्ट 'मानव-जात' जन्मास आली आहे. ती जीवन-जगातील अनेक प्रकारच्या सौंदर्याचा अनुभव करू शकते.

वालेस महोदय या सृष्टीस दुःखदायक किंवा क्रूर समजत नाहीत. लहान-सहान प्राण्यांना दुःख पोहचविण्याचा उद्देश मनुष्याचा विकास करणे हाच आहे. त्यांच्या दृष्टीत सृष्टि-रचनेचे उद्दिष्ट 'मानवोत्पत्ती' हेच आहे. संपूर्ण सृष्टी मनुष्याच्या अनुभवासाठी आहे असे त्यांना वाटते. अनुभवासाठी नसेल तर विकासासाठी तरी आहेच. बाब एकच. 'मनुष्य' हाच सृष्टिरचनेचा अंतिम उद्देश आहे.

पण वालेस महोदयांचे हे कथन अंधारात वस्तूंचा शोध घेण्यासारखे आहे. (Groping in the dark). त्यांनी एक ''मॅन्स प्लेस इन दी यूनिवर्स'' नावाचा ग्रंथ लिहिला आहे. याचा अर्थ ''मनुष्याचे सृष्टीमध्ये स्थान'' असा आहे. 'मनुष्या'साठीच समस्त सृष्टीची रचना करण्यात आली आहे असे त्यांनी या ग्रंथात दाखवण्याचा प्रयत्न केला आहे. 'दी वर्ल्ड ऑफ लाईफ'च्या भूमिकेत ते लिहितात

''विकासाच्या विचित्र आणि दुर्ज्ञेय घटनांचे एकच उद्दिष्ट आहे ते म्हणजे मनुष्याचा विकास. कारण, संपूर्ण प्राणि जगताचे बहुमूल्य रत्न मनुष्यच आहे.''

सृष्टीतील सर्वोत्तम प्राणी मनुष्यच आहे यात तिळमात्रही संदेह नाही. कमीत कमी मनुष्यांचे तरी हेच मत आहे. पशु-पक्ष्यांचे काय मत अहो हे जाणणे कठीण आहे आणि मनुष्यास ते जाणून घेण्याची गरजही वाटत नाही. पण, खरे तर हेच आहे की, जर आम्ही विचारू शकलो असतो तर त्यांनी हेच सांगितले असते की, जो मनुष्य त्यांचे भक्षण करतो किंवा ज्या मनुष्याच्या विकासाकरिता शेकडो प्राण्यांची हत्या करावी लागते तो कधीच सृष्टीचा सर्वश्रेष्ठ प्राणी किंवा बहुमूल्य रत्न होऊ शकत नाही. बंगालचे प्रसिद्ध कादंबरीकार बंकिमचंद्रनी आपल्या कादंबरीत सिंहाच्या एका सभेचे वर्णन केले आहे. त्यात एक सिंह व्याख्यान देत असताना ''मनुष्य हा अति

तुच्छ, डरपोक, धूर्त आणि सृष्टीतील क्षुद्रतम प्राणी आहे' असे सांगतो. शेळया, मेंढरे, गायी वगैरे स्वतःच्या भक्षणासाठी जन्मलेले आहेत असे मनुष्य समजतो त्याचप्रमाणे मनुष्यसुद्धा सिंहाच्या आहाराकरिताच बनविला गेला आहे असे सिंहही म्हणू शकतो.

आम्ही पशू-पक्ष्यांची सम्मती न घेताच वालेस महोदयांनी वर्णन केल्याप्रमाणे मनुष्य सृष्टीतील सर्वश्रेष्ठ प्राणी आहे असे स्वीकार करीत असलो तरी मनुष्याचा विकास हेच सृष्टि रचनेचे मुख्य उद्दिष्ट आहे, मनुष्याच्या रचनेचे दुसरे कोणतेच प्रयोजन नाही,' हे मात्र आम्ही स्वीकार करणार नाही.

वालेस महोदयांनी आपल्या 'जीवन जगत्' नावाच्या ग्रंथात 'सृष्टी निर्दयी आहे काय?' (Is Nature Cruel) या शीर्षकाखाली एक अध्याय लिहिला आहे. त्यातील अनेक विषयांशी आम्ही सहमत आहोत. त्याचे वर्णन आवश्यक त्या ठिकाणी करू. त्या अध्यायात त्यांनी 'आम्ही समजत आहोत तेवढी सृष्टी निर्दयी नाही' हे दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. पण, प्राण्यांचा काहीही अपराध नसताना केवळ 'मनुष्याच्या' विकासासाठी स्वल्प पीडा जरी दिली जात असेल तर सृष्टीच्या निर्दयी होण्यामध्ये मुळीच संदेह राहत नाही. आई आपल्या मुलास त्याच्या विकासासाठी केव्हातरी कठोर दंड देते. तसे प्राण्यांच्या उन्नतीसाठी त्यांना दुःख देणे ही निर्दयता होऊ शकत नाही, हे आम्ही समजू शकतो. पण, प्राण्यांना त्यांच्या उन्नतीसाठी दुःख न देता इतर प्राण्यांच्या विकासासाठी दुःख देणे दयाळुता नसून क्रूरताच आहे. वालेस महोदयांच्या या नियमास मानव समाजाची आधारशिला समजण्यात आले तर सृष्टीतील सर्वच व्यवस्था अस्ताव्यस्त होऊन स्वैराचार पसरेल. मनुष्य इतर सर्व प्राण्यांना आपल्या सुखाची साधने समजू लागला तर एक सुशिक्षित मनुष्य एका अशिक्षित मनुष्यासुद्धा आपल्या सुखाचे साधनच समजेल. बहुतेक अनेक जमातींनी असाच विश्वास बाळगून इतर जमातींना आपल्या सुखाचे, विकासाचे साधनमात्र समजले आहे. पण त्या जमातीतही हा सर्वमान्य सिद्धांत नाही. उत्क्रांतीवादाचा अधिक प्रचार झाला तर हासुद्धा सर्वमान्य विचार होऊ शकेल, यात तिळमात्रही संदेह नाही.

खरे पाहता, या प्रश्नाचे समर्पक उत्तर पुनर्जन्माचा सिद्धांतच देऊ शकतो. या सिद्धांताप्रमाणे प्रत्येक प्राणी आपल्या कर्माद्वारेच दुःखाचा अनुभव करतो असे स्वीकारले तर कोणतेही दुःख सृष्टीच्या निर्दयतेचे सूचक ठरत नाही. गुन्हेगारास शिक्षा करणे हे न्यायाचे आणि दयेचे सूचक आहे. अन्यायाचे, निर्दयतेचे द्योतक नव्हे.

ईश्वर प्राण्यांना एवढे कठोर दंड का देत आहे? सभ्य, सुसंस्कृत जमातीत दंड अपराध्यास सुधारण्यासाठी असावा असेच दंडाचे विधान आहे. दंड हा बदला घेण्यासाठी किंवा घृणेच्या दृष्टीतून नसावा. सृष्टीचा नियमसुद्धा असाच आहे. खरे पाहता, सभ्य जमातींनीसुद्धा हा नियम सृष्टिरचनेवरूनच शिकलेला आहे, असा आमचा दृढविश्वास आहे. सृष्टीचे योग्य निरीक्षण न करणाऱ्या जमातीत भयानक दंडपद्धती आहेत. पण, शिक्षित जमातींना चांगल्या प्रकारे समजले आहे की, सृष्टि नियम त्यांना सहृदय होण्यासाठी उपदेश करीत आहे. अथर्ववेदाच्या एका मंत्रात-

सहृदयं सामनस्यमविद्वेषं कृणोमि वः ।
अन्योन्यमभिहर्यत वत्सं जातमिवाघ्न्या ॥३.३०.१॥

मानवांनो! मी तुम्हास सहृदय, बुद्धिमान व द्वेषरहित बनवले आहे. नवजात वासरास गाय जशी प्रेम करते तसे तुम्हीसुद्धा परस्पर प्रेम करा' असा उपदेश केला आहे.

वस्तुतः सृष्टीमध्ये हाच नियम आहे. प्राण्यांना दंड मिळतो पण निर्दयतेने नव्हे. सुधारणा करण्यासाठी दयाळूपणाने दंड दिला जातो. गंभीरपणे विचार केला तर सृष्टी आपल्या अपराध्यांना जेवढ्या करूणापूर्ण, दयापूर्ण हृदयाने दंड देत आहे तेवढ्या करूणापूर्ण, दयापूर्ण हृदयाने दंड देणारा राजा उदाहरणासाठी देखील सापडणे कठीण आहे. नियमाचे उल्लंघन करणाऱ्यांना जेवढ्या दयेने सृष्टी दंड देत आहे तेवढ्या दयेने मुलांच्या सुधारासाठी कोमल हृदयाची आईसुद्धा दंड देऊ शकत नाही. पण, मोहात फसलेली मूर्ख आई आपल्या मुलांना कुमार्गातून दूर सारू शकत नाही. तसे मात्र ईश्वर करीत नाही. हे ईश्वराचे खरे प्रेम आहे, जे आम्हास सुधारण्यासाठी व दंड देण्यासाठी भाग पाडते. ईश्वराचे सर्व नियम जीवांच्या सुखासाठीच आहेत, ईश्वरासाठी नव्हेत. म्हणून सृष्टीविषयी दोषारोपण करणारे एकाच भागाकडे पाहतात. त्यांची दृष्टी सृष्टीतील सर्व भागाकडे जात नाही.

ईश्वर क्रूर नसून दयाळू आहे असे आम्ही म्हणतो. ते कसे? अगोदर दंड देण्याच्या पद्धतीवर विचार करा. जीव नेहमी सृष्टि नियमाचे उल्लंघन करतात. पाप करतात. यामुळे त्यांच्यामध्ये आळस, प्रमाद, अहंकाराची वाढ होते. त्यांचे ज्ञान कमी होत असते. त्यांच्यामध्ये इतर प्राण्यांना कष्ट देण्याची प्रवृत्ती वाढते. सृष्टीचे सर्व नियम जीवांच्या कल्याणासाठीच असताना त्यांचे उल्लंघन करणे त्यांच्या दुःखाचे कारण ठरते आणि हेच पाप आहे. म्हणूनच 'अहिंसा परमो धर्मः' म्हटले आहे. इतरांना मारणेच हिंसा नव्हे. सृष्टीच्या नियमांचे उल्लंघन करणेसुद्धा फार मोठी हिंसा आहे. नियमोल्लंघनाचे परिणाम दुःखच होईल. म्हणून जीवांनी सृष्टीच्या नियमाचे उल्लंघन केले तर त्यास दंड मिळावयास पाहिजे हा एक सृष्टीचा नियम आहे.

सृष्टीमध्ये दंड देण्यासाठी किती उत्तम नियम आहेत ते पाहा : जे पुनर्जन्माचा स्वीकार करीत नाहीत ते हे रहस्य समजू शकत नाहीत. त्यांना पावलोपावली अडचणींना तोंड द्यावे लागते. एका अल्प जीवनात मनुष्य आपल्या अंतिम उद्देशास कसा प्राप्त करू शकतो हे त्यांच्या लक्षात येऊच शकत नाही. जीवांना शिक्षण देण्यासाठी विविध वर्ग बाळगणाऱ्या शाळेप्रमाणे ही सृष्टी बनविली आहे हे त्यांना समजतच नाही. खरे पाहता, जगामध्ये दिसणारी लाखो प्रकारची शरीरे सृष्टिरूप शाळेचे वर्ग आहेत. उत्तम असो की निम्न, प्रत्येक जीव या वर्गापैकी कोणत्या तरी एका वर्गात प्रवेश घेण्यास पात्र अशा योनिरूप (शरीररूप) श्रेणी बनविण्यात आल्या आहेत. सृष्टी आपल्या कोणत्याही विद्यार्थ्यास या शाळेतून बहिष्कृत करीत नाही आणि अयोग्य विद्यार्थ्यांना एकाच वर्गात ठेवीत नाही. आमच्या शाळेत चांगले आणि वाईट दोन्ही प्रकारचे विद्यार्थी मिळून एकमेकास हानी पोहचवितात. निर्बुद्ध विद्यार्थ्यांना लक्षात येईल असे शिकविले तर हुशार विद्यार्थ्यांचे नुकसान होते.

अशी अव्यवस्था सृष्टीमध्ये नाही. जीवांच्या योग्यतेनुसार वर्ग आहेत, यांनाच 'योनी' (शरीर) म्हणतात. हिंदूंच्या पुराणात ८४ लाख योनी वर्णिल्या आहेत. वालेस महाशयांनी आपल्या 'जीवन जगत्' मध्ये ९२ पृष्ठावर ए. ई. शिप्ले यांच्या व्याख्यानाच्या आधारावर प्राणि-योनी ७९०५३३ आहेत अशी गणना केली आहे. वाचकांच्या मनोरंजनासाठी त्यांना येथे उदधृत करीत आहोत.

| | | | |
|---|---|---|---|
| १ | Mammalla | दूध देणारे प्राणी | ९९५५ |
| २ | Birds | पक्षी | १३८३५ |
| ३ | Reptiles Batrachia | सरपटणारे | ७१८० |
| ४ | Fishes | मासे | १४९९६ |
| ५ | Mollusca | मोलस्का | ६२००० |
| ६ | Bryazoa | ब्रियाजोआ | २२२ |
| ७ | Crustacea | क्रस्टोशिया | १३९५३ |
| ८ | Spiders | पाल वगैरे | २५८७० |
| ९ | Myriapods | बहूपद | ८७२५ |
| १० | Insects | मकोडे | ४४५९७८ |
| ११ | Eching- derms | कठोर-त्वचेचे | १५०९७ |
| १२ | Worms | लहान किडे | ८७१६ |
| १३ | Coelenterata | सीलेंट्रेटा | ५००८ |
| १४ | Sponges | स्पंज | २९६५ |
| १५ | Protozoa | प्रोटोजोआ | ६००० |
| | | एकूण : | ७९०५३३ |

ही सूचीसुद्धा ठीक नाही. गूंथर महोदयांनी १८८१ साली यांची संख्या ३१,१६० सांगितली होती. २८ वर्षानंतर कळून आले की, ही अर्ध्यापेक्षाही कमी आहे. मिस्टर डी. शार्पचे मत आहे की, Insects ची संख्या २० लाखांपेक्षाही अधिक आहे. गूंथरनी दूध पाजवणाऱ्या प्राण्यांची संख्या २३०० लिहिली होती. पण शिपले ९९५५ आहे असे म्हणतात. अशाच प्रकारे संशोधन केले तर ८४ लाखापर्यंत पोहचणे अशक्य नाही. तसे नाही झाले तरी शरीरांची संख्या ७ लाख स्वीकारली तरी आमच्या सामयिक उद्दिष्टासाठी पर्याप्त आहे. हे वर्ग केवळ पृथ्वीशीच संबंधित असलेले आहेत. संपूर्ण सृष्टीचे नव्हेत. पृथ्वी सौरमंडळाचा एक लहानसा अंश आहे. याशिवाय किती तरी सौरमंडळ आहेत ज्यांची गणना करणे मनुष्यशक्तीच्या बाहेर आहे.

या लक्षावधी योनीच (शरीर) श्रेणी आहेत. या योनीमध्ये जीव शिक्षा अनुभवतात. तसेच शिक्षणही प्राप्त करतात. सृष्टीची व्यवस्था अत्यंत नियमित आहे. जीव एका विशेष शरीराच्या योग्य असेतोवरच त्यात राहतो. उन्नत किंवा अवनत शरीराच्या योग्य होताच त्यातून काढून दुसऱ्या शरीरात पाठविला जातो. श्रेणीची अदलाबदल अतिशय चातुर्याने होते. तो कुठून कुठे

आला हे जीव समजूसुद्धा शकत नाही. त्यास त्याची पूर्वस्थिती समजली असती तर नव्या परिस्थितीचा तो लाभ घेऊ शकला नसता. जुन्या मित्रांची स्मृती त्याचा पाठपुरावा करीत असेल, जुने संस्कार प्रबळ ठरत असतील तर तो दुःखामध्ये बुडून जाईल. पुनर्जन्म असेल तर पूर्वजन्माची आठवण का राहत नाही? असा प्रश्न काहीजण विचारतात. आठवण राहिली असती तर जीवांचा सुधार झाला नसता. हे आमचे उत्तर आहे. मानवी दंड-पद्धतीचा विचार करा. एक व्यभिचारी एखाद्या सतीचे सतीत्व भंग करतो असे समजा. त्याला जेलमध्ये ठेवले जाते. शासन यापेक्षा अधिक काय करू शकते? पण, त्याचे पूर्वसंस्कार त्याच्या मनात कार्य करीतच असतात. म्हणून तो जेलमध्येसुद्धा आपल्या पूर्वपरिस्थितीचा विचार करीतच असतो. जेलमधून सुटका झाल्यानंतर पुन्हा आपल्या पूर्वीच्या पाप-कार्याची सुरुवात करतो. शासक अपराध्यांची पूर्वस्मृती बदलू शकले असते तर किती चांगले झाले असते. अपराध्यांचा सुधार किती लवकर झाला असता!

हे सर्व ईश्वराच्या व्यवस्थेतच शक्य आहे आणि शक्य होत आहे. अनेक दुःखे मानवांच्या सामान्य दृष्टीस दुःखे वाटत असले तरी खरे पाहता दुःखे नाहीत. प्रत्येक मृत्यू दुःखदायक नसतो. इतरांसाठी कसे का असेना! मरणाऱ्या व्यक्तीस मात्र नसतो. त्याची श्रेणी बदलली जात आहे याची त्याला जाणीवसुद्धा होत नाही. नवीन श्रेणीमध्ये जीव अति उत्साहाने धडा शिकण्यास प्रारंभ करतो. या श्रेणीची दोन कार्ये आहेत. जुने संस्कार धुऊन काढणे आणि नवीन संस्कार उत्पन्न करणे. अशा प्रकारे या श्रेणी जीवांच्या शुद्धीसाठी साधन आहेत. ज्यामुळे जुने संस्कार धुतले जातात आणि जीव पुन्हा नवीन संस्काराच्या योग्य बनतो.

इतर प्राण्यांच्या आक्रमणापासून स्वतःचा बचाव करून घेण्यासाठी आवश्यक असलेली अनेक साधने त्या-त्या देहासाठीच ईश्वराने निर्मिलेली आहेत. प्राण्यांच्या शरीराचे रंग त्यांच्या परिस्थितीच्या अनुकूलच असतात, असे प्राणिशास्त्रज्ञ सांगतात. बागेत राहणाऱ्या पोपटाचा रंग वृक्षाच्या पानाप्रमाणे हिरवा असतो. त्यामुळे ते तेथे लपून बसू शकतात. झुडपामध्ये बसलेला ससा झुडपासारखा असतो. त्याने हालचाल नाही केली तर त्यास ओळखणेही कठीण जाते. फुलावर बसलेल्या फुलपाखरांना ओळखणे तर त्याहीपेक्षा कठीण जाते. अशा प्रकारे सृष्टीतील प्रत्येक प्राण्यास आवश्यक असलेले उपाय सृष्टीने केलेच आहेत.

वालेस महोदय काय म्हणतात ते पाहणे योग्यच होईल :

" यांचा प्रबंध अशा उत्तम रीतीने केला गेला आहे की, ते स्वाभाविक अवस्थेत आकस्मिक दुर्घटनांच्या तावडीत सापडत नाहीत. आम्हास दुखापत होते तशी दुखापत चिमण्या, उंदीर, खार यांना वरून पडल्यामुळे होत नाही. त्यांना आपल्या शक्तीपेक्षा अधिक न चढण्याचे, उडण्याचे शिक्षण अशा उत्तम प्रकारे मिळालेले असते की, त्यांना बहुतेक हानी पोहोचतच नाही. काहींना वीज पडल्यामुळे , गारा पडल्यामुळे किंवा दावानल पेटल्यामुळे, परस्परांच्या संघर्षामुळे थोडे फार नुकसान होते पण ते एवढे कमी आहे की, उल्लेखनीय नाही. एकमेकाच्या भांडणात जे घाव होतात ते अधिक गंभीर, कठोर असत नाहीत. फारच लवकर घाव भरतात. जे काही होते ते

फारच थोडा वेळापुरते असते.''

('जीवन- जगत्' पृ.३७६)

आता, हिंसक प्राण्याद्वारे होणाऱ्या दुःखाविषयी थोडा विचार करू या. निरनिराळया प्राण्यांना ज्याप्रमाणे स्वसंरक्षणाची, सुरक्षिततेची साधने दिली गेली आहेत त्याचप्रमाणे एखादा प्राणी पकडीत सापडून मारला जात असेल तर त्यास मरतानासुद्धा विशेष कष्ट होऊ नयेत याची ही खबरदारी घेतलेली आहे. वालेसची साक्ष या विवेचनाच्या पुराव्यादाखल पाहणे योग्यच होईल.

''या लहान-सहान विषयांना आधार बनवून सृष्टीच्या क्रूरतेविषयी आक्षेप घेता येणार नाही. खरे पाहता, सृष्टीने विविध प्राण्यांना दिलेल्या भयंकर साधनांच्या आधारावर आक्षेप करणे योग्य ठरेल. मांजरांना मिळालेले अणकुचीदार दात आणि तीक्ष्ण नखे, सर्पाचे विषारी दात, गांधीलमाशीचा डंख हे सर्व किती भयंकर आहेत. ही सर्व साधने दुःख देण्यासाठीच आहेत असे म्हणणे भ्रमात्मक आहे. यांचाही उपयोग आहे. यांच्यामुळे पकडीत सापडलेल्या प्राण्यांना कमी दुःख होते, ही साधने नसती तर ते घायाळ होऊन पकडीतून सुटका करून घेऊन पळून गेले असते आणि त्या स्थितीत त्यांना किती तरी पटीने अधिक दुःख झाले असते. सुळयासारखे दात आणि मजबूत पंजे प्राण्यांना चांगल्या प्रकारे पकडू शकतात. सर्पाचे विषारी दात प्राण्यास मूर्छित करतात. गांधीलमाशीच्या डंखाचा अनुभव केलेले पक्षी पुन्हा हल्ला करण्यास धजत नाहीत. सिंह, मांजर, वाघ, लांडगा यांच्या पकडीत सापडलेल्या प्राण्यास अत्यंत कमी कष्ट होतात. झटकन पकडणे, पकडताच पंजाद्वारे प्रहार करणे, दाताने फाडणे यांमुळे मृत्यू तरी येतो किंवा स्मृतिनाश तरी होतो. त्यानंतर मृत्यूची वेदना त्यास जाणवत नाही. लक्षात ठेवण्याजोगी बाब ही की, मांसाहारी प्राणी केवळ भूक लागल्यानंतरच शिकार करतात. मनोरंजनासाठी मारीत नाहीत. पाळीव मांजरांची व उंदरांची उदाहरणे भ्रमात्मक आहेत. मनुष्याच्या शरीरास दुःखाचा अनुभव फारच लवकर होतो. कारण रक्षणासाठी आवश्यक असलेल्या पट्ट्या वगैरे शरीरावर नाहीत. तरी पण, सिंहाच्या तावडीतून सुटुन आलेल्या व्यक्तींनी स्वतःस शारीरिक किंवा मानसिक कोणतेच दुःख झाले नाही असे सांगितले आहे.''

(जीवन- जगत् पृ.३७६-७७)

या सर्व उदाहरणावरून सृष्टीचे नियम दयाळूपणाचेच आहेत असे कळून येते. ते जीवांना मर्यादेच्या बाहेर दुःख होऊ देत नाहीत. अधिक दुःख अनुभवण्याची वेळ येताच मूर्च्छा येते. या मूर्च्छेचा उपयोग प्राण्यांना दुःख कमी व्हावे हाच आहे. जगात सर्वात अधिक दुःख देणारा प्राणी मनुष्य आहे. सिंह आपल्या भक्ष्य प्राण्यांना क्षणार्धात मारतो. पण, मनुष्यांनी अशा प्रकारची साधने बनविली आहेत की, किती तरी काळ त्यांना तडफडत राहावे लागते. या संदर्भात वैद्यांच्या अत्याचाराला मर्यादाच नाही. अनेक प्राण्यांच्या अवयवांना अर्धे कापून ठेवून त्यांचे परीक्षण केले जाते. प्राण्यांनी किती ही तडफड केली तरी, त्यांना कितीही दुःख झाले तरी आपल्या ज्ञानाची दुसऱ्या शब्दात क्रूरतचेची भूक शमविण्यासाठी त्यांना यमयातना देत असतात. पण, यम

  

अवस्थेतही परमेश्वर या प्राण्यांना कोणत्या तरी प्रकारे सांत्वना देतोच. मनुष्यांना अत्याचारासाठी आवश्यक दंड देतो.

आम्ही वर सात लक्ष योनी (शरीरां)चे वर्णन केले आहे. प्रत्येक योनीमध्ये कोट्यवधी व्यक्ती असतात. भूमंडळातील केवळ मनुष्य योनीची संख्या ६ अब्ज ५० कोटी आहे. एकेका वारुळात लाखो मुंग्या आहेत. अशा प्रकारे पृथ्वीवरील प्राण्यांची संख्याच मानवाच्या हिशेबी बसत नाही. या संख्येशी वीजपातामुळे मरणाऱ्यांची तुलना केल्यास दुःखाचे परिमाण फारच कमी आहे, असे दिसून येईल. प्राण्यांच्या दुःखांचा हिशोब करताना सुखांची संख्या विसरून जातो. मृत्यू जर सर्वात मोठा दंड आहे तर तो जीवनात फक्त एकदाच येतो. तोसुद्धा भयंकर स्वरूपात येत नाही. म्हणून ईश्वर आपल्या जीवांना सुधारणेसाठी आवश्यक असलेलेच दुःख देतो हे आम्ही सांगितले होते. सृष्टीचे नियम प्राण्यांना दुःखापासून स्वतःचा बचाव करून घेण्यासाठी सहायताच करीत नसून पापही करू देत नाहीत.

म्हणून नास्तिकांच्या पाप व दुःख यासंबंधीच्या शंकेत काहीच अर्थ नाही.

□□□

# अध्याय : आठवा

## ईश्वराचे गुण (३)

### अनंतता

मागील अध्यायात ईश्वर एक आहे, सर्वव्यापक आहे, चेतन आहे, सर्वशक्तिमान आहे याबरोबरच तो कल्याणकारी आणि दयाळूसुद्धा आहे असे दाखवून दिले आहे. आमचा अंतरात्मा आणि ही दृश्यमान सृष्टी याची साक्ष देत आहेत. आस्तिक ईश्वरामध्ये आणखी एका गुणाचा स्वीकार करतात. तो गुण आहे 'अनंतता'.

ही अनंतता मनुष्याच्या बुद्धीचा कल्पना विलास आहे की यासाठी एखादी युक्ती, तर्क पुराव्यादाखल देता येईल का ते पाहू.

अनंततेविषयी घेतला जाणारा सर्वात मोठा आक्षेप हा आहे की, मनुष्य सांत आहे. त्याची बुद्धी सुद्धा सांतच आहे. अशा स्थितीत सांत मनुष्य ईश्वराच्या अनंततेस कसे जाणू शकतो?

एखादी बाब तर्काद्वारे सिद्ध करणे, तीच बाब मनाद्वारे अनुभव करणे या दोन्ही गोष्टी समजून घेण्यासारख्या आहेत. पहिली बाब तर्कशास्त्राशी (Logic) व दुसरी मनोविज्ञानाशी (Psychology) संबंध ठेवते. ही दोन्ही शास्त्रे परस्पर विरुद्ध नाहीत. कारण,. तर्कशास्त्राचा मूळ आधार मनोविज्ञानच आहे. पण, अनेक ठिकाणी मनुष्य आपल्या मनाद्वारे अनुभवलेल्या अनेक विषयांना तर्काद्वारे सिद्ध करू शकत नाही. तर्काद्वारे सिद्ध केले तरी मनास शांती न देऊ शकणारे बरेच विषय आहेत. अनुभव आणि तर्क या दोन्हीद्वारे सिद्ध विषयात मनुष्य दृढ विश्वास बाळगतो. आम्ही येथे अनंतत्वाविषयी विचार करीत आहोत. सांत मस्तिष्क अनंततेस कसे जाणू शकते? हा आक्षेप आहे. मनुष्याचे मस्तिष्क सांत आहे या बाबतीत कोणतीच शंका नाही. त्याच्या मर्यादा किती आहेत हे सर्वजण जाणतातच. अद्वैतवादी (जीव आणि जग ब्रह्मच आहे असे म्हणणारे भ्रांतिवादी) 'व्यवहारात जग हे अल्प-सांत दिसत असले तरी तत्त्वतः अनंतच आहे' असे म्हणतील. त्यांच्या दृष्टीत जीव अनंत असल्यामुळे अनंताद्वारे अनंतता जाणण्यासाठी कोणतीही अडचण उपस्थित होत नाही. पण, जीव हे ब्रह्म आहे, हे स्वीकारण्यासाठी अनेक प्रश्नांना तोंड द्यावे लागते. त्या प्रश्नांना उत्तरे आजपर्यंत देता आली नाहीत, पुढे देता येणार नाहीत. म्हणून आम्ही त्याचा स्वीकार करू शकत नाही आणि त्यांचे अनुसरणही करीत नाही. म्हणून या प्रश्नाचे उत्तर जीव अल्पच आहे हे स्वीकारूनच द्यावे लागेल.

वास्तविक पाहता अनंतता ही निषेधात्मक आहे. आम्ही न अनुभवू शकलेल्या किंवा तर्काद्वारे सिद्ध न करू शकलेल्या अंत बाळगणाऱ्या वस्तूस अनंत म्हणतो. हे दोन्ही विषय सांत बुद्धीद्वारे जाणणे शक्य आहे. आम्ही दररोज अंत असलेल्या वस्तूंना पाहत असतो. काही स्थळाच्या (लांबी-रुंदीच्या) तुलनेत परिमित आहेत, काही काळाच्या तुलनेने परिमित आहेत. काही दोन्हीच्या तुलनेत

परिमित आहेत.ज्या पेनने मी लिहितो ती एक लहानशी वस्तू आहे. दोन्हीकडे दोन टोक, लांबी, रुंदी आणि जाडी त्या पेनमध्ये आहे. म्हणून स्थळ सापेक्षतेने ती सांत आहे. तिने सांत प्रदेश व्यापलेला आहे. ही पेन अनादी नाही. कुणीतरी बनविली आहे. ही पेन नष्ट केली जाऊ शकतो. तेव्हा ती रहाणार नाही. म्हणून ही काळाच्या अपेक्षेने सांतच आहे. या पेनच्या सांततेचा मला अनुभव आहे. माझ्या बुध्दीनेही पेन सांत आहे हे चांगल्या प्रकारे जाणले आहे. काही वस्तू या पेनपेक्षा मोठ्या असतात. पण त्यांनाही अंत असतो. मी पर्वताकडे पाहतो, त्याचे शिखर मला दिसते. ते शिखर त्या पर्वताचा अंतिम भाग आहे असे मी समजतो. काळाच्या अपेक्षेनेसुद्धा हा पर्वत सांत आहे. कारण केव्हातरी हा बनलेला आहे. तर्कशास्त्रदेखील हा पर्वत केव्हातरी नाश पावेल असेच सांगते. अशा प्रकारे पर्वताची सांतता जाणवते. पेन समोर असते तेव्हा तीची सांतता प्रत्यक्ष होते. पण पर्वतासमोर उभे ठाकले असताना तीच्या लांबी रुंदीचा अंत लागत नाही. त्या वेळी माझ्या मनात ' पर्वत सांत असला तरी त्याची लांबी रुंदी समजून येत नाही.' असा भाव उत्पन्न होतो. मी जर तर्क करू शकलो नसतो तर कदाचित पर्वत अनंत आहे असेच म्हणालो असतो. ती कोणती बाब आहे जी मला पर्वतास अनंत म्हणण्याकरता भाग पाडते? अंत नसणे की अनुभव न होणे? सांत बुद्धी अनंताचा अनुभव न करू शकणे हे स्वाभाविकच आहे. बुद्धी जेवढी लहान असेल तेवढ्याच प्रमाणात ती लहानातील लहान वस्तूच्या अंताचासुध्दा अनुभव करू शकणार नाही. मानव - मस्तिष्कासाठी जसे पर्वत आहेत तसे मुंगीसाठी आमच्या घराची भिंत आहे. हिमालय पर्वताच्या पायथ्याशी उभे राहून त्याच्या लांबी रुंदीचा अंत किंवा शिखराचे टोक पाहू शकत नाही तसे मुंगीही आमच्या घराच्या भिंतीचे टोक पाहू शकत नाही.

यावरून हे सिद्ध होते की, मस्तिष्काची सांतता अनंतत्वास (अनंततेचा भाव) समजून घेण्यासाठी सहायकच ठरते. बाधक ठरत नाही. अनेक निषेधात्मक शब्दांचा आम्ही अशाच प्रकारे प्रयोग करतो. ते यासाठीच बनविले गेले आहेत. समुद्राच्या किनाऱ्यावर उभे राहून दृष्टी फेकली तर आम्हास पाण्याशिवाय दुसरे काहीच दिसत नाही. त्याचा अंत दिसत नाही, म्हणून समुद्र अपार आहे असे म्हणतो. 'अपारतेचा' अनुभव 'पार' न दिसल्यामुळे होतो. आमचे शरीर विशाल आणि दृष्टी तीव्र असती आणि मुंबईच्या बंदरावरून आफ्रिकेचे तट पाहू शकलो असतो तर अरबी समुद्र अपार आहे असे जाणवले नसते. एका किनाऱ्यावर उभे राहून दुसरा किनारा पाहिला जाऊ शकणाऱ्या गंगानदीस अपार म्हणतो काय? नदीचे तट दिसतात पण समुद्राचे दिसत नाहीत. म्हणूनच एकास अपार म्हणतो व दुसऱ्यास म्हणत नाही.

खरे पाहता, मूल जन्मताच त्याच्या मनात वस्तूचा अंत जाणण्याची इच्छा उत्पन्न होते. वस्तूंचा अंत समजणार नाही तोवर त्या वस्तूंना तो अनंतच समजतो. अशा प्रकारे अनंततेचा भाव स्वाभाविकपणे आमच्या हृदयात असतो. सातंता ज्ञानाबरोबर वाढते. म्हणून सांत मस्तिष्क अनंत पदार्थांच्या अनंततेस जाणून घेऊ शकते. पण, अनंत पदार्थांना चांगल्या प्रकारे समजून घेणे कठीणच नसून अशक्यही आहे. कारण जी वस्तू पूर्णपणे समजली जाऊ शकते ती सांतच होते.

अनंत राहत नाही. शेकडो वस्तूंना सांत मस्तिष्काद्वारे अनंत समजले जाते. पण, ज्ञानाच्या वाढीनंतर त्या सांतच आहेत असे समजतो. पण जी वस्तू खरोखरच अनंत आहे, त्या वस्तूची अनंतता ज्ञानाच्या वाढीनंतर अधिकच जाणवू लागते.

सांत मस्तिष्क अनंत पदार्थांच्या अनंततेचा अनुभव करीत असले तरी ईश्वर अनंत आहे हे कसे सिद्ध होऊ शकते? अगोदर अनंत समजल्या जाणाऱ्या वस्तू ज्ञानाच्या वाढीनंतर सांत जाणवल्या. तसेच अल्पज्ञ (जीव) मस्तिष्क अगोदर ईश्वरास अनंत समजतो पण त्याचे ज्ञान वाढल्यावर ईश्वराची सांतता जाणवणार नाही असे कसे म्हणता येईल? केव्हा तरी आम्ही ईश्वराचाही अंत जाणू शकू. हेही अशक्य नाही, असे म्हटले जाऊ शकते.

एवढेच नसून ईश्वराच्या अनंतत्वाच्या विरोधात एक युक्ती दिली जाते. सृष्टी रचनेवरून ईश्वर आहे असे आम्ही जाणतो. सृष्टी सांत आहे. सृष्टी अनंत आहे असे कोणीच म्हणू शकत नाही. म्हणून सृष्टी -रचयितासुद्धा सांतच असला पाहिजे. ज्याची क्रिया सांत आहे तो अनंत कसा होऊ शकतो?

या आक्षेपाचे उत्तर फारच सोपे आहे. सांत सत्ता अनंत क्रियांना उत्पन्न करू शकत नाही. पण, अनंत सत्तेस सांत क्रिया करणे कठीण किंवा अशक्य नाही कारण, सांतता अनंततेत समाविष्ट आहे.

आम्ही आता ईश्वराच्या अनंततेची मीमांसा करू इच्छितो. एखादी बाब स्वीकारण्यासाठी तर्क आणि अनुभव हे दोन्ही आवश्यक आहेत. असे आम्ही वर वर्णन केले आहे. अगोदर अनुभवाचा विचार करा. मनुष्य अल्प आहे असे आम्ही दुसऱ्या अध्यायात दाखवून दिले आहे. सृष्टीचा मुकुटमणी असलेला मनुष्यच अल्प असेल तर इतर प्राण्यांविषयी लिहिण्याची आवश्यकता नाही. आम्हास सृष्टीतील कोणताही पदार्थ पूर्णपणे समजत नाही. त्या वस्तूचा कोणता तरी अंश अज्ञातच राहतो. म्हणून आम्ही आमच्या अनुभवाद्वारे सृष्टीतील प्रत्येक वस्तूत आणि प्रत्येक घटनेत अनंत नियमांचा हात आहे असे म्हणू शकतो. विज्ञान प्रारंभापासून आजपावेतो याच नियमांचे संशोधन करीत आहे. संशेधनाच्या वाढीबरोबर अज्ञात नियमांची संख्याही वाढत आहे. आम्हास एखाद्या विषयाचे जसे-जसे ज्ञान होत जाते तस- तसे ते अधिक गुंतागुंतीचे बनत जाते. कांद्याच्या पाकळीसारखी नियमांची श्रृंखला संपतच नाही. खरोखरच, आकाशाची विशालता जाणू इच्छिणाऱ्या, आकाशात भरारी मारणाऱ्या पक्ष्यासारखी आजच्या वैज्ञानिकांची स्थिती आहे. पक्षी आकाशात जेवढा अधिक उंच जातो तेवढीच आकाशाची आधिक विशालता जाणवू लागते. खरोखरच, ईश्वराची सृष्टी सांत नसून अनंतच आहे. देश आणि काळ या दोन्हीच्या अपेक्षेने. अगोदर काळाच्या संदर्भात विचार करू. या सृष्टीस प्रारंभ (आदी) आहे का? तुम्ही म्हणाल 'अवश्य आहे. कारण, सृष्टीस प्रारंभ आहे' याच आधारावर ईश्वराचे अस्तित्व सिद्ध करण्यात आले होते. आमच्या दृष्टीस दिसणाऱ्या सृष्टीस प्रारंभ (आदी) आहे हे निःसंदिग्ध आहे. पण, सृष्टी स्वरुपाने सादी नसून प्रवाहाने सृष्टी अनादी आहे. असा आमच्या म्हणण्याचा आशय आहे. या सृष्टीच्या

अगोदर कधी तरी सृष्टी होती की नाही? पुढे राहणार की नाही? या सृष्टीच्या अगोदर आणि नंतर सृष्टी राहील असे म्हणाल तर आम्ही त्या सृष्टीच्या पूर्वी आणि नंतर सृष्टी राहणार की नाही असा प्रश्न विचारू. 'सृष्टी राहील' असे उत्तर देतील तर सृष्टी प्रवाह रूपात अनादी आहे असा आमचा जो सिद्धांत आहे तो बरोबर आहे असे सिद्ध होईल. म्हणजेच काळाच्या दृष्टीने या सृष्टीस आदी आणि अंत नाहीत हे दिसून येत आहे. दिवसानंतर रात्र आणि रात्रीनंतर दिवस येत असल्याप्रमाणे जन्म-मृत्यू, उत्पत्ती- विनाश, सृष्टी- प्रलय यांचा प्रवाह सुद्धा चालतच असतो. म्हणूनच संस्कृतमध्ये यास 'संसारचक्र' असे म्हटले आहे. चक्राचा आदी, अंत समजणे कठीण असते, तसे सृष्टीच्या प्रवाहाचे सुद्धा आदी, अंत समजून येत नाहीत.

काही मतानुयायांनी, विशेष करून ख्रिश्चन आणि मुस्लिम, ही बाब स्वीकार न केल्यामुळे त्यांना अनेक अप्रामाणिक तर्कविरुद्ध विषय स्वीकारावे लागले आहेत. ईश्वराने ही सृष्टी शून्यातून उत्पन्न केली आहे असे ते म्हणतात. अभावातून भाव (सत्तात्मक) सृष्टीस उत्पन्न केले आहे असे स्वीकारले तर, या सृष्टीच्या पूर्वी ईश्वर इतर सृष्टीचा कर्ता असला तरी, या आणि पूर्वीच्या सृष्टीत कोणताच संबंध स्थापिला जाऊ शकत नाही.

जर खरोखरच, आता विद्यमान असलेली सृष्टी ईश्वराची पहिलीच रचना असेल तर "या सृष्टीत अनेक दोष आहेत" असा जो आक्षेप नास्तिक घेतात त्याचे उत्तर असे देता येईल की, "दुसऱ्या सृष्टीच्या रचनेत ईश्वर कुठलाही दोष राहू देणार नाही." पण तेव्हा ईश्वर ईश्वर होऊ शकत नाही एवढेच नसून ख्रिश्चन आणि मुस्लिमाद्वारे स्वीकार केला जाणारा ईश्वरही तो होऊ शकणार नाही. जर ही विद्यमान सृष्टी हीच ईश्वराची पहिली रचना असेल तर ईश्वराने विनाकारण ही भानगड का उभारली? स्वतःस या जाळ्यात का अडकवून घेतले? असा आक्षेप घेता येतो. आजपावेतो कधीच सृष्टीची रचना न करणाऱ्या ईश्वराने या सृष्टीची रचना केली? ज्या ईश्वराने सृष्टिरचनेचा कधीच विचार केला नाही त्या ईश्वरात सृष्टिविषयक ज्ञान आणि क्रिया कुठून उत्पन्न झाल्या? की ज्यामुळे तो अचानक सृष्टीची रचना करू लागला. जर अगोदरपासूनच ज्ञान आणि क्रिया असतील तर त्या आजपावेतो रचना का करू शकल्या नाहीत? हा ईश्वराचा स्वभाव आहे असे म्हणता येत नाही. सृष्टीचा प्रवाहरूपाने नित्य उत्पत्ती आणि विनाश झाला असता तर स्वभाव आहे असे म्हणता आले असते. स्वभाव नित्य असतो. तो अकस्मात् उद्भवत नाही. नवीन घटनांना कारण असावेच लागते. नवीन घटनांचे कारण विचारणे हा मानव स्वभाव आहे. पापण्यांची उघडझाप किंवा श्वासोच्छ्वास याबद्दल कोणी प्रश्न विचारीत नाही. कारण, तो माझा स्वभाव आहे. श्वासोच्छ्वास बंद झाला किंवा कमी-अधिक वेगाने चालू लागला तर का? आणि कशासाठी? या प्रश्नांचा भडिमार सुरू होईल. त्याचप्रमाणे ही सृष्टी पहिल्याच वेळी बनविली गेली आहे असे म्हणाल तर का? कशासाठी? असे प्रश्न उद्भवल्याशिवाय राहणार नाहीत.

मुस्लिम आणि ख्रिश्चन आजपावेतो या प्रश्नाचे समर्पक, समाधानकारक उत्तर देऊ शकले नाहीत. हा प्रश्न त्यांच्या बुद्धीतही उद्भवला. का उद्भवणार नाही? तेसुद्धा मनुष्यच आहेत.

त्यांचे आणि आमचे मनोविज्ञान एकच आहे. तेसुद्धा याच सृष्टीत राहतात. पण ते ज्या समाजात वावरतात त्या समाजाची परिस्थिती अशी आहे की, अशा प्रकारचे प्रश्न विचारात घेण्याजोगे सामर्थ्य त्यांच्यात उद्भवले नाही. विचार करण्याची वेळ आली तेव्हा त्यांच्या प्राणावर बेतले. त्यांना आकाशाकडेच पाहावे लागले. काही जण तर अशा प्रकारचा प्रश्न करण्याचा अधिकारच आम्हास नाही असे म्हणतात. ज्या प्रश्नांचे उत्तर देता येत नाही, त्या प्रश्नांचा उद्भवच का होऊ द्यायचा? पण, खरी बाब तर ही आहे की, प्रश्न उत्पन्न होणे, न होणे हे आमच्या आवाक्याबाहेरचे आहे. बुद्धी आहे म्हणजे प्रश्न उद्भवणारच! प्रश्नांच्या उद्भवासाठी सहाय्यक होणारी बुद्धी उत्तरे शोधण्यासाठी सुद्धा सहायता करतेच. कमीत कमी आस्तिकांनी तरी 'ईश्वराने बुद्धीची निर्मिती फसवण्यासाठीच केली आहे' असे समजू नये. कठीण समस्यांना सोडविण्यासाठी मनुष्याजवळ एखादी वस्तू कोणती असेल तर ती बुद्धीच आहे. खाण्या-पिण्याच्या लहान-सहान बाबीपासून मोठमोठ्या पारमार्थिक समस्यांची सोडवणूक बुद्धीच करू शकते. व्यक्ती किंवा समाज यांच्याद्वारे बुद्धीच्या स्वाभाविकपणे प्रश्न करणाऱ्या प्रवृत्तीवर अंकुश लावणे हे मानवजातीच्या विकासात फार मोठी अडचण निर्माण करणेच आहे. उन्नतीपासून विमुख करणेच आहे. अनेकजण अंधविश्वास हा आस्तिकतेचा संरक्षक आहे असे समजतात. म्हणूनच ते त्यांच्या पंथाच्या प्रमुखाविषयी किंवा पंथाविषयी इतर व्यावहारिक विषयात विचार केल्याप्रमाणे विचार करू इच्छित नाहीत. तिथे बुद्धीच्या विकासासाठी अडथळा निर्माण केला जातो. अगोदरच ते त्यांच्या संस्थापकात दैवी शक्तीची कल्पना करतात व त्याचा स्वीकार करतात. म्हणूनच त्यांना कल्पित सिद्धांतावर विश्वास ठेवावा लागतो. उदाहरणादाखल : ख्रिश्चन मताचे प्रवर्तक येशू ख्रिस्त ईश्वराचा आवडता मुलगा आहे, मुस्लिम पंथाचे प्रवर्तक हजरत मुहम्मद ईश्वराचे एक विशिष्ट दूत आहेत. यांच्याद्वारे उत्तर दिले जाऊ शकणारे प्रश्नच विचारले पाहिजेत. इतर प्रश्न विचारणे मर्यादेचे उल्लंघन ठरते. आम्ही एखादे घर वाळूच्या पायावर बांधतो आणि पुन्हा रक्षणासाठी त्या घराला धक्का न लागू देण्याची खबरदारी घेतो. पण वाळूचा पाया किती दिवस टिकेल? केव्हा तरी घर कोसळणारच! अशा प्रकारचा अंधविश्वास नास्तिकतेच्या प्रचाराचे मुख्य कारण आहे. वरील विवेचनात सृष्टी प्रवाहरूपात अनादी, अनंत आहे हे दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. अनादी आणि अनंत यांचा अर्थ एकच आहे. सादी वस्तू अनंत असू शकत नाहीत. एक टोक असलेल्या वस्तूचे दुसरे टोकही असणारच! एक तट असलेली नदी जगामध्ये आहे काय? काळ हा स्वतःच एक नित्य पदार्थ आहे. त्याचा आदी अंत कुठेच नाही तीच वास्तविक पाहता 'नित्यता' Eternity म्हटली जाते.

स्थळ परिमाणाच्या दृष्टीने पाहिले तरी सृष्टी सांत नाही. या सृष्टीरूपी श्रृंखलेत अनेक कड्या आहेत. एकेका कडीस अंत असला तरी श्रृंखला मात्र अंतरहित आहे. मनुष्य सृष्टीचा कितवा भाग जाणू शकतो याचा विचार केला तर मनुष्य किती अल्पज्ञ आहे हे आम्हास कळून येईल. संपूर्ण मानवजातीजवळ असलेले ज्ञान आणि विश्वामध्ये असलेले ज्ञान या दोन्हीची तुलना केली

  

तर पर्वतासमोर मुंगीप्रमाणे सुद्धा नाही. गणितज्ञ मोहरीच्या दाण्याचे आणि हिमालय पर्वताच्या परिमाणाचे प्रमाण (Ratio) काढू शकतील, पण सृष्टीचे परिमाण मात्र जाणू शकत नाहीत. ही सृष्टी कुठे तरी संपली आहे हे आम्ही जाणू शकतो काय? मोठ-मोठ्या वैज्ञानिकांना विचारून पहा! ते काय म्हणतात? विज्ञान, ज्योतिषशास्त्र सृष्टी अनंत आहे हे सिद्ध करीत नाहीत काय?

याविषयी सर ऑलीवर लॉजनी किती सुंदर विवेचन केले आंहे :

एक वैज्ञानिक या नात्याने विश्वातील अतिसूक्ष्म अशा वाळूच्या कणाच्या मूळ कारणाचे ज्ञानसुद्धा आम्हास नाही हे स्वीकार करावे लागते. खडकाचे तुकडे- तुकडे होऊन वाळू तयार होते आणि त्याच वाळूपासून पुन्हा खडक तयार होतात. पण, यामुळे अनंततेचाच शोध लागतो, मूळ कारणाचा शोध लागत नाही. अनंतता मनुष्याच्या ज्ञानाच्या आवाक्याबाहेरची बाब आहे. आम्ही अनंततेपासून कितीही दूर जाण्याचा प्रयत्न केला तरी अवकाशात अनंततेशिवाय दुसरे काय असू शकते?

जी बाब अवकाशाविषयी, स्थळपरिमाणाविषयी आहे तीच काळाविषयी सुद्धा का राहणार नाही? याविषयी किती तरी सांगता येईल? पण, जाऊ द्या. विज्ञान जगाच्या मूळ कारणाविषयी काहीच जाणत नाही हे आम्हास स्वीकारावे लागेल. कोंबडी अगोदर की अंडे? हे त्या गुंतागुंतीच्या समस्येचे साधारण रूप आहे. मातीपासून ही जी पृथ्वी निर्माण झाली, ती एका विशिष्ट काळात प्रारंभ झाली असेल. पृथ्वीच्या इतिहासाची विज्ञानाला थोडी-फार जाणीव आहेच. ही द्रवरूपात केव्हा होती हेही जाणता येईल. चंद्र कशापासून आणि कशा प्रकारे उत्पन्न झाला याचाही अंदाज घेता आला आहे. अशा प्रकारे चंद्र, पृथ्वी वगैरे उत्पन्न झाले आहेत यात मुळीच संदेह नाही. आपले सौरमंडळ उरलेल्या सौरमंडळाप्रमाणे नेबूला (Nebula) चाच एक भाग होते. हे सौर मंडळ सृष्टीचा अतिशय लहानसा भाग आहे. इंद्रियगोचर सृष्टीसमोर हे आहेच काय? आमच्या समोर दररोज किती तरी वस्तू एकमेकाशी घर्षण करीतच असतात. सृष्टीमध्ये वेगवेगळे परिमाण बाळगणाऱ्या परमाणूंचे समूह आहेत. एखाद्या सौरमंडळाचा इतिहास लिहिला जाणे शक्य आहे. त्याचा जन्म आणि मृत्यू जाणून घेणेही शक्य आहे. त्या उत्पत्ती-विनाशामध्ये अब्जावधी वर्षाचे अंतर का असेना! पण हा तर जीवनाचा फारच लहान भाग आहे. अनंतसृष्टीत क्षणमात्र आहे. लहान मूल साबणाच्या बुडबुड्याचा आदी, अंत, जाणू इच्छिते, त्याप्रमाणे इतिहासाची दृष्टी जन्माअगोदरची व मृत्यूच्या नंतरची असणारी स्थिती जाणू इच्छिते. सृष्टीचे हे स्वरूप क्षणिक आहे. पण, ज्यापासून हे बनले आहे ते शाश्वत नित्य आहे.

(मॅन अँड द यूनिव्हर्स : सर ऑलिव्हर लॉज, पृ.२९-३०)

अनंत नियम, अनंत देश आणि अनंत काळ यांच्यासाठी देश व काळाच्या दृष्टीने अनंत असणारा नियन्ता आणि स्वामीसुद्धा अवश्य असला पाहिजे. म्हणून ईश्वर अनंत आहे. सांत असला असता तर तो कधीच सृष्टी बनवू शकला नसता. (W.R.Ing) इंजचे म्हणणे पाहण्याजोगे आहे:

"जगाला बनवणारी आणि नियमामध्ये ठेवणारी शक्ती अनंत असणे आवश्यक आहे. कारण,

सांत जीव जगाविषयी जाणत नाहीत. सृष्टीतील अनेक भाग जीवांना समजू शकत नाहीत. म्हणून सृष्टीसंबंधी जो काही निर्णय घेतला जाईल त्याचा आधार हाच असेल की, सृष्टिकर्ता सृष्टीच्या आतच नव्हे तर बाहेरही आहे. म्हणजेच तो सर्वोपरी आहे."

(डब्ल्यू. आर. इंज : तत्त्वज्ञान आणि धर्म : पृष्ठ १९४)

इंज पुढे म्हणतो : 'सृष्टीमध्ये ईश्वराची बुद्धी आणि स्वभावाची छाया दिसून येत आहे. सृष्टीचा, रचयिता नित्य असल्यामुळे सृष्टीसुद्धा नित्य आहे. तो अनंत आहे म्हणून सृष्टी अनंत आहे. रचयिता एकरस असल्यामुळे सृष्टी नियमित आहे. कर्ता बुद्धिमान आहे म्हणून सृष्टीसुद्धा बुद्धिसंपन्न - ज्ञानपूर्ण रचना आहे.

The World reflects in an imperfect medium, the mind and nature of its creator. It is perpetual, as its creater is eternal. It is boundless as its createor is infinite. It is regular, as its creator is changeless. It is rational, as its creator is all-wise.

पृ.१४८

वेदामध्ये ईश्वराच्या अनंतत्वाविषयी अनेक उत्कृष्ट प्रमाण आहेत. उदाहरणादाखल :

"यो भूतञ्च भव्यञ्च सर्वं यश्चाधितिष्ठति"

(अथर्व. १०.२३.४.१)

म्हणजे ईश्वर भूत, भविष्य, वर्तमान काळाच्या कक्षेत येणारा नाही. (He trandcents time)

सहस्रशीर्षा पुरुषः सहस्राक्षः सहस्रपात ।
स भूमिं सर्वतः स्पृष्ट्वाऽत्यतिष्ठद्दशाङ्गुलम् ॥

ईश्वर अनंत बुद्धी (ज्ञान), अनंत नेत्र (दर्शनशक्ती) अनंत पाय (क्रियाशक्ती) बाळगणारा आहे. तो सृष्टीस चोहीकडून व्यापूनही सृष्टीच्या कक्षेच्या बाहेर आहे.

डीन इंज म्हणतो की, ईश्वर सृष्टीमध्ये नाही. तो वर किंवा पलीकडे आहे. (The Creator of the Uriverse Lives his own life not in it but above it.) पण, वेद म्हणतात की, तो सृष्टीच्या बाहेर आणि आत सर्व ठिकाणी आहे. सृष्टीमध्ये राहतो म्हणूनच त्यास 'पुरुष' नावाने संबोधित करण्यात आले आहे. (पुरी ब्रह्मांडे शेते इति पुरुषः). ईश्वरापेक्षा भिन्न असलेली आणि जिच्यावर ईश्वराची छाया पडते अशी सृष्टी वेदाच्या दृष्टीत स्वीकार्य नाही. सृष्टी ईश्वराने व्यापलेली आहे. (Imperfect Medium of Reflection).

आणखी एका ठिकाणी अनंततेचे दुसऱ्या रूपात वर्णन केले आहे.

एतावानस्य महिमाऽतो ज्यायांश्च पूरुषः ।
पादोऽस्य विश्वा भूतानि त्रिपादस्यामृतं दिवि ॥

'एवढी त्याची महिमा आहे. पण ईश्वर त्यापेक्षा मोठा आहे. संपूर्ण सृष्टी त्या अनंत परमेश्वराच्या एक चतुर्थांश आहे. तीन भाग आनंदमय अमृतरूप आहे, जो सृष्टीच्या पलीकडे आहे. सृष्टी बनलेली वस्तू आहे. नित्य नाही. म्हणून या सृष्टीत ईश्वराचे अमरत्व- अमृतत्व कसे

 

दिसून येईल? सृष्टीस पाहून त्याचे मोजमाप करू पाहणारे चूक करीत आहेत. महर्षी दयानंदांनी 'ऋग्वेदादि भाष्यभूमिके'मध्ये अर्थ करताना लिहिले आहे की,

'अस्य पुरुषस्य भूतभविष्यद्वर्तमानस्थो यावान् संसारोऽस्ति तावान् महिमा वेदितव्यः । एतावानस्य महिमास्ति चेत् तर्हि तस्य महिम्नः परिच्छेद इयत्ता जातेति गम्यते। अत्र ब्रूते नैतावान् मात्र एव महिमेति । किं तर्हि? अतोऽप्यधिकतमो महिमानन्तस्यास्तीति गम्यते। अत्राह (पादोऽस्य) अस्यानन्तसामर्थ्यस्येश्वरस्य (विश्वा) विश्वानि प्रकृत्यादिपृथ्वीपर्यन्तानि सर्वाणि भूतान्येकः पादोऽस्ति, एकस्मिन्देशांशे सर्व विश्वं वर्तते। (त्रिपादस्या) अस्य दिविद्योतनात्मके स्वस्वरूपेऽमृतं मोक्षसुखमस्ति ॥

"ईश्वराचे अमृत स्वरूप केवळ सांत सृष्टीस पाहिल्यामुळेच समजू शकत नाही. ईश्वराची अनंतता त्याच्या अमृतत्वामध्ये आहे. अमृतत्व हेच खरे पाहता अनंतत्व आहे. कारण, त्याच्या विरुद्ध मृतत्व हेच सांततेचे द्योतक आहे."

ईश्वर अनंत आहे असे मानण्याची काय आवश्यकता? सांत ईश्वराने आमचा उद्देश पूर्ण होत नाही काय? ईश्वर एका ठिकाणी काही काळ राहतो असे म्हटले तर कोणती हानी होणार आहे? आस्तिक असा विचार करीत नाहीत काय? ख्रिश्चनांच्या ग्रंथात ईश्वर चौथ्या आकाशात आहे असा उल्लेख आढळतो. मुस्लिमांच्या ग्रंथात आकाशांची संख्या वाढवून सातव्या आकाशात नेऊन ठेवण्यात आली आहे. हिंदूंच्या पुराणात विष्णूसाठी विष्णुलोक व क्षीरसागर वगैरे विशिष्ट शयनस्थाने आहेत. अशाच प्रकारे वेगवेगळ्या पंथांच्या ग्रंथांत वेगवेगळी ठिकाणे ईश्वरासाठी कल्पिलेली आहेत.

वर वर्णन केल्याप्रमाणे ईश्वरास विशिष्ट स्थान असेल तर ईश्वराच्या अनंततेचे खंडन होते. पण, आमच्या म्हणण्याचा अभिप्राय पंथांच्या कल्पनेला वास्तविकतेशी काहीही घेणे-देणे नाही हेच दाखवणे आहे. पंथांमध्ये ईश्वरविषयक विभिन्न कल्पना कशा प्रविष्ट झाल्या ही एक विचित्र बाब आहे. इथे वर्णन करणे अप्रासंगिक होईल. ज्या पंथाच्या ग्रंथात मनुष्यासाठी मनोरंजक व चित्ताकर्षक ईश्वराची मंदिरे तयार करण्यात आली आहेत, त्याच ग्रंथात ईश्वराच्या अनंतत्वाचे वर्णन केले आहे, असे आम्ही प्रथम सांगू इच्छितो. म्हणजेच सर्व पंथांमध्ये ईश्वराच्या अनंततेविषयी सारखेच वर्णन आढळून येते. पण, याबरोबरच सर्व पंथांमध्ये ईश्वरासाठी विशिष्ट स्थानसुद्धा कल्पिलेले आहेत. हे परस्पर-विरुद्ध आहे. हा दोष दूर सारण्याची जबाबदारी त्या त्या पंथांच्या अनुयायांवर आहे. आणखी एक वैशिष्ट्य असे आहे की, हे पंथानुयायी स्वतः या स्थानांना स्थानविशेष न मानता अलंकार सिद्ध करण्याचा प्रयत्न करतात. आज सुशिक्षित ख्रिश्चन किंवा मुस्लिम ईश्वर त्या आकाशामध्ये आहे असे म्हणण्याचे साहस बाळगीत नाहीत. बुद्धी बाळगणारा पौराणिक (पुराणपंथी) विष्णू माशाप्रमाणे एका समुद्रात पोहत असल्याचा विश्वास बाळगीत नाही.

या पंथांनी ईश्वरास अनंत मानले नाही तर होणारी हानी तरी कोणती आहे? अनंत सृष्टीस रचण्यासाठी अनंत ईश्वर आवश्यक आहे हे वर वर्णन केलेच आहे. ईश्वर एका विशिष्ट स्थानी

आहे अशी कल्पना केली तरी त्यानंतर काय आहे? शून्य आहे काय? शून्य म्हणजे तरी काय? ती एक विशिष्ट वस्तू आहे का? असेल तर ते शून्य कसे आहे? सर्वांचा अभाव हेच शून्य आहे काय? तो अभाव कसा टिकू शकतो? हा विषय मानवी मस्तिष्काच्या अवाक्याबाहेरचा आहे. ईश्वराचे उत्पन्न होणेही समजून येत नाही. जर ईश्वर उत्पन्न झाला असेल तर कशातून उत्पन्न झाला? कसा उत्पन्न झाला? जर ईश्वराचा निर्माता कुणी असेल तर त्याचा निर्माता कोण? आणि अशा प्रकारे प्रश्नांचा अंत कधीच होणार नाही. ईश्वर जर स्वतः उत्पन्न झाला असेल तर इतर वस्तू स्वतःच का उत्पन्न होत नाहीत? ज्या ईश्वरास स्वतः उत्पन्न व्हावे लागते तो कधीच दुसऱ्या वस्तूंना उत्पन्न करू शकत नाही.

खरे पाहता ईश्वर काही वस्तूंच्या मिश्रणामुळे बनलेला नाही. म्हणून त्याचे बनणे सिद्ध होऊ शकत नाही. जी वस्तू बनलेली नाही ती काळाच्या अपेक्षेने अनंतच असेल, यात मुळीच संदेह नाही. म्हणून ईश्वर सर्व दृष्टीने अनंत आहे हे सिद्ध होते.

काही जणांचा आक्षेप दुसऱ्या प्रकारचा आहे. ईश्वर हा सर्वव्यापक, सर्वान्तर्यामी, सर्वज्ञ आहे असे आम्ही म्हणतो. म्हणून तो अनंत होऊ शकत नाही. कारण, सर्व शब्द हा सांततेचा बोधक आहे. सर्व मनुष्य, सर्व वस्तू, सर्व साधने या ठिकाणी प्रयुक्त सर्व शब्द हा सांततेचा वाचक आहे म्हणून ईश्वर हा सर्वव्यापक आहे तरी म्हणा किंवा तो अनंत आहे असे तरी म्हणा. दोन्ही प्रयोग एकत्रच करणे कसे शक्य आहे? हे दोन्ही परस्पर विरुद्ध आहेत ना! 'अंत' किंवा 'सीमेचे' ज्ञान होईपर्यंत आम्ही सर्व शब्दाचा प्रयोग करू शकणार नाही.

आमच्या मते हा आक्षेप समजला जातो तेवढा सारगर्भित नाही. इथे 'काकदंत' परीक्षाच करण्यात आली आहे. 'सर्व' शब्दामुळे 'सीमा' किंवा 'अंत' समजून येतो यात मुळीच संदेह नाही. पण, केवळ सर्व शब्दाच्या प्रयोगामुळे अनंतत्वाचे खंडन होत नाही. मी ईश्वरासाठी तीन शब्दांचा वापर करतो. अनंतज्ञ, सर्वज्ञ, हृदयज्ञ. म्हणजे ईश्वरास अनंत वस्तूंचे ज्ञान आहे. सर्व वस्तूंचे ज्ञान आहे. माझ्या हृदयाचे ज्ञान आहे. या तीन वाक्यांत नंतरचे वाक्य सीमीत विचारांचे बोधक आहे असे दिसून येईल. पण, या वाक्यात परस्पर विरोध किंवा एकमेकांचे खंडन नाही. कारण, अनंत असलेला ईश्वर मनुष्याच्या विचारानुसार सर्व शब्दाद्वारे व्यक्त केल्या जाणाऱ्या पदार्थामध्येसुद्धा आहे, तसेच माझ्या हृदयामध्येही आहे. संपूर्ण पुस्तक जाणणारा एका पृष्ठावर जे लिहिले आहे तेही जाणतो. अनंत ज्ञान बाळगणारा सर्व ज्ञान बाळगत असेल तर त्यात आश्चर्य ते कसले? सर्व हे सांततेचे बोधक आहे म्हणून सांत अनंतामध्ये समाविष्टच असते. विरुद्ध कसे होऊ शकते? म्हणून ईश्वर हा सर्व, अनंत शब्दाद्वारे जाणला जाऊ शकतो यात मुळीच संदेह नाही.

काहीजण असा आक्षेप करतील की, जर तुम्हास अनंताचे ज्ञान असेल तर ती अनंतता सीमित झाल्यामुळे अनंतताच राहाणार नाही. म्हणजे आमची बुद्धी परिमित असल्यामुळे त्या बुद्धीत समाविष्ट होणारे सर्व काही परिमितच, सीमितच असेल, आणि जर अनंततेचे ज्ञान नसेल तर

अनंततेचे अस्तित्वच असू शकत नाही. आम्हास ज्ञात नसलेल्या विषयाबाबतीत आम्ही सांगू तरी काय शकतो? अशा प्रकारे दोन्ही तऱ्हेने अनंततेचे खंडन होते म्हणून आम्ही ईश्वरास अनंत म्हणू शकत नाही.

पूर्वीच्या आक्षेपाप्रमाणे हा आक्षेपही निराधार आहे. मानवीय विचारांचे चांगल्या प्रकारे परीक्षण न करणे, हेच या आक्षेपाचे मूळ कारण आहे. खरे पाहता, आम्हास अनंततेचे ज्ञान आहे पण पूर्ण ज्ञान नाही. ही गोष्ट अनंत वस्तूविषयी खरी असल्याप्रमाणे सांत वस्तूविषयी खरी आहे. माझ्या हातात असलेली लेखणी सांत-परिमित आहे पण, लेखणीचे मला पूर्ण ज्ञान आहे काय? उच्च कोटीच्या विद्वानांनासुध्दा या लेखणीच्या संबंधात बरीच माहिती नसेल. मनुष्यास सांत वस्तूचेच पूर्ण ज्ञान होणे शक्य नसताना अनंत वस्तूचे पूर्ण ज्ञान होणे कसे शक्य आहे? खरोखरच अनंततेच्या ज्ञानाचे विश्लेषण केले तर त्यात दोन बाबी आहेत असे आढळून येईल. एक , एखाद्या वस्तूविषयी थोडे ज्ञान असल्याचा भाव आणि दुसरे अधिक ज्ञान नसल्याचा भाव. आंधळयास काहीच दिसत नसले तरी तो पाहू शकत नाही म्हणून काहीच नाही असे म्हणत नाही? असे झाले असते तर आंधळयास स्वतःच्या आंधळेपणाची जाणीव झाली नसती. पण असे नाही. तो दररोज स्वतःच्या आंधळेपणाचा अनुभव करतो आणि दुःखी होतो. मी तुझे आंधळेपण दूर करीन असे कोणी म्हटले तर त्यास आनंद होतो. अशीच स्थिती कमी दृष्टी बाळगणाऱ्यांची आहे. म्हणून आमचे मस्तिष्क सांत असल्यामुळे आम्हास अनंततेचे ज्ञान होऊच शकत नाही असे म्हणणे बरोबर ठरणार नाही.

ईश्वरासाठी अनंत शब्दाचाच उपयोग होत नसून अजन्मा, अनादी, अनुपम, अजर, अमर वगैरे शब्दांचाही वापर होतो. हे सर्व शब्द अनंत शब्दाचे रूपांतरित प्रयोग आहेत. या रूपांमध्येही अनंत शब्दाचीच अभिव्यक्ती आहे. जरा-जन्म-मृत्यू हे सर्व सांततेचे द्योतक आहेत. अनंततेचे बाधक आहेत. म्हणून अजर, अमर शब्द अनंततेचे समानार्थक असून अनंततेच्या जाणीवेसाठीच वापरले जातात.

अनंततेविषयी आणखी दोन प्रश्न शिल्लक आहेत, ज्यांचे वर्णन इथे करणे योग्यच ठरेल. वाचकांना या अध्यायाच्या वाचनामध्ये विशेष आनंद वाटणार नसला तरी आस्तिकतेचा अनंतत्वाशी एवढा घनिष्ठ संबंध आहे की, त्याची मीमांसा करणे अत्यावश्यक आहे.

पहिला प्रश्न हा आहे की, ईश्वर सांत असो की अनंत असो. आपल्या व्यावहारिक जीवनात या अनंततेचा उपयोग तरी काय आहे? अनंततेची मीमांसा करण्याची उठाठेव कशासाठी? ईश्वरास सांत मानले तर काय हानी आहे? मुळात ही भानगडच सोडून दिली तर काय होणार आहे?

आमच्या हृदयावर अनंततेचा प्रभाव सांततेपेक्षा कितीतरी पटीने अधिक पडतो. आस्तिकता आपल्या इच्छेनुसार ग्रहण करण्याची किंवा सोडून देण्याची बाब नाही. या आस्तिकतेचा संबंध मानवी मस्तिष्काशी आहे. यामुळे जीवनात होणारे परिवर्तनही विपुल आहे. आस्तिक आणि

नास्तिक यांचे जीवन एकसारखे असू शकत नाही. मॅडम ब्लेवेट्स्कीने केलेले विवेचन अगदी यथार्थ आहे. "ईश्वर नाही! जीवही नाही! ओहो! किती भयंकर विनाशकारी कल्पना! उन्मत्त, प्रमादी नास्तिकाची मनश्चक्षूसमोरील प्रकृतीच्या ठिणग्यांच्या अपरिमित शृंखलेची अशी कुरूप कल्पना, जिची उत्पत्ती शून्यातून झाली आहे, आपोआपच झाली आहे, स्वतःच स्थित आहे आणि स्वतःच विकसित होत आहे. आणि हे 'स्वतः' सुद्धा काहीच नाही. ही एक शक्ती नाही. पुरुषही नाही. प्रवाहित होत आहे पण कोठूनही नाही. याचे कोंणतेच कारण नाही. कारण, त्याचा पूर्णपणे अभाव आहे. हे अनंतचक्र आहे. आंधळे, निष्क्रिय आणि अकारण."

No God, No Soul? Dreadful, annihilating. The maddening nightmare of a lunatic atheist, and presenting before his fevered vision, a hideous, ceseless procession of sparks of cosmic matter created by no one, self appearing, self-existant and self developing; this self no self, for it is nothing and nobody, floating onward from nowhence. It is propelled by no cause for there is none, and it rushes nowhither. And this in a circle of eternity blind, inert, and causeless.

(Isis Unveiled Vol. I. P.24)

नास्तिकेच्या विषारी प्रभावातून मनुष्य तेव्हाच वाचू शकतो जेव्हा तो परमेश्वराच्या अनंततेचा विचार करतो. अनंततेचा भाव हृदयामध्ये श्रद्धा उत्पन्न करतो. मनुष्यास उदार बनवतो. अधःपतनापासून वाचवतो. अनंत ईश्वराच्या अनंत सृष्टीकडे एकदा डोळे उघडून पाहताच मनुष्याच्या हृदयात अवर्णनीय असा प्रभाव पडतो. त्याचे वर्णन वाणी आणि लेखणी दोन्हीही करू शकत नाहीत. मनुष्याचे परिमित नेत्र सृष्टीचा सीमित भाग जरी पाहू शकत असले तरी, विशाल सृष्टीमध्ये स्वेच्छेने विचरण करण्याची मोकळीक नेत्रांना दिली तरी एक सीमित वृत्तच बनतात. तरी पण डोळयांमध्ये अनंत सूर्यप्रकाशात विचरण करण्याची आंतरिक इच्छा आहे, जिचा अनुभव प्रत्येक मनुष्य करीत असतो. या आंतरिक इच्छेचा उपयोग साधारणपणे समजून येत नसला तरी उद्देश हा आहेच. उपयोग, प्रयोजन नसते तर इच्छा तरी का झाली असती? इच्छा होणे हेच सूचित करीत आहे की, ही इच्छा आणि या इच्छेची पूर्ती डोळयांसाठी अवश्य लाभदायक आहे. एखाद्या खोलीत विपुल प्रकाशामध्ये पुस्तक वाचा. खोलीच्या बाहेर येऊन अनंत प्रकाशात याल तेव्हा एक अपूर्व आनंद होईल. नेहमी बंद खोलीत काम करणाऱ्यांना विपुल प्रकाश मिळत असला तरी त्यांच्या डोळयात बिघाड उत्पन्न होतो. त्याचे कारण हेच आहे की, आपल्या अल्पतेचा विश्वाच्या अनंततेशी संबंध स्थापित करून आनंद अनुभव करण्याची डोळयांची गरज अपूर्ण राहून जाते. जीवाची स्थितीसुद्धा अशीच आहे. जीव अल्प आहे, त्याचे मस्तिष्कही अल्प आहे. त्याच्या अंतःकरणाची दृष्टीही अल्प आहे. त्याच्या अंतःकरणाची दृष्टीही अल्प आहे. पण, या सर्व उणीवा असल्या तरी विश्वाच्या अनंततेशी संबंध जोडण्यामुळे होणारा आनंद इतर वस्तूंच्या सानिध्याने होऊच शकत नाही. ऋग्वेदात एक मंत्र आहे:-

तद्विष्णोः परमं पदं सदा पश्यन्ति सूरयः ।
दिवीव चक्षुराततम् ।।

(सूरयः) बुद्धिमान व्यक्ती (विष्णोः) अनंत परमेश्वराच्या (तत् परमं पदम्) त्या परम पदाकडे (आततम्) उघडे (चक्षुः) नेत्र (दिवि) सूर्यास ज्याप्रमाणे पाहते, त्याप्रमाणे पाहतात.

जीवेश्वराच्या संबंधात दर्शविण्यासाठी नेत्र आणि सूर्य यांच्या संबंधापेक्षा उत्तम असे दुसरे कोणतेच उदाहरण नाही. सूर्यप्रकाशाचा सुखदायक अनुभव आततम् चक्षुः - उघडे डोळेच करू शकतात. जे डोळे विकारग्रस्त आहेत त्यांना निश्चितच त्या सुखाचा अनुभव होणार नाही. त्याचप्रमाणे सुविकसित हृदय अनंत ईश्वराच्या संबंधाद्वारे जे आनंद मिळवू शकते ते अविकसित हृदय मिळवू शकत नाही. अल्पजीवाचा अनंत ब्रह्माशी संबंध हाच विकास आहे आणि याच अनंततेच्या पूर्ण अनुभवासच वैदिक साहित्यात मुक्ती असे संबोधिले आहे. पण, पूर्ण विकास एकदाच होऊ शकत नाही. श्रीमंतांना आपली तिजोरी भरण्यासाठी एक-एक पैसा जमवावा लागतो. अशाच प्रकारे पूर्ण विकासापूर्वी लहान-लहान विकासाच्या टप्प्यातून वाटचाल करावी लागते. हे टप्पे जीवाच्या उन्नतीच्या पायऱ्या आहेत. यामध्ये तो त्या अनंतत्वाचा अनुभव घेऊ लागतो. अभ्यासाची वाढ जशी वर्गा-वर्गाने क्रमपूर्वक होते तसेच ईश्वराची भूकही वाढत जाते. एकदा अनंत सृष्टीच्या अनंतेत विहार केल्याने अशी प्रफुल्लता जाणवते की, मग तो सीमित परिघामध्ये राहू इच्छीत नाही. ज्या पक्ष्याला अनंत आकाशात विहार करण्याची सवय झाली आहे, तो पिंजऱ्यात राहण्याची इच्छा का बरे बाळगील? पिंजरा सोडून आकाशात उडणे हीच विकासाची सुरुवात आहे आणि क्षुद्र पिंजऱ्याच्या तुलनेत विकसित आकाशाशी अतूट प्रेम होणे हाच विकासाचा अंत आहे. याचा अर्थ हा नाही की, पक्ष्याला संपूर्ण आकाशाची आवश्यकता आहे. एका दृष्टीने आवश्यकतासुद्धा आहे. जर उडणे हेच पक्ष्याच्या जीवनाचा उद्देश असेल तर त्यास उडण्यासाठी लागणारे आकाशच पुरेसे होईल. पण उडणे हे दुसऱ्या एका उद्देशाचे साधन मात्र आहे. ते केवळ त्याच्या विकासाची एक पायरी आहे. पक्ष्याच्या अल्पतेचा आकाशाच्या अनंततेशी संबंध होणे हाही उडण्याचा एक उद्देश आहे. या संबंधासाठी सीमित आकाश पुरेसे होत नाही. यासाठी अनंत आकाशच पाहिजे.

मनुष्यासाठी पाण्याची आवश्यकता आहे असे म्हणतात. पण किती पाणी? एक पेला किंवा दोन पेले. तेवढ्यानेच त्याची तृप्ती होऊ शकते. पण समुद्राच्या किनाऱ्यावर उभे राहून त्या अपार जलराशीस पाहून मानवास विशेष आनंद का होत आहे? सबंध समुद्र तो पिणार आहे काय? त्यास त्याची आवश्यकता आहे काय? आवश्यकता आहे. पण, शारीरिक आवश्यकतेच्या पूर्तीसाठी नव्हे. अनंततेशी संबंध जोडण्यासाठी, आंतरिक अल्पत्व कमी करण्यासाठी, स्वतःचे हृदय विशाल बनविण्यासाठी आवश्यकता आहे. प्लेटो (Plato)ना विचारा. ते काय म्हणतात :

"सर्व अल्प सत्तांच्या पलीकडे, सर्व गौण कारणांच्या, नियमांच्या, विचारांच्या आणि सिद्धांतांच्या पलीकडे एक बुद्धी - ज्ञान (आत्मा) आहे, जो सर्व नियमांचा आदी कारण आहे.

तो इतर सर्व विचारांचा आधार असलेला सर्वश्रेष्ठ विचार आहे. तोच सृष्टीचा राजा किंवा नियंता आहे. सर्व पदार्थ आपले स्वत्व व तत्त्व त्याच आदि मूळ सत्तेपासून प्राप्त करीत आहेत. संपूर्ण सृष्टीत व्यापक असलेल्या सौंदर्य, संगठन, उत्तमता या सर्वांचे तो मूळ कारण आहे. या सत्तेसच श्रेष्ठता व सर्वोपरिता यांमुळे परम उत्तमता किंवा ईश्वर म्हणतात. तोच सर्वांचा अधिष्ठाता आहे.

Beyond all finite existances and secondary causes, all laws, ideas and principles there is an intelligence mind (nous the spirit), the first principle of all princples, the supreme idea on which all other ideas are grounded; the monarch and the law giver of the Universe, the Ultimate substance from which all things derive there being and essence, the first and efficient cause of all the order and harmony and beauty of excellency, and goodness, which pervades the Universe - who is called by way of preeminence and excellence, the supreme Good, the God (O theos), the God over all, ("O epipantim theos")

(Isis Unveiled P.18)

हाच भाव उपनिषदाच्या खालील श्लोकात व्यक्त करण्यात आला आहे.

नित्योऽनित्यानां चेतनश्चेतनानामेको बहूनां यो विदधाति कामान्!:

(कठोपनिषद २.५.१)

दुसरा प्रश्न असा आहे की, ज्ञानोन्नतीमुळे अनंततेच्या भावनेत कोणते परिवर्तन होते?

अल्प जीव आपल्या अल्पतेच्या आणि ईश्वराच्या अनंततेच्या भावाविषयी साधारणपणे जाणीव बाळगून असतो. पण ब्रह्माचा अनंततेचा जो भाव ज्ञानी समजतो तो अज्ञानी जीव समजू शकत नाही. विहिरीतील बेडूक 'अनंतता' म्हणजे विहिरीपेक्षा एखादी मोठी वस्तू एवढेच समजतो. यापेक्षा अधिक तो काहीच समजू शकत नाही. पण त्याच बेडकास एखाद्या मोठ्या तलावात सोडले तर त्याच्या अनंततेच्या ज्ञानात परिवर्तन होते. तो 'अनंतता' ही विहिरीपेक्षा मोठी बाब आहे असे समजतो. मनुष्याची सुद्धा हीच स्थिती आहे. एखादा आदिवासी आणि ज्ञानी आपल्या हृदयात ईश्वराच्या अनंतत्वाचा भाव बाळगतात. पण 'न्यूटन'च्या हृदयात असलेला अनंतत्वाचा भाव एका अफ्रिकन नीग्रोच्या हृदयात असू शकत नाही. एक ज्योतिषी तारांगणाच्या परिमाणाचा हिशोब करून ब्रह्माच्या बृहत्वाशी तुलना करून पाहतो तेव्हा त्याच्या हृदयामध्ये अनंतता विलक्षण स्वरूपात व्यक्त होते. ईश्वराच्या अनंतत्वामुळे प्रभावित व्हायचेच असेल तर स्वतःची उन्नती आवश्यक आहे. उन्नतीच्या प्रमाणात आपले क्षितिजवृत्त सुध्दा विशाल होत जाते. अशाच प्रकारे सृष्टीविषयक ज्ञानाच्या वाढीबरोबर ईश्वराच्या अनंततेचे ज्ञान सुद्धा वाढत जाते.

आम्ही विचार केला तर असे दिसून येईल की, सृष्टीच्या आरंभी जे गुण ईश्वरात स्वीकारले गेले आहेत तेच आजसुद्धा स्वीकारले जात आहेत. असभ्य जातीत जे गुण आहेत तेच गुण आज सभ्य जमातीत विकसित झाले आहेत. ईश्वर हा दयाळू, पालक, अनंत आहे असे सर्वजण

स्वीकारतात. पण या गुणांच्या बाबतीत सभ्य जातीं जेवढे परिष्कृत ज्ञान होते तेवढे असभ्य जमातीत होत नाही. निर्मित वस्तूविषयी जो अधिक योग्य रीतीने विचार करतो त्यासच निर्मात्याच्या निर्मितीचे ज्ञान अधिक होते. एक मुलगा घड्याळ पाहून त्याची रचना करणारा कोणी तरी आहे असे समजतो. पण एक मनुष्य त्या घड्याळीच्या सर्व सुट्या भागांना वेगवेगळे काढतो व त्यांच्या निर्मितीसाठी आवश्यक कारणांचे ज्ञान जेव्हा त्यास होते तेव्हा घड्याळ बनविणाऱ्याच्या बुद्धीचे वैशिष्ट्य त्याच्या लक्षात येते.अशाच प्रकारे सृष्टीतील विविध वस्तूंना वेगवेगळया रूपात जाणणारा त्यांचा निर्माता जो ईश्वर आहे, त्याच्या अनंतत्व वगैरे गुणांना जसा ओळखू शकतो, तसे सामान्य बुद्धीची माणसे कशी ओळखू शकणार? म्हणून अनंतत्व विकसित अंतःकरणाद्वारे अनुभवली जाणारी, विकासाच्या सर्वोच्च शिखराकडे नेणारी महत्त्वपूर्ण बाब आहे हे समजून घेणे अतिशय आवश्यक आहे.

□□□

# अध्याय : नववा

## कर्म आणि फळ

'करावे तसे भरावे' अशी एक व्यापक म्हण आहे. या म्हणीची समानार्थक म्हण प्रत्येक देशात, प्रत्येक युगात आढळून येते. आस्तिक असो की नास्तिक अध्यात्मवादी असो की भौतिकवादी, धार्मिक असो की अधार्मिक, शिक्षित असो की अशिक्षित, जगामध्ये असा कोणताच मनुष्य नाही, जो कर्म आणि त्याच्या फळाचा स्वीकार करीत नसेल. संत तुलसीदास म्हणतातः-

कर्म प्रधान विश्व करि राखा ।
जो जस करे सो तस फल चाखा ॥

म्हणून जगात सर्वमान्य सिद्धांत कोणता असेल तर तो 'कर्मफलवाद' आहे. 'जसे करशील तसे भरशील' "As you sow so you will reap" या म्हणीच्या सत्यतेच्या विरुद्ध कोणीच नाही.

या अध्यायात या सिद्धांताचा आस्तिकतेशी कोणता संबंध आहे ते पाहावयाचे आहे.

अगोदर कर्म व त्याच्या फळाची मीमांसा करणे आवश्यक आहे. त्यानंतर त्याच्या परिणामांचा विचार करता येईल.

मनुष्य चोरी करतो आणि राजाकडून त्याला दोन वर्षांची (कैद) शिक्षा ठोठावली जाते. चोरी हे कर्म आहे आणि कैद हे फळ आहे असे लोक समजतात. प्रश्न हा आहे की, चोरी कर्मश्रेणीत व कैद फळश्रेणीत समाविष्ट करणारी बाब कोणती आहे? अशाच प्रकारे एक मनुष्य एक महिना नोकरी करतो. महिन्याच्या शेवटी मालक त्यास पगार देतो. नोकरी हे कर्म आहे, वेतन हे फळ आहे असे लोकांचे म्हणणे आहे. इथेसुद्धा वरील प्रश्न उद्भवतो. कर्म आणि त्याचे फळ हा विषय फारच गुंतागुंतीचा आहे. याविषयी अनेकांची अनेक मते आहेत म्हणूनच गीतेत :

'किं कर्म किमकर्मेति कवयोप्यत्र मोहिताः । ४-१६

कर्म, अकर्म या विषयात विद्वानांना सुद्धा भ्रम झाला आहे, असे म्हटले आहे.

अगोदर कर्म शब्दाचा अर्थ काय आहे हे पाहिले पाहिजे. साधारणपणे कर्म 'कृ' धातूपासून बनला आहे. याचा अर्थ आहे क्रिया.

कणाद मुनींनी वैशेषिक शास्त्रात कर्माचे लक्षण खालीलप्रमाणे केले आहे.

''एकद्रव्यमगुणं संयोगविभागेष्वनपेक्षकारणमिति कर्म लक्षणम्'' (१.१.१७)

गुणापेक्षा वेगळे असलेले, एका द्रव्यात आश्रित असलेले संयोगविभागात स्वतंत्र कारण असलेले 'कर्म' आहे.

तर्कदीपिकेत अन्नंभट्टांनी कर्माचे खालील लक्षण (व्याख्या) केले आहे.

'संयोगभिन्नत्वे सति संयोग समवायि कारणं कर्म ।

'संयोगापेक्षा वेगळे पण संयोगाचे समवायिकारण असलेले 'कर्म' आहे.

  

अशा प्रकारे पाच कर्मांची गणना केली आहे, "उत्क्षेपणावक्षेपणाकुञ्चनप्रसारणगमनमिती पञ्च कर्माणि" '(उत्क्षेपण) वर जाणे, (अवक्षेपण) खाली येणे, (आकुंचन) संकुचित होणे, (प्रसारण) पसरणे व (गमन) चालणे.'

या लक्षण आणि प्रकारांद्वारे हे दिसून येते की, प्रत्येक गतीचे नाव कर्म आहे. वारा वाहणे, पृथ्वीचे आकर्षण करणे, अग्निज्वालांचे ऊर्ध्वगमन, झाडावरून आंबा पडणे, मुंगीचे पळणे, नेत्राच्या निमेषोन्मेषादि क्रिया हे सर्व कर्म आहेत. पण, जेव्हा आम्ही 'कर्म' व 'फळा'ची मीमांसा करतो तेव्हा कर्माचा हा अर्थ घेत नाही. इथे योगरूढ अर्थामध्ये कर्माचा विचार करावा लागतो. या अर्थामध्ये प्रत्येक क्रिया किंवा गतीचे नाव कर्म नाही. वस्तुतः कर्म ही शारीरिक, मानसिक, वाचिक क्रिया आहे. या क्रियेसाठी कर्ता जबाबदार असतो व अनुषंगाने सुख किंवा दुःखरूपी फळ भोगतो.

वर कर्माची दोन उदाहरणे दिली आहेत. एक चोरीचे, दुसरे नौकरीचे. या दोन्हीत कर्ता आपापल्या कर्मासाठी जबाबदार आहे. कैद आणि वेतन प्राप्तीसुद्धा क्रियाच आहेत पण त्यांची गणना कर्मकोटीमध्ये केली जाऊ शकत नाही. कारण कर्ता या क्रिया करण्यात स्वतंत्र नाही.

म्हणून कर्म करण्यात कर्त्यास स्वातंत्र्य असले पाहिजे. स्वतंत्रता नसेल तर ती क्रिया कर्म होऊ शकत नाही. निमेषोन्मेष किंवा श्वासोच्छ्वास या क्रिया असल्या, तरी यात स्वातंत्र्य नसल्यामुळे कर्म म्हणता येत नाही. चोरी करण्यात स्वातंत्र्य आहे. ते आम्ही करण्या, न करण्यासाठी स्वतंत्र आहोत म्हणून चोरी हे कर्म आहे.

ज्या उद्देशासाठी कर्म केले जाते त्या उद्देशाची पूर्ती किंवा कर्माची समाप्ती हे कर्माचे फळ नाही. जसे, धनासाठी चोरी केली जाते. धनलाभही होतो. पण हे चोरीचे फळ नाही. चोरीची पूर्णता हेही फळ नाही. चोरीचा शेवट केव्हा केव्हा धनलाभात होतो आणि केव्हा केव्हा पकडले जाण्यातही होतो. पण ही दोन्हीही फळे नाहीत.

उद्देशाचा कर्माच्या चांगले-वाईट होण्यावर प्रभाव पडतो. जर कर्म चांगले उद्दिष्ट ठेवून केले गेले तर पुण्य म्हटले जाते. जर निकृष्ट उद्देश असेल तर ते पाप म्हटले जाते.

आता आणखी एक प्रश्न उद्भवतो. कोणते उद्दिष्ट चांगले, कोणते वाईट हे तरी कसे ठरवावे? कारण, उद्देशाच्या उत्कृष्ट-निकृष्टतेवरच कर्माची पवित्रता, अपवित्रता अवलंबून आहे. यासाठी सृष्टीचे, सृष्टिक्रमाचे निरीक्षण करणे आवश्यक आहे. सृष्टीचे नियम एका विशिष्ट उद्देशाची पूर्ती करीत आहेत. तो उद्देश आहे, 'जीवांचे कल्याण करणे! जीव आपली कामे करण्यात स्वतंत्र असले तरी ही स्वतंत्रता परिस्थितीच्या अंतर्गत, परिस्थितीसापेक्ष आहे. एका प्रकारे जीव कर्म करण्यात स्वतंत्र आहे. म्हणजेच त्याच्या स्वतंत्रतेची एक सीमा आहे. तो त्याच्या बाहेर जाऊ शकत नाही. त्या मर्यादेच्या आतच त्यास एखादे काम करण्याची, न करण्याची किंवा उलट करण्याची स्वतंत्रता आहे. ही परिस्थिती त्याने बनविली नाही. ती सृष्टिनिर्मात्याने बनविली आहे. ही परिस्थिती, जीवास कर्म करण्याची स्वतंत्रताही असेल आणि शेवटी त्याचे कल्याणही होईल अशा प्रकारे बनविली

गेली आहे.

आता जे उद्दिष्ट या नियमांच्या अनुकूल ठरते ते पुण्य, जे उल्लंघन करते ते पाप आहे. याचाच विचार करून ऋषीमुनींनी धर्मग्रंथात पापपुण्याचे विवेचन केले आहे. सामान्य मनुष्य सृष्टिनियमांना चांगल्या प्रकारे जाणू शकत नाही. म्हणून एखादे काम सृष्टि-नियमाच्या अनुकूल आहे की प्रतिकूल आहे हे समजणे त्यांना कठीण जाते. म्हणूनच त्यांच्यासाठी निरपेक्षक पाप-पुण्याचा उल्लेख केलेला आहे. 'सत्यं वद, धर्मं चर' खरे बोल, धर्माने वाग'. पण केव्हा केव्हा मनुष्य पुण्य करू इच्छीत असूनसुद्धा किंकर्तव्य विमूढ होऊन जातो. तो करू इच्छीत असलेले काम पुण्य आहे की पाप हे तो समजू शकत नाही. अशा असमंजस अवस्थेत त्यास आत्म्याची हाक किंवा आप्त-संतपुरुषांच्या वचनांच्या आश्रय घ्यावयास पाहिजे.

वेदांमध्ये दोन प्रकारची कर्मे सांगितलेली आहेत. एक निष्काम कर्म, दुसरे सकाम कर्म. हे दोन्ही विभाग पुण्याचेच आहेत, पापाचे नाहीत. पाप तर नेहमीच सकामच असते. निष्काम असू शकत नाही. निष्काम पुण्य हे सकाम असू शकत नाही. निष्काम पुण्य हे सकाम पुण्यापेक्षा याकरिता उत्कृष्ट म्हटले आहे की, त्यात स्वार्थ नसल्यामुळे त्याच्या उद्दिष्टाच्या उत्कृष्टतेविषयी शंका असूच शकत नाही. साधारणपणे मनुष्य जेव्हा एखाद्या कार्याच्या उद्दिष्टाचा निश्चय करतो तेव्हा त्याच्या दैवी आणि आसुरी प्रवृत्ती अंत:संघर्षाचे रूप धारण करतात. बहुतेक आसुरी प्रवृत्ती विजय मिळविते, म्हणून सकाम कर्माबाबतीत स्थिती संदेहास्पद असते. कामना ही स्वत: एक चांगली भावना नाही. धुळीमध्ये बसून संध्या केल्यामुळे वस्त्र धुळीने माखण्याची भीती असते. तसे सकाम शुभकर्म करीत असताना उद्दिष्टामध्ये स्वार्थाच्या शिरकावाची भीती असते. दान हे पुण्यकर्म आहे. हे दान दोन रूपात दिले जाऊ शकते. एक सकामरूपात, दुसरे निष्कामरूपात. दान देण्यामागे प्रसिद्धीचा उद्देश असेल तर प्रसिद्धी अधिक मिळविण्यासाठी अपात्र व्यक्तीसही दान दिले जाण्याची शक्यता आहे. यामुळे दानाची श्रेष्ठताच कलंकित होण्याची स्थिती निर्माण होते. जर अशी कोणतीही कामना नसेल तर दानाच्या औचित्याविषयी शंका घेण्याचे काहीच कारण नाही. जे कर्म पूर्णत: सृष्टि-नियमांचा विचार करून केले जाते तेच खरे पाहता निष्काम कर्म आहे.

आता हे पाहावयाचे आहे की, आमच्या कर्माचा सृष्टिनियमावर व आम्हावर कोणता प्रभाव पडतो? ही बाब लक्षात ठेवली पाहिजे की, सृष्टीचे नियम एवढ्या दृढतेने कार्य करीत आहेत की, त्यांच्यामध्ये ढवळाढवळ करणे हे आमच्या कर्माच्या सामर्थ्याबाहेर आहे. आमचा उद्देश या नियमांचे समर्थन असो की उल्लंघन असो, आम्ही नियमांचे उल्लंघन करण्याची केवळ इच्छा करू शकतो, त्यांचे उल्लंघन करू शकत नाही. ईश्वराने या नियमांना अशाप्रकारे स्थिर केले आहे की, आमचे सर्व प्रयत्न व्यर्थ ठरतात. एक इंग्रज कवी म्हणतो:-

"There is a divinity that shapes our ends,
Rough hew them how we will".

म्हणजे आम्ही कोणत्याही प्रकारे आपल्या कार्यांना बिघडविण्याचा प्रयत्न केला तरी ती ईश्वरकृपेने

  

ठीक होतातच. ही सृष्टी जीवांच्या कल्याणासाठी उपयुक्त राहू शकणार नाही अशा स्थितीत आमच्या दुष्प्रवृती, दुष्कर्म कधीच वाढू शकणार नाहीत. ही बाब एका उदाहरणाद्वारे लक्षात येईल. एखाद्या राजाच्या राज्यामध्ये प्रत्येक प्रकारची सुव्यवस्था आहे. तिथे पापी आणि पुण्यात्मे सर्वच राहतात. पापी पाप करू इच्छितात. त्यांची बहुधा हीच इच्छा असते की, त्यांनी पुण्यात्म्यांना त्रास द्यावा. परंतु त्या राज्याचे नियम असे सुव्यवस्थित आहेत की, पाप्यांना दुसऱ्यांना कष्ट देण्याची किंवा विद्रोह करण्याची संधीच मिळत नाही. पापी पाप करण्याची इच्छा करतात. पण ही इच्छा त्यांनाच हानी पोहचविते. त्या इच्छेच्या पूर्तीसाठी केल्या जाणाऱ्या प्रयत्नांमुळे त्यांचे मन कलुषित होते पण ते कोणासही त्रास देऊ शकत नाहीत. संपूर्ण सृष्टीची परिस्थितीसुद्धा अशीच आहे. एखाद्या व्यक्तीची हानी करण्याचा विचार मी केला तरी तो कधीच पूर्ण होणार नाही. पण त्या इच्छेने प्रेरित कार्य माझ्या मनावर नक्कीच वाईट प्रभाव टाकतात. केव्हा केव्हा असे घडून येते की, आम्ही दुसऱ्यांना कष्ट देण्यात यशस्वी होतो. पण त्या कष्टांना आपल्या कर्माशी संबद्ध करण्याची चूक आम्ही करीत असतो. एखाद्या व्यक्तीस मारण्याची इच्छा करण्यात मी स्वतंत्र असलो तरी, तसा प्रयत्न करीत असलो तरी जोपर्यंत त्या व्यक्तीचा मृत्यू त्याच्याच कर्माद्वारे होणार नाही तोवर मला यश मिळणार नाही. हे कर्माचे आणि फळाचे जाळे सृष्टीमध्ये अशा प्रकारे पसरलेले आहे की, आम्हास धोका होतो आणि हे समजू लागतो की, अमुक पुरुषास मारणारे किंवा जगविणारे आम्ही आहोत. म्हणूनच कृष्ण गीतेत म्हणतातः

"निमित्तमात्रं भव सव्यसाचिन् !"

कौरव तर मेलेलेच आहेत. हे अर्जुना, तू फक्त निमित्तमात्र हो.

जे कर्म आम्ही करतो त्यांचा संस्कार आमच्या अंतःकरणात शिल्लक राहतो. मेणाच्या पट्टीवर एखाद्या वस्तूच्या चिन्हाप्रमाणे संस्कार मागे राहतात. हे संस्कार फळ नव्हे. खरे पाहता, हे कर्माचे चिन्ह आहेत, जे सूक्ष्म शरीरात राहून जातात.

शरीरे तीन प्रकारची आहेत. स्थूल, सूक्ष्म, कारण. अन्नमय कोष, प्राणमय कोष या दोन कोषांचे स्थूल शरीर बनलेले आहे. हात, पाय आणि इंद्रियांचे स्थूल शरीर आहे. अन्न, जलापासून हे शरीर बनते म्हणून यास अन्नमय कोष म्हणतात. पण याच स्थूल शरीरात सूक्ष्म प्राणसुद्धा आहेत जे प्राणमय कोष म्हणवले जातात. दुसरे सूक्ष्म शरीर आहे. याचे दोन भाग आहेत. मनोमय कोष आणि ज्ञानमय कोष. हे स्थूल नाहीत. आम्ही यांना पाहू शकत नाही. पण आपल्या अंतःकरणातील वृत्तींचा विचार केला तर याचा शोध लागू शकतो. आम्ही जेव्हा स्वप्न पाहतो त्या वेळी स्थूल शरीराशी आमचा कोणताच संबंध नसतो. पण फोटो प्लेटवर जशी बाहेरच्या दृश्याची छाया बनते तशीच प्रतिछाया स्थूल शरीराद्वारे केलेल्या व्यवहाराची आमच्या सूक्ष्म शरीरावर बनत असते. ज्ञान, स्मृती, सुख, दुःख इत्यादी सर्व याच सूक्ष्म शरीराच्या वृत्ती आहेत.

तिसरे कारण शरीर अत्यंत सूक्ष्म आहे. याचे स्वप्नातसुद्धा भान होत नाही. या शरीरास केवळ आनंदमय कोष म्हणू शकतो. जीव जेव्हा सुषुप्ती अवस्थेत असतो, त्या वेळी याचा अनुभव करतो.

खरोखर या शरीराचा अनुभव केवळ आनंदरूपच असतो. कारण, त्या वेळी सुख, दुःख, ज्ञान वगैरे वृत्ती पडद्याआड झालेल्या असतात.

ही तीन्ही शरीरे आत्म्यावर एखाद्या वस्तूवरील तीन आवरणांप्रमाणे वेष्टित आहेत. हे पडदे क्रमाक्रमाने स्थूल होत गेलेले आहेत. जे काही आम्ही करतो त्याचा प्रभाव अगोदर स्थूल शरीरावर पडतो. परंतु तो तिथेच राहत नाही. तो चाळला जातो. नंतर सूक्ष्म शरीरापर्यंत पोहचतो. अंतर केवळ एवढेच आहे की, चाळण्यामध्ये प्रभावाची स्थूलता दूर होते. सूक्ष्म शरीर स्थूल प्रभावांना ग्रहण करू शकत नाही. केवळ सूक्ष्म साररूप तत्त्व त्याच्यापर्यंत पोहचते. फोटोग्राफीमध्येसुद्धा असेच घडते. सहा इंच लांब व तीन इंच रुंद प्लेटवर एका पन्नास फूट उंच घराची आकृती येते. पण त्या लहानशा प्लेटमध्ये एवढ्या मोठ्या घरासाठी स्थान नाही. म्हणून जी प्रतिछाया बनेल तीमध्ये घराची स्थूलता नसेल, साररूप असेल. अशाच प्रकारे आमच्या कर्मांच्या प्रभावांची स्थिती आहे. हा प्रभाव सूक्ष्म व साररूपात असतो. यांनाच संस्कार म्हणतात.

सूक्ष्म व साररूप संस्कार म्हणजे तरी काय? हीच बाब आम्ही आणखी एका उदाहरणाद्वारे स्पष्ट करीत आहोत. एक मनुष्य एक-एक पैसा जोडून धनसंचय करतो. जेव्हा त्याच्याजवळ १०० पैसे जमा होतात तेव्हा तो ते न बाळगता एक रुपया बाळगतो. हा रुपया १०० पैशाचे साररूप आहे. तसेच एक-एक रुपयाचे शंभर रु. साररूप असेल. या उदाहरणाप्रमाणे एका मनुष्याने रामाच्या घरातूनही २००० रु. चोरले, शाम व कृष्ण यांच्या घरातूनही अनुक्रमे २००० व ५००० रु. चोरले. स्थूल शरीरावर या तीन्ही कार्यांचा प्रभाव आहे. पण सूक्ष्म शरीरास एवढ्या स्थूल प्रभावाची आवश्यकता नाही. सूक्ष्म शरीरावर केवळ एकच संस्कार असेल तो म्हणजे 'त्याने चोरी केली'. चोरीच्या संस्काराचा व कर्माचा तोच संबंध आहे, जो १०० पैशाशी नोटेचा किंवा नोटेचा १०० पैशाशी आहे. जस-जशी वाईट कर्मे वाढतात तस-तसे त्यांचे संस्कार सूक्ष्म शरीरावर पडतात. सूक्ष्म शरीर विस्ताराने हिशेब ठेवू शकत नाही. ते केवळ साररूप ग्रहण करते. हे संस्कार स्थूल शरीरास वाईट कर्म करण्यासाठी तीच सोय करून देतात जी सोय १०० रु.ची नोट चिल्लर पैसे प्राप्त करण्यासाठी करून देते. जेथे दुकानदार असेल तेथे आपली १०० रु.ची नोट चालेल. त्याचप्रमाणे जेथे परिस्थिती अनुकूल असेल तेथे चोरीचे संस्कार बाळगणारा लवकर चोरी करू शकतो. याच कारणामुळे दारूची सवय असलेल्या मनुष्यास दारूची बाटली पाहताच तोंडाला पाणी सुटते. अधिक स्पष्ट करण्यासाठी आणखी एक उदाहरण देऊ इच्छितो. शाळेत मुले गणित शिकतात. अगोदर त्यांना स्थूल उदाहरणे दिली जातात. मोहनने सोहनकडून ५००० रु. उधार घेतले व ५ रु. शेकडा या दराने ४ वर्षात १००० रु. व्याज दिले. प्रारंभी अशी अनेक उदाहरणे मुलांना सांगितली जातात. पण या सर्व उदाहरणांची आठवण ठेवणे आवश्यक आहे काय? मुळीच नाही. हे सर्व सामावून घेण्याइतके त्यांचे मस्तिष्क मोठे नाही. म्हणून ते साररूपाने व्याजाचे सूत्र लक्षात ठेवतात. मुद्दल x मुदत x दर ÷ १०० हे त्या सर्व उदाहरणांचे सार आहे. विशेष गणितज्ञ लहान-सहान नियमांऐवजी बीजगणिताच्या सूक्ष्म नियमांना व सूत्रांना जाणणेच आवश्यक

  

समजतो. या सूत्राद्वारेच त्याचे काम सुरळीतपणे पार पडते.

ज्ञानाच्या सूक्ष्म अवस्थाप्रमाणे संस्काराच्याही सूक्ष्म अवस्था आहेत. कारण शरीरावर सूक्ष्मतम संस्कार पडतात. आणि हेच संस्कार मृत्यूनंतर जन्म-जन्मांतरामध्ये बरोबर जातात. एका जन्माची आठवण दुसऱ्या जन्मात राहत नाही असा व्यर्थ आक्षेप काहीजण करीत असतात. कारण, आम्हास अल्पावधी उलटताच स्थूल गोष्टींचीदेखील आठवण राहत नाही. अति सूक्ष्म संस्कार जसेच्या तसे दुसऱ्या जन्मी जातात. आणि तेथे परिस्थितीनुसार पल्लवित होतात. याच कारणामुळे वेगवेगळ्या मनुष्यांचे स्वभाव वेगवेगळे आहेत. नाक, कान, शरीर इत्यादी एकसारखे असूनसुद्धा एकाचा व्यवहार दुसऱ्यापेक्षा पूर्णतः भिन्न असतो. हे आम्ही पाहतच आहोत. याचे कारण प्रत्येकजण पूर्वजीवनात कमविलेले अतिसूक्ष्म संस्कार स्वतः बरोबर घेवून येतो. हेच त्यांचे धन आहे. हे धन पैशाच्या, आण्याच्या, रुपयाच्या स्वरूपात नाही तर हजार रु.च्या नोटेच्या स्वरूपात आहे. एका एम.ए.च्या गणिताच्या परीक्षार्थ्याला 'तू तिसऱ्या इयत्तेत शिकलास ते का विसरलास?' असा प्रश्न कोणी विचारीत नाही. ते तर विसरण्यासाठीच होते. त्याची स्थूलता तर चाळणीत वरच राहिली. त्याचा सार शिल्लक आहे आणि तेच पुरेसे आहे.

हे झाले संस्काराविषयीचे संक्षिप्त वर्णन. पण येथे आमचा उद्देश संस्कारांचे विवेचन करणे हा नाही. आमचा उद्देश कर्म व फळाचा आस्तिकतेशी कोणता व कसा संबंध आहे हे दाखविणे आहे. बरेच जण कर्मसिद्धांत ही एक कल्पनामात्र आहे म्हणून उपहास करीत असतात व हिंदूंना वेडगळ समजतात. पण हा त्यांचा अज्ञानपणा आहे. वस्तुतः मनुष्याच्या जीवनाएवढेच कर्माचे जाळेही अत्यंत गुंतागुंतीचे आहे. कर्माच्या विवेचनाशिवाय मनुष्याच्या जीवनाविषयी काहीच कळत नाही. उपहास करणे सोपे आहे पण कर्माच्या कचाट्यातून सुटणे मुळीच शक्य नाही.

कर्माचा अंत संस्कारात होतो. पण संस्कार हे कर्माचे फळ नव्हे. संस्कार कर्माचा शेवट आहे. आता फळाचा विचार करा. जे संस्कार अंतःकरणात पडतात. ते दोन प्रकारचे असतात. एक उन्नतीचे साधक (इष्ट संस्कार), दुसरे उन्नतीस बाधक (अनिष्ट संस्कार). इष्ट संस्कारांना सुरक्षित ठेवण्याची व अनिष्ट संस्कारांना धुण्याची आवश्यकता आहे. इष्टांच्या संरक्षणासाठी सुख व अनिष्टांना धुण्यासाठी दुःख आहे. हेच कर्माचे फळ आहे. हे फळ कर्त्याच्या अधिकारात नसून ईश्वराच्या अधिकारात आहे. म्हणूनच गीतेतः-

कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन । असे म्हटले आहे.

स्थूल कर्म करणे, त्याचे साररूप सूक्ष्म शरीरापर्यंत पोहचणे, वगैरे-बाबी मनुष्याच्या अधिकारात होत्या. पण त्या संस्कारांपैकी इष्टांचे रक्षण व अनिष्टांचा विनाश करण्यासाठी आवश्यक असलेले साधन जमविणे जीवाच्या अधिकारात नाही. आंब्याच्या कोयीतून झाड उगवल्याप्रमाणे संस्कारातून फळाची गोडी उत्पत्ती होत नाही. आंबा वृक्षातून उत्पन्न झालेला आहे, तो वृक्षाचा एक भाग आहे. कर्माचे फळ कर्मातून उत्पन्न होत नाही. तो कर्माचा भाग नाही. ते कर्मामुळे बाहेरून आले आहे. कर्म त्याचे उपादान नसून निमित्त आहे. चोरास कैदेची शिक्षा ठोठावण्यात आली आहे ती चोरी

या कर्माचा भाग नाही. ती शिक्षा देणारा दुसराच आहे. संरक्षण खात्यात काम करणाऱ्याला मिळणारे वेतन कर्माचा भाग नाही. किंवा कर्मातूनही निघालेले नाही. वेतन हे नोकरीचे निमित्त असल्यामुळे राजकोषातून प्राप्त होते. म्हणून न्यायशास्त्रात गौतम महर्षींनी सुंदर विवेचन केले आहे.

पूर्वकृतंफलानुबन्धात्तदुत्पत्तीः । ३.२.६४

पूर्वजन्मामध्ये केलेल्या कर्माच्या फळाच्या रूपात शरीर प्राप्त होत असते. म्हणजे जे शरीर आम्ही या जीवनात प्राप्त करतो ते पूर्वजन्मातील इष्ट संस्कारांच्या रक्षणासाठी व अनिष्ट संस्कारांच्या विनाशासाठीच दिले जाते.

पण हे शरीर कोण देतो? जीवात्मा स्वतःच देतो का? मुळीच नाही. जीवात्म्याचा अधिकार चालला असता तर त्याने स्वतःसाठी दुःख कधीच घेतले नसते. कसेही कर्म केले असते व प्राप्ती सुखाचीच केली असती. अशुभ कर्मसुद्धा त्याने सुखाच्या प्राप्तीच्या भ्रमामुळेच केले होते. आता या संस्कारावर त्याचा काहीही अधिकार चालत नाही. आता तर संस्कारांनीच त्याच्यावर आधिपत्य जमविले आहे. दारू न पिण्याची त्याची इच्छा आहे. शपथा घेतो, व्रत करतो, प्रतिज्ञा करतो पण दारूची बाटली समोर दिसताच तो सगळ्या प्रतिज्ञा विसरून बसतो.

हे संस्कारच स्वतः शरीरास उत्पन्न करतात काय? असेही होणे शक्य नाही. संस्कार अचेतन (जड) आहेत. त्यांच्यात शरीरोत्पत्तीचे सामर्थ्य नाही. दुसरे, जर अनिष्ट संस्कारांनी शरीर बनविले असते किंवा बनवू शकले असते तर स्वतःच्या अनुकूल अनिष्ट शरीरच बनविले असते. कोणीही स्वतःच्या नाशाची साधने एकत्र करीत नाही. शरीरावर मळ जमला, असेल तर मळ स्वतः साबण लावणार नाही. मळ दूर करण्याकरिता साबण लावणारा दुसरा कोणीतरी पाहिजे. म्हणून गौतम महर्षी न्यायशास्त्रात म्हणतात :

'ईश्वरः कारणं पुरुषकर्माफल्यदर्शनात् । ४.२.१९

पूर्वीच्या सूत्रात पूर्वजन्माच्या कर्मामुळे शरीर मिळते असे म्हटले होते. या सूत्रात पूर्वजन्माचे कर्म स्वतःच फळरूपी शरीरास उत्पन्न करत नाही तर कर्मानुसार ईश्वर त्यांचे फळ देतो. या संबंधात पूर्वपक्ष - आक्षेप पक्षात आणखी एक सूत्र आहे :

न पुरुषकर्माभावे फलानिष्पत्तेः । ४.१.२०

जीवाचे कर्म नसेल तर फळ मिळणार नाही, तर मग ईश्वरास मानण्याची काय आवश्यकता आहे? याचे उत्तर शास्त्रकार देत आहेत :

तात्कारितत्वादहेतुः । ४.१.२१

हा आक्षेप योग्य नाही. कारण कर्माचे फळ ईश्वराधीन आहे.

अशा प्रकारे कर्माचे फळ कर्माद्वारे मिळत असल्यामुळे ईश्वर आहे हे कळून येते. ईश्वर न्यायकारी आहे म्हणून तो नक्कीच कर्माच्या अनुकूलच फळ देईल.

पुण्यः पुण्येन पापः पापेन । ३.२.३३ बृह.

परंतु पाप आणि पुण्य स्वतःच स्वतःचे फळ देईल असा याचा अर्थ नाही. जैनी इत्यादी बरेच

  

जण म्हणतात की, कर्म स्वतःच स्वतःचे फळ देते. म्हणून ईश्वरास मानण्याची काय आवश्यकता? खरोखरच कर्म स्वतःच फळ देऊ शकत असले तरी मागील अध्यायात विवेचन केल्याप्रमाणे सृष्टिरचनेसाठी तरी ईश्वराच्या अस्तित्वास स्वीकारणे आवश्यकच आहे. पण जैनी लोकांना हा भ्रम कर्ममीमांसा न समजल्यामुळे झाला आहे. त्यांनी **संस्कारालांच कर्माचे फळ** समजले आहे. वस्तुतः संस्कार कर्माचा अंत आहे, फळ नव्हे. या बाबतीत व्यवहारातील उदाहरणे पाहू या. एखादा शिक्षक विद्यार्थ्यांना शिकवितो. शिकविणे हे त्याचे कर्तव्य आहे. या अध्यापनाचे सूक्ष्म संस्कार अंतःकरणात अंकित होतात. शिक्षकाचे ज्ञान व विद्यार्थ्यांविषयी प्रेम दोन्ही वाढतात. पण हे संस्कार फळ नव्हे. मिळत असलेले वेतन हे फळ आहे. या वेतनाचा उपयोग इष्ट संस्कारांचे रक्षण व वृद्धी हाच आहे. अध्यापनात चूक करीत असेल तर शिक्षकाच्या अंतःकरणात अनिष्ट संस्कार पडतात. हे फळ नव्हे, कर्माचा अंत आहे. फळ दंड किंवा शिक्षा या स्वरूपात मिळतो, ज्यामुळे हे अनिष्ट संस्कार लवकरच धुऊन निघतात. वेतनप्राप्ती किंवा दंडप्राप्ती त्या संस्कारामुळे, किंवा संस्काराद्वारे नाही, हे अधिकारी वर्गाकडून होते.

म्हणून कर्मफळाचा सिद्धांत ईश्वराच्या सिद्धीसाठी एक सबळ पुरावा आहे. कर्मफळाच्या वास्तविक स्वरूपास समजून घेतल्याने नास्तिकांचे बरेचसे आक्षेप दूर होऊ शकतात.

१. ईश्वर दुःख का देतो?

२. ईश्वर कृमी-कीटकांचे शरीर का देतो?

दुःख आहे तरी काय? अनिष्ट संस्कारासाठी, कुवृत्तींसाठी साबणासारखे आहे. अनेक प्रकारच्या वाईट संस्कारातून दुःखाद्वारेच सुटका होऊ शकते. ज्याच्या पोटात विकार आहे त्यास जुलाब द्यावाच लागतो. आंत्रपुच्छ झाला असेल तर शस्त्रक्रिया करावीच लागते. त्यातच त्याचे कल्याण आहे. मनुष्येतर जन्मावर विचार केला तर तेसुद्धा कल्याणाच्या दृष्टीनेच दिले जातात. नेत्राद्वारे वाईट कर्म केल्यामुळे अंतःकरणात अनेक अशुभ संस्कार एकत्रित झाले असतील तर त्यास पुन्हा दृष्टी दिली गेली तर तो पुन्हा अशुभ मार्गातच प्रवृत्त होईल. म्हणून दुसऱ्या जन्मामध्ये दृष्टी न देणे किंवा दुसऱ्या एखाद्या योनीत (शरीरात) पाठवणे, जेथे त्या प्रकारे दृष्टीचा उपयोग करता येऊ नये असे करणे बरोबर आहे. एका विशिष्ट परिस्थितीच्या असण्यामुळे व एका विशिष्ट परिस्थितीच्या नसण्यामुळे अनिष्ट संस्कारांचा नाश होतो.

मनुष्याच्या अंतःकरणात इष्ट-अनिष्ट सर्वच प्रकारे संस्कार एकत्र झालेले असतात आणि त्यांचे परम्युटेशन म्हणजे अंकपाश व कॉम्बिनेशन म्हणजे एकादिभेद. यांची कारणे वेगवेगळ्या प्रकारची असतात. म्हणून यांच्यापैकी काहींचे रक्षण व काहींचा नाश या दृष्टीने अनेक शरीरांची रचना केली आहे. या शरीर-विभिन्नतेमुळे ईश्वराची क्रूरता नव्हे तर परम दयाळूतच प्रगट होते. जे पंथ, जो समाज **'पुनर्जन्म'** स्वीकारीत नाहीत ते जीवनाच्या गुंतागुंतीच्या समस्यांचे समाधान मुळीच करू शकत नाहीत, व खरे आस्तिकही बनू शकत नाहीत. कारण, जगात एवढे दुःख का आहे हे त्यांच्या लक्षातच येत नाही. वेदांतशास्त्रात व्यासमहर्षी लिहितात :

वैषम्यनैर्घृण्ये न सापेक्षत्वात्तथाहि दर्शयति ॥ २.१.३४.

ईश्वरामध्ये विषमताही नाही, निर्दयताही नाही. कारण तो वेगवेगळया योनींमध्ये जीवांना त्यांच्या कर्मानुसारच पाठवितो.

पुनर्जन्म न मानणारे मुक्तीच्या प्रश्नाचेसुद्धा कोणतेही समर्पक उत्तर देऊ शकत नाहीत. ख्रिश्चन व मुस्लिम मुक्ती तर मानतात पण पुनर्जन्म मानीत नाहीत. ते कर्माच्या संस्कार वैशिष्ट्यांना जाणत नाहीत. समजत नाहीत. जो समजतो तो एका जीवनात मुक्ती होते असे स्वीकारू शकत नाही. त्याचे कारण, अंतःकरणात पडलेल्या संस्कारांपैकी काही शुभ व काही अशुभ असतील. अशुभ संस्कारांना दूर सारावे लागेल. हे काम अनेक योनींतून-शरीरांतून वाटचाल केल्यामुळेच होईल. शुभ संस्कारांचेही अनेक भेद आहेत. या जीवनातील शुभ संस्कार येत्या जीवनात यापेक्षाही उत्तम शुभ संस्कारांना जन्म देतील. अशा प्रकारे उत्तरोत्तर जेव्हा शुभ संस्कारांची पराकाष्ठा होईल तेव्हाच पूर्ण ज्ञान होईल व "ज्ञानान्मुक्ति" ज्ञानाद्वारे मुक्ती प्राप्त होईल.

अशा प्रकारे पुनर्जन्म व कर्मफळाद्वारे ईश्वराचे अस्तित्व सिद्ध होते. पुनर्जन्माचा ईश्वराच्या अस्तित्वाशी एवढा घनिष्ट संबंध आहे की, बऱ्याच धर्मग्रंथात पुनर्जन्माचा स्वीकार न करणे हीच नास्तिकता आहे असे म्हटले आहे. वरील विवेचनावरून याचे कारण स्पष्ट होते.

खरे पाहता, जीव व ईश्वर यांच्यांत अतिशय जवळचा संबंध स्थापित करणारा कोणता सिद्धांत असेल तर तो कर्मफळ आणि पुनर्जन्मच आहे.

□□□

# अध्याय : दहावा

## शंका - समाधान

आस्तिकवादाविषयी अनेक व्यक्तींनी अनेक आक्षेप घेतलेले आहेत. यांपैकी काहीचे उत्तर योग्य ठिकाणी मागेच देण्यात आले आहे. पण काही आक्षेप असे आहेत की, ज्यांचे वर्णन स्वतंत्र करणे आवश्यक असल्यामुळे येथे त्या आक्षेपांचे उत्तर देण्यात आले आहे.

### पहिली शंका

सृष्टिक्रमाद्वारे सृष्टिकर्ता बुद्धिमान् आहे हे सिद्ध होत असले तरी ईश्वराद्वारेच सर्व वस्तू उत्पन्न झाल्या हे मात्र सिद्ध होऊ शकत नाही. ज्याप्रमाणे कुंभार मातीपासून माठ बनवितो त्याचप्रमाणे ईश्वर प्रकृतीच्या परमाणूंना विविध - पद्धतीने रचतो असे म्हणाल तर तुमचा परमेश्वर कुंभारासारखा होतो. एवढेच नसून तो केवळ रचयिता (Former) होऊ शकतो पण उत्पादक (Creator) होऊ शकत नाही.

जर्मनीचे प्रसिद्ध तत्त्ववेत्ते 'काण्ट' यांनीसुद्धा हाच आक्षेप केला आहे.

''सृष्टिरचनेद्वारे ईश्वर हा रचयिता आहे हे सिद्ध करू शकतो, उत्पादक (उपादान कारणाशिवाय उत्पन्न करणारा) नव्हे. दुसरे, सृष्टीद्वारे ईश्वर बुद्धिमान् आहे हे सिद्ध होऊ शकते, पण तो सर्वज्ञ किंवा पूर्णज्ञ आहे हे मात्र सिद्ध होऊ शकत नाही. कारण की, जगात अनेक उणीवा-दोष आढळून येतात, ज्यांच्या विषयी आम्ही काहीच उत्तर देऊ शकत नाही.''

काण्टच्या नंतरच्या आक्षेपाचे म्हणजे सृष्टीसंबंधी दोषांचे निरसन पुढे करू. अगोदरचा आक्षेप हा आक्षेपच नव्हे ती तर सिद्धांताची केवळ पुनरुक्तीच आहे. ईश्वर इतर पदार्थांशिवाय केवळ शून्यातूनच सर्व वस्तू उत्पन्न करतो असे स्वीकारणाऱ्यांनाच ही शंका उद्‌भवू शकते. आम्ही केवळ ईश्वरासच नित्य पदार्थ मानीत नसून जीव व प्रकृती (परमाणू) यांनाही नित्य स्वीकारतो. आम्ही मागील अध्यायामध्ये अनेक ठिकाणी स्पष्ट केले आहे की, ईश्वर ती सत्ता आहे जी प्रकृतीस व जीवांना अनुक्रमे सृष्टीरूपात व देहसंयोगाद्वारे प्राणीरूपात अभिव्यक्त करते. ज्याप्रमाणे कुंभार मातीपासून माठ व घड्याळीचा निर्माता सुट्या भागांपासून घड्याळ बनवतो अगदी त्याचप्रमाणे ईश्वर सृष्टीविषयक कार्य करतो. केवळ ईश्वरच नित्य आहे, तो इतर पदार्थांशिवाय सृष्टीच्या सर्ववस्तूंना उत्पन्न करतो असे मानणाऱ्यांना केवळ याच आक्षेपाची उत्तर द्यावे लागणार नसून आमच्या अशा अनेक आक्षेपांचेही उत्तर द्यावे लागणार आहे की ज्या आक्षेपांचे उत्तरच नाही. केवळ ईश्वरासच नित्यपदार्थ स्वीकारणाऱ्यांसाठी सर्वात कठीण समस्या ही आहे की ते सृष्टीच्या उत्पत्तीचा उद्देशच सांगू शकत नाहीत. सृष्टीपूर्वी जर केवळ ईश्वरच ईश्वर असेल, इतर काहीही नसेल तर ईश्वराने ही सृष्टी रचलीच कशासाठी? जे काही कार्य केले जाते ते स्वतःसाठी तरी असते किंवा इतरांसाठी तरी असते. दुसऱ्यासाठी आहे, म्हणावे हे बरोबर ठरत नाही. कारण

ईश्वराशिवाय दुसरा कोणी नाहीच. स्वत:साठी म्हणावे तर सृष्टीची आवश्यकता ईश्वरासाठी आहे असे सिद्ध होते. आवश्यकता बाळगणारा हा नक्कीच अपूर्ण असतो. आवश्यकता भासणे हेच अपूर्णतेसाठी सबळ पुरावा आहे. ईश्वरास अपूर्ण मानले तर त्याची पूर्ती इतराकडून व्हावी लागेल. अशा स्थितीत ईश्वर ईश्वरच राहणार नाही. आस्तिकताच संपुष्टात येईल.

दुसरी शंका ही उद्‌भवते की, ईश्वराने सृष्टी शून्यातून बनविली की स्वत:तून? मूळ प्रकृतीस ईश्वराने शून्यातून उत्पन्न केले व सृष्टीच्या संपूर्ण पदार्थांना त्या प्रकृतीतून उत्पन्न केले असे म्हणाल तर त्यापेक्षाही मोठा पेचप्रसंग उपस्थित होतो. प्रकृतीस शून्यातून उत्पन्न करू शकणारा ईश्वर इतर वस्तूंनासुद्धा शून्यातून का उत्पन्न करू शकत नाही? आज आम्ही कोणत्याही वस्तूची उत्पत्ती शून्यातून होत असलेली पाहत नाही. हे तर विज्ञानाद्वारे सिद्ध होत आहे. एखादी वस्तू उत्पत्तीपूर्वी कारणरूपात असणे अत्यंत आवश्यक आहे. अमुक वस्तू शून्यातून उत्पन्न झाली असे कोणतीही बुद्धिवादी व्यक्ती स्वीकार करू शकत नाही. शून्यातून वस्तूंची उत्पत्ती स्वीकारल्यामुळे, ज्या आधारावर ईश्वराच्या अस्तित्वास सिद्ध केले जाऊ शकते त्या सृष्टिक्रमाचेच खंडण होते. ईश्वर या वस्तूंना प्रकृतीपासून बनवतो पण प्रकृतीस मात्र शून्यातून बनवतो असे म्हणाल तर ही एक अशी कल्पना आहे की, जिच्या सिद्धीसाठी एखादीही युक्ती तर नाहीच, पण उदाहरणही नाही. एखादा पुरावा किंवा उदाहरण नसताना कोणत्याही विषयास जे स्वीकार करू इच्छितात त्यांनी वाट्टेल ते स्वीकारावे, त्यांना नको कोण म्हणणार आहे? त्यांच्याविषयी आम्ही काहीच म्हणू इच्छीत नाही. पण जे युक्ती व प्रमाणांचे महत्त्व समजतात त्यांनी विचारपूर्वक आपल्या सिद्धांताचे प्रतिपादन केले पाहिजे.

ईश्वर प्रकृतीस शून्यातून नव्हे, स्वत:मधूनच प्रगट करतो. ज्याप्रमाणे कोळी स्वत:च्या शरीरातून दोरा काढून जाळे विणतो त्याप्रमाणे ईश्वरही स्वत:तूनच सृष्टीची निर्मिती करतो असे काहीजण म्हणतात. हे प्रतिपादनसुद्धा तर्कसंगत नाही. कोळी (कीट) दोन वस्तूंच्या संयोगाने बनला आहे. एक चेतन जीव आणि दुसरे प्राकृतिक शरीर. चेतन जीव त्या विशेष प्रकारच्या परमाणूंच्या समूहातून म्हणजे शरीरातून वेळेनुसार दोरा बाहेर काढतो. कोळयाचा दृष्टांत देण्याचा उद्देश कोळयाची चेतनता व त्याच्या शरीराची विद्यमानता सिद्ध करण्याचा असेल तर तुमच्या आणि आमच्या सिद्धांतात काहीच अंतर राहणार नाही. म्हणजे ईश्वर परमाणूंद्वारे सृष्टीची रचना करतो हेच तुम्हीसुद्धा स्वीकारल्यासारखे होईल. ईश्वर केवळ अभौतिक चेतनसत्ता आहे असे म्हणाल, तर त्याहीपासून भौतिक प्रकृती किंवा सृष्टीचे बनणे, शून्यातून सृष्टीची उत्पत्ती होण्याइतकेच अशक्य आहे. अप्राकृतिक वस्तूतून प्राकृतिक वस्तूची उत्पत्ती कोणत्याही स्थितीत शक्य नाही. म्हणून सृष्टिक्रमाद्वारे हेच सिद्ध होते की, ईश्वर सृष्टीचा रचयिता आहे. आम्ही उत्पादक, जनक, पिता इत्यादी शब्दांचा वापर रचयिता याच अर्थामध्ये करतो. फ्लिण्टनीसुद्धा आमच्या मान्यतेस एक प्रकारे स्वीकार केले आहे. ते लिहितात :

"आस्तिक, सृष्टिक्रमाद्वारे केवळ हेच सिद्ध करू इच्छितो की, एक चेतन सत्ता आहे जी या

क्रमास निर्मित करते. या सृष्टिक्रमाच्या युक्तीद्वारे ईश्वर केवळ रचयिता (Former) आहे, उत्पादक नाही अशा प्रकारचा आक्षेप करणे, जो बहुतेक केला जातो, तो अज्ञानाचा सूचक आहे. ईश्वर प्रकृतीस उत्पन्न करणारा नसून प्रकृतीच्या परमाणूंना वेगवेगळ्या स्वरूपात ठेवणारा आहे. ह्यूम, काण्ट व जे.एस. मिल इत्यादींनासुद्धा असा आक्षेप करणे योग्य वाटले. पण त्यांना हे माहीत नाही की, या युक्तीद्वारे तेच सिद्ध होऊ शकते जे आस्तिक स्वीकारतात."

(फ्लिण्ट : थीज्म : पृ.१७०-७१)

तात्पर्य हेच की, ईश्वरास 'प्रकृती - परमाणूद्वारे सृष्टिरचना करणारा' असे स्वीकारले तर विज्ञानही आक्षेप बाळगत नाही. मिल वगैरे तत्त्ववेत्त्यांकडेही आक्षेप नाही. पण जेव्हा ख्रिश्चन आणि मुस्लिम ईश्वरास जीवांचा किंवा परमाणूंचा निर्माता म्हणून स्वीकारतात, तेव्हा मात्र वैज्ञानिक आक्षेप करण्यास सरसावतात. कारण, हा सिद्धांत सृष्टिक्रमाद्वारे किंवा इतर कुठल्याही युक्तीद्वारे सुद्धा सत्य होऊ शकत नाही.

पण, फ्लिंट ख्रिश्चन असल्यामुळे त्यांनी स्वतःच्या मताच्या पुष्टीसाठी आणखी एक युक्ती दिली आहे. ती युक्ती तपासून पाहणे आवश्यक आहे. ते लिहितात : जे.एस.मिल वगैरे 'क्रम (ORDER) हे एखाद्या चेतन (ज्ञानवान व शक्तिमान) सत्तेचे कार्य आहे' असे स्वीकारतात. पण, ते हे समजत नाहीत की, क्रम केवळ वरवरची बाब नसून ती परमाणूंमध्येही समाविष्ट आहे. विज्ञान निरंतर, 'प्रत्येक वस्तूत एक क्रम काम करीत आहे' या नियमास सिद्ध करीत आहे. असे असेल तर परमाणूंतसुद्धा एक क्रम सिद्ध होईल."

फ्लिंटच्या म्हणण्याचे तात्पर्य हे आहे की, जर परमाणूंत 'क्रम' असतो हे सिद्ध केले तर सूर्य, चन्द्र वगैरे परमाणूंपासून बनलेले आहेत हे स्वीकारल्याप्रमाणे परमाणूसुद्धा ईश्वराद्वारेच बनवले गेले आहेत असे मानावे लागेल. ते म्हणतात की, "एखाद्या (मग ते ब्रह्मांड असो की परमाणूंच्या मधली पोकळी असो) ठिकाणी ईश्वरीय सत्तेचा निवास नाही असे स्वीकार करणे, मूर्खता आहे, याचा अनुभव मनुष्यास येत आहे."

फ्लिंटची पकड खूपच मजबूत आहे. साधारणपणे असे भासवण्याचा त्यांनी प्रयत्न केला आहे की, ईश्वर हा परमाणूंचासुद्धा कर्ता आहे. पण ज्या प्रकारे ते परमाणूंच्या आत शिरू इच्छितात, तसेच जर ते तर्काच्या आतही शिरले असते, तर त्यांचा तर्क हेत्वाभासच सिद्ध झाला असता. एकदा एका साधारण व्यक्तीशी खालील प्रकारे वार्तालाप झाला होता.

**व्यक्ती** : ईश्वर या वस्तूत व्यापक आहे काय?
**मी** : होय. आहे.
**व्यक्ती** : या वस्तूचे तुकडे केले तर त्यातही तो व्यापक राहील काय?
**मी** : होय. नक्कीच राहील.
**व्यक्ती** : त्या तुकड्यांचेही अतिशय सूक्ष्म तुकडे केले तर?
**मी** : त्यातही व्यापक असेल.

**व्यक्ती** : तर मग हे सिद्ध झाले की, केवळ ईश्वरच आहे, परमाणू नाही.

**मी** : ते कसे?

**व्यक्ती** : कारण, सूक्ष्म-भागातही तो व्यापक असेल तर तोच शेष राहतो. इतर कोणतीच वस्तू शिल्लक राहत नाही.

**मी** : अरे वेड्या! कितीही तुकडे केले तरी व्याप्य-व्यापकाचा संबंध तर राहीलच. तुकडे व्याप्याचे होतील, व्यापकाचे होणार नाहीत. व्यापाचे तुकडे करण्यामुळे त्याप्य व्यापक कसा होऊ शकतो? जो व्यापक स्थूल व्यापामध्ये आहे तोच व्यापक सूक्ष्म व्याणमध्ये असणे शक्य आहे, पण व्याप्य-व्यापक संबंध कसा संपुष्टात येऊ शकतो?

ही तर एका साधारण माणसाची युक्ती होती. मला वाटत होते की, तर्क करू शकत नसल्यामुळे त्यास भ्रम झाला असेल. पण फ्लिण्टसारखे विद्वानसुद्धा जवळपास तशाच प्रकारचे हेतू- पुरावे जेव्हा देऊ लागतात तेव्हा आश्चर्य वाटल्याशिवाय राहत नाही. त्यांना असे वाटते की, परमाणूंत सुद्धा क्रम (ORDER) सिद्ध केल्यामुळे परमाणूंतही क्रम होईल. क्रम किंवा नियमासाठी एखादी वस्तू पाहिजे. मग ती स्थूल असो की सूक्ष्म. क्रमामध्ये आणि ज्या वस्तूत क्रम राहतो त्या दोन्हीत फरक आहे. क्रम आणि वस्तू एक होऊ शकत नाहीत. एखद्या दुकानात काही घड्याळे क्रमपूर्वक ठेवलेली आहेत. त्यांच्यांत एक विशिष्टक्रम आहे. कारण दुकानदाराने एक मुख्य प्रयोजन दृष्टीत ठेवून त्या क्रमाची निवड केली आहे. हा क्रम आणि घड्याळे एक नव्हेत. क्रम दुकानदाराच्या मस्तिष्कातून उद्भवला आहे. घड्याळे वेगळया वस्तू आहेत. क्रमांचा उपयोग यांच्यामध्ये केला जातो. घड्याळे क्रम नव्हेत. क्रम घड्याळे नव्हे. आता आपण या घड्याळांच्या समूहाचा विचार न करता एकेका घड्याळाचा विचार करा. ज्या प्रकारे सजावटीत क्रम होता तसा घड्याळांच्या रचनेतसुद्धा क्रम आहे. घड्याळाचे सुटे भाग, ज्यांना एका क्रमात ठेवल्यामुळेच घड्याळ तयार झाले आहे. पण त्या सुट्या भागांचे नाव क्रम नाही किंवा क्रम म्हणजे सुटे भाग नव्हेत. अशाच रीतीने पुढेही विचार करा. एक कमान घ्या. पितळेच्या सुट्या भागांना एका क्रमात ठेवल्यामुळे कमान तयार झाली. दुकानावरील घड्याळांच्या सजावटीत असलेल्या क्रमाप्रमाणे त्यांच्यातही एक क्रम आहे. पण सुटे भाग म्हणजे क्रम नव्हे. क्रम सुटे भाग नव्हे. सुट्या भागात क्रम आहे. या सुट्या भागांचा विचार करा. हा पितळेचा सुटा भाग काही अणूंना क्रमपूर्वक रचल्यामुळे बनला आहे. हे अणू क्रम नव्हेत आणि क्रम म्हणजे अणू नव्हे. अणूत क्रम आहे. हे अणू परमाणूंच्या संयोगाने बनले आहेत. म्हणजे या परमाणूंना एका विशिष्ट क्रमात ठेवल्यामुळे अणू बनला आहे. क्रम परमाणूंत आहे. क्रम परमाणू नव्हे. परमाणू ती वस्तू आहे, जिची विभागणीच होऊ शकत नाही. म्हणून 'त्यातही क्रम आहे' असा प्रश्नच उद्भवू शकत नाही. आम्ही परमाणूचीही विभागणी करू असे म्हणाल तर विभागणीच्या शेवटी म्हणजे ज्याचा पुन्हा विभागच करता येत नाही अशा स्थितीच्या वस्तूचे नाव परमाणू आहे असे आम्ही म्हणू. अशी स्थिती येऊच शकत नाही असे म्हणाल तर असे म्हणणे विकृत-मस्तिष्काच्या कल्पनेशिवाय दुसरे काहीच नाही असे म्हणावे लागेल. एखाद्या

  

भागाचे कितीही भाग होऊ शकतील, पण त्यांचे अस्तित्वच नाहीसे होणे शक्य नाही. ही बाब वेगळी की, त्यांना आम्ही पाहू शकणार नाही. 'आम्ही त्या अत्यंत सूक्ष्म परमाणूंचीही कल्पनेद्वारे विभागणी करू शकतो' असे तुम्ही म्हणाल तर आम्ही अशा कल्पनावाद्यांना काहीच म्हणू इच्छीत नाही जे कुठलाही आधार नसलेल्या हवेतील मनोऱ्याची कल्पना करतात. युक्ती व प्रमाणाचा आधार न घेता कल्पना करावयाची असेल तर कल्पनेद्वारे ईश्वराचीही विभागणी केली जाऊ शकते. पण या कल्पनेला अर्थ तरी काय आहे?

क्रम किंवा नियम परमाणूच्या आतही आहे असे जरी स्वीकारले, तरी क्रमाचा निर्माता ईश्वर आहे ज्या वस्तूत क्रम आहे त्या वस्तूचा नव्हे असेच स्वीकारावे लागेल. फ्लिंट पुढे लिहितात :

"सृष्टिक्रमाची उत्पत्ती निश्चितपणे बुद्धिद्वारेच झाली आहे. याचा अर्थ काय? हाच की, सृष्टिक्रम जड (अचेतन) प्रकृतीद्वारे उत्पन्न होऊ शकत नाही. प्रकृती जड (ज्ञान व गती स्वभावशून्य) असल्यामुळे बुद्धिद्वारे उत्पन्न होऊ शकणाऱ्या घटना, उत्पन्न होऊ शकत नाहीत. प्रकृतीस नित्य स्वीकारले तर त्यासोबत बुद्धीसही नित्य मानावे लागेल. ईश्वरास सृष्टीचा रचयिताच स्कीकारले व प्रकृतीचा उत्पादक स्वीकारले नाही तर द्वैतवाद सिद्ध होतो म्हणजे दोन वस्तू नित्य सिद्ध होतात. एक नित्य ईश्वर व दुसरी नित्य प्रकृती. जे या एकत्वाच्या कल्पनेस स्वीकार करावयास तयार नाहीत त्यांना स्वतःच्या विचारात नक्कीच परिवर्तन करावे लागेल. आणि कोण असा मनुष्य आहे जो विचार केल्यानंतरसुद्धा द्वैताचा स्वीकार करील? एखाद्या घटनेचे विवेचन करण्यासाठी कमीत कमी कारण स्वीकारणे हा नियमच आहे. जोपर्यंत केवळ एक नियन्ताच सृष्टि-रचनेची व्याख्या करण्यासाठी असमर्थ आहे हे सिद्ध होणार नाही तोपर्यंत आम्ही नित्य ईश्वर आणि नित्य प्रकृती या दोन तत्त्वांचा स्वीकार करू शकत नाही. आमच्या मते सृष्टीची व्याख्या करण्यासाठी एक ईश्वरच पुरेसा आहे."

(थिज्म : पृ.१७२- १७३)

येथे फ्लिण्ट महोदय 'सृष्टिक्रमाद्वारे ईश्वर व प्रकृती दोन्ही नित्य सिद्ध होतात' असे स्वीकारतात. पण त्यांना न्यूनतम कारणाचा नियम (Law of parsimony of causes) दोन्ही तत्त्वांना नित्य स्वीकार न करण्यासाठी भाग पाडीत आहे. वा! काय छान युक्ती आहे. एकट्या मरियमपासून येशू उत्पन्न होऊ शकतो. यावरून, न्यूनतम कारणाच्या नियमानुसार मुलाच्या जन्मासाठी आई आणि वडील या दोघांची आवश्यकताच काय आहे? पण हे प्रत्यक्षाच्या विरुद्ध आहे. या प्रश्नावर विचार करणारा केवळ चेतन सत्तेपासून सृष्टी किंवा केवळ जड (अचेतन) प्रकृतीपासून सृष्टी बनू शकते असे कधीच स्वीकार करू शकत नाही. जड (अचेतन) प्रकृतीत गती व क्रम कुठून येतील? आणि एकटी चेतनसत्ता कुणामध्ये गती उत्पन्न करील? सृष्टि-रचना ही अकर्मक क्रिया नाही. अकर्मक क्रियेचे फळ कर्त्यापर्यंतच असते. ही एक सकर्मक क्रिया आहे. सकर्मक क्रियेचे फळ कर्त्यापर्यंत मर्यादित न राहता कर्मापर्यंतसुद्धा वाटचाल करते. 'मी झोपतो' इथे 'झोपणे' ही अकर्मक क्रिया आहे. पण 'मी पाहतो' इथे पाहण्यासाठी एखादी वस्तू पाहिजे.

समजा 'मी पाहत आहे' असे कोणी म्हणाला आणि 'काय पाहतोस या प्रश्नाचे उत्तर 'काहीच नाही' असे देत असेल तर तो मूर्ख आहे असे तुम्ही म्हणाल. पाहणे तेव्हाच होऊ शकते जेव्हा पाहण्याजोगी असेल. याच प्रकारे रचण्यासाठी - बनविण्यासाठी प्रकृती असेल तरच ईश्वर सृष्टी बनवू शकतो. मला दुकान सजवावयाचे आहे. पण दुकानच नसेल तर काय सजवणार?

फ्लिण्ट व इतर अनेक तत्त्ववेत्त्यांना 'मूळ कारण' (First Cause) फारच त्रास देत आहे. जेव्हा ईश्वर 'मूळ कारण' आहे तेव्हा प्रकृती नित्य कशी होऊ शकते' असे ते म्हणतात. जेव्हा ईश्वर पुरेसे कारण (Sufficient Cause) आहे तेव्हा सृष्टि-रचना करण्यासाठी प्रकृतीची काय आवश्यकता आहे? पण आश्चर्याची बाब ही की, तत्त्ववेत्ते पुरेशा कारणाचा पुरेसापणा समजत नाहीत. 'पुरेसे कारण' याचा एवढाच अर्थ आहे की, त्यास आपले कार्य करण्यासाठी इतर साधनांची आवश्यकता भासू नये. ईश्वरास आवश्यकता भासत नाही. मी डोळ्याने पाहतो. ईश्वर डोळ्याशिवाय पाहतो. मी हाताने स्पर्श करतो. तो हाताशिवाय स्पर्श करतो. मी यंत्राद्वारे काम करतो. त्यास यंत्राची आवश्यकता नाही. म्हणून तो 'पुरेसे किंवा पर्याप्त कारण' आहे असे आम्ही म्हणतो. वस्तू नसताना वस्तू बनविणे, बी-बियाणे नसताना वृक्ष बनविणे, ही जर पर्याप्त कारणाची व्याख्या असेल तर, असे होणे कधीच शक्य नाही.

एका चेतनसत्तेद्वारे संपूर्ण सृष्टी बनू शकत नाही काय? असा प्रश्न काही जण विचारतात. पुरेसे कारण असलेला ईश्वर सृष्टी बनविण्यास असमर्थ आहे काय? सर्वशक्तिमत्तेचे विवेचन करताना आम्ही याविषयी बरेचसे लिहिले आहे. समर्थता किंवा शक्तिमत्तेच्या वाक्छलातून बाहेर पडून वास्तविकतेचा विचार केला पाहिजे. 'केवळ एक चेतनसत्ता जड (अचेतन) प्रकृतीशिवाय जड (अचेतन) सृष्टीस बनवू शकत नाही' असे आम्ही म्हणू शकतो. 'शकणे' या शब्दप्रयोगास भिण्याचे काहीच कारण नाही. 'शकणे' हा शब्दप्रयोग ईश्वरामध्ये असमर्थतेची भावना उत्पन्न करतो असे बऱ्याच जणांना वाटेल. पण केवळ श्रद्धेसाठी किंवा भावुकतेसाठी सत्याचा गळा दाबता येत नाही.

सृष्टिक्रमाद्वारे 'द्वैतवाद' सिद्ध होतो असे फ्लिण्टसुद्धा स्वीकारतात. तुलना केली तर खालीलपैकी एक नक्कीच सत्य असेल :

१. केवळ एका चेतनसत्तेपासूनच संपूर्ण सृष्टी बनू शकते.
२. किंवा केवळ एका जड (अचेतन) प्रकृतीपासून संपूर्ण सृष्टी बनू शकते.
३. किंवा याव्यतिरिक्त एखाद्या तिसऱ्याच सत्तेद्वारे.
४. किंवा दोन्हीद्वारे.

दुसऱ्या आणि तिसऱ्या कल्पनेचा निषेध तर तेही करतात. पहिल्या कल्पनेसंबंधी अनेक आक्षेप घेतले जात असल्यामुळे स्वीकारता येत नाही. आता केवळ शेवटची कल्पना शिल्लक राहते. खरे पाहता, ही कल्पना (hypothesis) नाही. हा एक सुदृढ विचार आणि तर्काद्वारे सिद्ध झालेली बाब आहे.

  

'संपूर्ण वस्तूंच्या' 'एकाच' कारणाचे अन्वेषण करणे', हाच तत्त्वज्ञानाचा (Philosophy) उद्देश आहे. तत्त्ववेत्त्यांनी द्वैतवादास स्वीकारून संतुष्ट होऊ नये असे काही जण म्हणतात. ही युक्ती ऐकून आम्हास हसू आवरता येत नाही. या कल्पनेसाठी तत्त्ववेत्त्यांकडे कोणता पुरावा आहे? सत्याचे अन्वेषण करणे हेच तत्त्ववेत्त्यांचे कर्तव्य आहे. अद्वैताशी प्रेम करणे, द्वैताशी घृणा करणे नव्हे. जी काही सृष्टी आहे ती जशी आहे तशी आम्हा समोर आहे. तिच्या विकासाच्या टप्यांचे अन्वेषण करणे हे तत्त्ववेत्त्यांचे काम आहे. सृष्टी अद्वैतास सिद्ध करीत असेल तर अद्वैत माना. पण, सिद्ध होत नसेल तर केवळ 'तत्त्ववेत्ता' म्हणवून घेण्यासाठी द्वैताशी घृणा करणे ही मुळीच दार्शनिकता- तात्त्विकता नव्हे.

अद्वैतप्रेमाने मोठ-मोठ्या तात्त्विकांना भ्रमाच्या जाळ्यात अडकविले आहे. 'कोणत्या का तऱ्हेने होईना अद्वैताची सिद्धी केलीच पाहिजे,' असा त्यांनी आपला उद्देशच ठरविला. शंकराचार्यांनी मायावादाची कल्पना याचसाठी केली. मायेशिवाय शुद्ध अद्वैतवाद सृष्टिरचनेचे विवेचन करूच शकत नाही. द्वैताशी त्यांना घृणा होती म्हणून अनिर्वचनीय मायेची कल्पना करावी लागली. पण या उपद्व्यापाने अद्वैत सिद्ध होऊ शकले काय? मुळीच नाही. माया ही 'ब्रह्म' तत्त्वाच्या गळ्यात लोंबकळत राहिली ती राहिलीच. शुद्ध ब्रह्म मायेशिवाय सृष्टी रचण्यास असमर्थ आहे काय? असा प्रश्न अद्वैतवाद्यांना विचारला तर याचे त्यांच्याजवळ कोणतेच उत्तर नाही.

जे 'पर्याप्त कारण' (पुरेसे कारण) Sufficient Cause प्रारंभी प्रकृतीच्या परमाणूंना उत्पन्न करण्यास पुरेसे होते, ते आज बी-बियाण्याशिवाय वृक्ष, आईवडिलाशिवाय मूल, ऑक्सिजनशिवाय पाणी, पाण्याशिवाय बर्फ किंवा गारा, मातीशिवाय पर्वत बनविण्यासाठी का पुरेसे ठरत नाही? आज कारणाद्वारेच हे सर्व का उत्पन्न केले जातात? असे मला विचारावेसे वाटते.

प्रकृतीस नित्य समजल्यामुळे किंवा स्वीकारल्यामुळे ईश्वर कुंभारासारखा होईल अशी भीती बरेच जण बाळगतात. पण कुंभाराची एवढी घृणा कशासाठी? आज हिंदू आपल्या मूर्खतेमुळे कुंभारास नीच समजतात म्हणून की काय? दृष्टांताच्या केवळ एकाच भागाचा दार्ष्टांताशी संबंध असतो. ईश्वर कुंभार नाही. कुंभारासारखा आहे. तेसुद्धा एका अंशामध्ये. केवळ वस्तुनिर्मितीमध्ये. ईश्वर आणि कुंभार यांच्यामध्ये, पृथ्वी आणि माठ यांच्यात जे अंतर आहे तेच अंतर आहे. कुंभारासारखा म्हटल्यामुळे ईश्वराचा अपमान होत असेल तर वडील किंवा वडिलांसारखा म्हटल्यामुळे का होऊ नये. ईश्वरास वडील समजले तर तो सांसारिक पित्याप्रमाणे स्त्रीसंबंधांद्वारे संतानोत्पत्ती करतो असा अर्थ होतो काय? हा केवळ दृष्टांत आहे. दृष्टांतास दृष्टांताच्या मर्यादेचे अतिक्रमण करू देऊ नये. हा केवळ दृष्टांत आहे, ज्याचा उल्लेख गीतेच्या खालील श्लोकात केला आहे :

'मद् योनिर्महद् ब्रह्म तस्मिन् गर्भं दधाम्यहम्'

इथे 'महद् ब्रह्म'चा अर्थ आहे प्रकृती. त्या प्रकृतीत ईश्वर गर्भ स्थापन करतो म्हणजे आपल्या ज्ञानासहित क्रियेचा प्रवेश करतो. याचेच नाव सृष्टिक्रम आहे. सृष्टी म्हणजे प्रकृती आणि क्रम

या दोन्हीचा योग. प्रकृती (परमाणू) अनादी आहे. क्रम ईश्वराकडून येतो.

## दुसरी शंका

स्पेंसर ल्यूएस टिण्डलचे म्हणणे आहे की, 'सृष्टीच्या कारणास ज्ञानसंपन्न म्हणू शकत नाही. कारण मनुष्याची बुद्धी अल्प असल्यामुळे अनंतास जाणू शकत नाही.'

आम्ही या आक्षेपाचे विस्तृत उत्तर आठव्या अध्यायात दिले आहे. सृष्टीस चेतन कर्ता आहे असे मानणारेच हा आक्षेप करू शकतात. ज्यांना सृष्टिकर्त्याच्या बुद्धिमत्तेवर सुद्धा विश्वास नाही, त्यांच्याकरिता सांत आणि अनंत याविषयीचा प्रश्नच उद्‌भवत नाही. सृष्टिक्रम बुद्धिमत्तासंपन्न नसेल तर त्यास जाणण्यासाठीसुद्धा कोणत्याही बुद्धिमत्तेची आवश्यकता नाही. पण आम्ही पाहतो की, याच सृष्टीच्या अनंत नव्हे, केवळ एका लहानशा भागास (अंशास) जाणण्याचा प्रयत्न करणारे टिण्डलसारखे वैज्ञानिक स्वतःस बुद्धिमानच समजतात. एखाद्या वस्तूच्या निर्मितीसाठी बुद्धीची आवश्यकता नसावी आणि समजण्यासाठी आवश्यकता भासावी हे आश्चर्यच नव्हे काय? पुस्तक बुद्धीशिवाय लिहिले जावे आाणि केवळ विद्वानाकडूनच वाचले जावे हे शक्य आहे काय? सांत व अल्प मनुष्य या सृष्टिरूपी अनंत पुस्तकास वाचण्यासाठी निरंतर धडपड करीत असतो. हेच, सृष्टी एका महान बुद्धिमानाने बनविली आहे असे सिद्ध करण्यास पुरेसे आहे. या बुद्धीच्या अनंततेविषयी काय सांगावे? याचा अनुभव मानव- मस्तिष्कास पावलोपाऊली होतो. टिण्डल महोदयांनी किंवा सर्वश्रेष्ठ समजल्या जाणाऱ्या वैज्ञानिकांनी मिळवलेल्या ज्ञाना एवढेच ज्ञान जगात आहे काय? सृष्टिरूपी पुस्तकाची पृष्ठे आम्ही वाचली तेवढीच आहेत काय? असे नसेल तर सृष्टिकर्त्याच्या अनंतत्वाविषयी संदेहच कशाला? आम्ही किंवा कोणीही सृष्टिरूपी पुस्तकाचे शेवटचे पान वाचण्याजोगी या पुस्तकाची जिल्द बांधलेली नाही, असे थोड्याच विचाराने कळून येते. हे एक अनंत पुस्तक आहे. एकेक पृष्ठ उलटीत जा; वाचन, मनन, निदिध्यासन करीत जा, याचा अंत काही होणार नाही. एक जन्म नव्हे हजारो जन्म घालवले तरी हाच अनुभव येतो की, आता कुठे या पुस्तकाचा प्रारंभ झाला आहे. म्हणून सृष्टीच्या सांततेविषयी संदेह होऊ शकला असता, पण त्याच्या निर्मात्याच्या अनंतत्वाविषयी संदेह करणे अविचारीपणाचेच द्योतक आहे.

## तिसरी शंका

जे.एस. मिल यांच्या शंकेस त्यांच्याच शब्दात उत्तर देणे उचित ठरेल.

"सृष्टिरचनेचे प्रत्येक चिन्ह रचयित्याच्या सर्वशक्तीमत्तेविरुद्ध एक पुरावा आहे असे म्हणणे अतिशयोक्तीचे होणार नाही. 'रचना' या शब्दाचा काय अर्थ आहे? साध्य सिद्ध होईल अशा रीतीने साधनांचा वापर करणेच आहे ना! वापर करण्याची आवश्यकता म्हणजे साधनांचा वापर करण्याची आवश्यकता. मर्यादित साधनांचा वापर करण्याची आवश्यकता मर्यादित सीमित शक्तीमुळेच भासते. साध्य हे जर केवळ म्हणण्यामुळेच सिद्ध झाले असते तर साधनांचा वापर कोणी केला असता? साधनांचा वापर हेच सिद्ध करतो की, जे काम साधनाद्वारे होऊ शकते ते त्यांचा वापर करणारा त्यांच्याशिवाय करूच शकत नाही. तसे नसते तर साधन हे साधन न राहता

एक ओझे झाले असते. कोणतीही व्यक्ती स्वतःच्या हातास उचलण्यासाठी यंत्राचा वापर करीत नाही. आणि जर करीतही असेल, तर पक्षाघात (Paralysis) झाल्यामुळे जेव्हा तो ओझे उचलू शकत नाही तेव्हाच. साधनांचा वापरच शक्ती-सामर्थ्याच्या अल्पतेचे चिन्ह असेल तर साधनांचा विचार व बुद्धिपूर्वक निवड या अल्पतेसाठी अधिक सबळ पुरावाच आहे असे म्हणता येईल. साधनांमध्ये तीच योग्यता आहे जी त्यांच्या प्रयोगकर्त्यांने दिली आहे आणि ही योग्यता तो इतर साधनांना देऊ शकला असता तर निवड करण्यासाठी बुद्धीची आवश्यकता तरी काय राहिली असती? बुद्धी आणि साधनांचा वापर संकटांना दूर करण्यासाठी होतो. ज्या सत्तेसमोर-ईश्वरासमोर कोणतेही संकट नाही, त्या सत्तेसाठी यांची आवश्यकता तरी काय आहे? म्हणून नैसर्गिक आस्तिकतेच्या पुराव्याद्वारे स्पष्टपणे हेच सिद्ध होते की, सृष्टिनिर्मात्याच्या शक्ती अल्प आहेत.''

(थ्री एसेज ऑन रिलीजन पृ. १७६-७७)

मिलच्या या शंकेत अनेक शंका समाविष्ट आहेत.

१. ईश्वर स्वतःच्या उद्दिष्टाच्या पूर्ततेसाठी साधनांचा वापर करतो म्हणून तो सर्वशक्तिमान् नाही.

२. तो या साधनांचा बुद्धिपूर्वक आणि विचारपूर्वक वापर करतो म्हणून त्याची शक्ती अल्प आहे.

३. जेव्हा त्या साधनांनाही तोच बनवतो म्हणजे त्या साधनांना स्वतःच्या इच्छेनुसार गुण आणि योग्यता देतो. त्यामुळे त्यांच्या निवडीत बुद्धिमत्तासुद्धा प्रदर्शित होत नाही. दुसऱ्यांनी बनवलेल्या साधनांपैकी काहींची निवड करावयाची असती तर मात्र नक्कीच बुद्धिमान म्हणू शकलो असतो.

४. साधनांचा वापर तोच करतो जो एखाद्या संकटात सापडलेला असतो. म्हणून ईश्वरास एखादे संकट नक्कीच ओढवलेले असेल.

मिलना असे वाटते की,

१. ईश्वर सृष्टीस स्वतःची गरज भागविण्यासाठी बनवितो. म्हणजे तो एखाद्या आपत्तीत सापडलेला आहे किंवा त्यास एखादी आवश्यकता आहे, त्या आवश्यकतेच्या पूर्ततेसाठी सृष्टी बनवावी लागते.

२. या आवश्यकतेच्या पूर्ततेसाठी तो काही साधन बनवितो.

आम्ही हे आक्षेप स्वीकार करीत नाही. आम्ही पूर्वीच उल्लेख केला आहे की, ईश्वर स्वतःच्या उद्दिष्टाच्या पूर्तीसाठी सृष्टी बनवीत नाही. कारण, तो अपूर्ण नाही, त्यास कोणत्याही वस्तूची आवश्यकताही नाही. हा आक्षेप मिलच्या सजातीय ख्रिश्चनांवर होऊ शकतो. कारण, सृष्टिरचनेपूर्वी केवळ ईश्वरच ईश्वर होता. इतर कुणीही नव्हते. मग त्याने सृष्टी कुणासाठी बनविली? आम्ही असे मानीत नाही. आम्ही यापूर्वीही सांगितले आहे की, ईश्वराप्रमाणेच अनादी व नित्य जीवांच्या कल्याणाकरिता ईश्वर सृष्टी रचतो, ज्यामुळे जीवांना कर्म करण्यासाठी व फळ (सुख-दुःखाच्या) अनुभवासाठी साधने उपलब्ध होऊ शकतात. जीव अल्प आहेत. त्यांचे शक्ती-सामर्थ्यही मर्यादित आहे. त्यांना काम करण्यासाठी व सुख-दुःखाचा अनुभव करवण्यासाठी

दोन्हीसाठी शरीर व इतर साधनांची आवश्यकता आहे. या साधनांचे नावच सृष्टी आहे. डोळे नसतील व डोळयाने पाहण्यासाठी रूप सुद्धा नसेल तर जीव कोणत्या साधनाद्वारे कोणास पाहील? तोंड नसेल व भक्ष्य पदार्थही नसेल तर कशाद्वारे काय खाईल? हात नसेल आणि वस्तूही नसतील तर कशाद्वारे काय काम करील? हृदय नसेल तर कशाद्वारे कोणास प्रेम करील? बुद्धी नसेल आणि बुद्धीद्वारे जाणण्याजोगी सृष्टीही नसेल तर कोणत्या साधनाने कोणत्या वस्तूचा विचार करील? म्हणून जीवास पावलोपावली प्रत्येक कामासाठी आणि सुखदुःखाच्या अनुभवासाठी सृष्टीची आवश्यकता आहे. म्हणूनच ईश्वर परोपकारासाठी सृष्टीची रचना करतो. महर्षी दयानंदांनी सत्यार्थप्रकाशाच्या आठव्या समुल्लासात लिहिले आहे की,

**प्रश्न :** जगाच्या निमिर्तीत परमेश्वराचा काय उद्देश आहे?

**उत्तर :** न बनवण्यात कोणता उद्देश आहे?

**प्रश्न :** जगास बनविले नसते तर आनंदात राहिला असता आणि जीवांना सुखदुःखही झाले नसते.

**उत्तर :** या कल्पना आळशी आणि दरिद्री लोकांच्या आहेत. प्रयत्नवाद्यांच्या नव्हेत. प्रलयकाळी जीवांना सुखदुःखाचा अनुभव होतो काय? सृष्टीच्या सुखदुःखाची तुलना केली तर जीवांना कितीतरी पटीने सुखाचाच अधिक अनुभव होतो. आणि बरेचसे पुण्यवान मुक्तीच्या साधनांचा अवलंब करून मोक्षानंदासंसुद्धा प्राप्त करतात. प्रलयकाळी, सुषुप्तीत निपचित पडून राहिल्याप्रमाणे राहण्यात विशेष ते काय आहे? प्रलयापूर्वीच्या सृष्टिमध्ये जीवांना पापपुण्यरूपी कर्माचे फळ ईश्वर कसे देऊ शकला असता आणि जीव कसे अनुभवू शकले असते?

सृष्टीच्या निर्मितीत ईश्वराचे स्वतःचे असे कोणतेच प्रयोजन नाही म्हणून त्यात अपूर्णतेचा दोष आढळून येऊ शकत नाही.

आता राहिला प्रश्न साधनांच्या प्रयोगाचा. 'सर्वशक्तिमान्' शब्दाची व्याख्या करताना आम्ही हे स्पष्ट केले आहे की, सृष्टिरचना करण्यासाठी ईश्वरास कोणत्याच साधनांचा वापर करण्याची गरज भासत नाही. तो साधनांची निवडही करीत नाही. ज्यांना तुम्ही साधन म्हणता ती सुद्धा त्यानेच बनविलेली आहेत. यांना बनविण्यासाठी ईश्वराने इतर कोणत्याही साधनांचा वापर केला नाही. खरे पाहता, ज्यांना साधन समजण्यात आले आहे तीसुद्धा बऱ्याच जीवांकरिता साध्य आहेत. कारण, त्यांच्याकरिताच त्यांची निर्मिती झाली आहे. दहा कोटी लोकसंख्या बाळगणारे एक चांगले राष्ट्र आहे असे समजा. त्या राष्ट्राचा राजा फार चतुर, दयाळू व परोपकारी आहे. या दहा कोटी लोकसंख्येत वेगवेगळया आवश्यकता बाळगणारे, वेगवेगळया श्रेणीचे मनुष्य आहेत. म्हणून तो राजा आपल्या राज्यात स्वतःसाठी मुळीच आवश्यक नसलेल्या पण इतरांच्या विकासासाठी व अनुभवासाठी आवश्यक असलेल्या काही संस्था उघडतो. या संस्था काहीजणांसाठी साधन असतील तर काहींसाठी साध्य ठरतील. पोस्ट ऑफिसच्या व्यवहाराचा उदाहरणादाखल विचार करू या. व्यापाऱ्यांसाठी व इतर गृहस्थी लोकांसाठी तर हे साधनमात्र आहे. पण जे तिथे काम करतात त्यांच्याकरिता हे साध्य आहे. कारण त्याद्वारे त्यांचा उदरनिर्वाह होतो आणि याच विभागात

काम करून ते आपल्या बुद्धीचा विकाससुद्धा करू शकतात. याच प्रकारे पोलीस, सेना, न्यायालय, व्यापार-समिती आणि बँकांची स्थिती आहे. हे सर्व एखाद्या व्यक्तीच्या अपेक्षेने साधन आहे. एकाचे कर्तव्यक्षेत्र आहे, तर दुसऱ्याचे जगण्याचे साधन आहे. एखाद्या पुरुषास कामावरुन कमी करणे हे दंड देण्यासाठी असेल तर तीच स्थान-रिक्तता दुसऱ्यास पारितोषिक देण्यास साधन बनते. अशाच प्रकारे सृष्टीच्या एक-एक घटनेचा अनेक जीवांशी संबंध आहे. त्या घटनेद्वारेच अनेक जीवांना कर्म करण्यासाठी संधी मिळते, अनेकांना दुःखरूप दंडही मिळतो व अनेकांना सुखरूप पुरस्कारही मिळतो. उदाहरणादाखल एखाद्या मनुष्याच्या मृत्यूच्या विचार करू या. 'क' नावाचा मनुष्य मरतो असे समजा. ही एक लहानशी घटना आहे. पण याच घटनेद्वारे त्याच्या पत्नीस विधवा होण्याची शिक्षा होते, आई-वडिलांस पुत्र-विहीन होण्याची, मुलांना पितृविहीन होण्याची, नातेवाइकांना संबंधीवियोगाची शिक्षा होते. त्याच्या शत्रूस शत्रू संपण्याचा पुरस्कार मिळतो. मरणाऱ्यासाठी मृत्यू सुखदायकही असू शकतो. दुःखदायकही असू शकतो. त्याच्या मृत्यूमुळे कोण जाणे किती मनुष्यांसाठी कर्मक्षेत्राचे दार उघडते. त्याच्या मृत्यूमुळे जणू त्यांना पर्वणीच वाटते. म्हणून ईश्वर साधनांद्वारे स्वतःची गरज भागवितो असे म्हणणे बरोबर नाही. सृष्टीमध्ये साध्य आणि साधन अशा प्रकारे जुळलेले आहेत की, त्यांच्यात भेदकभित्ती उभारली जाऊ शकत नाही. एका प्रकारे संपूर्ण सृष्टी साधन आहे. म्हणजे सृष्टीची निर्मिती जीवांच्या कर्तव्यपूर्तीसाठी व सुख-दुःखानुभवासाठी झालेली आहे. परंतु यामुळे ईश्वराची अपूर्णताही सिद्ध होऊ शकत नाही, त्याच्या सर्वशक्तिमत्तेतही काही फरक पडत नाही. मिलचे असे म्हणणे फारच विचित्र आणि हास्यास्पद आहे की, ईश्वर विचारपूर्वक साधनांची निवड करतो म्हणून निर्बळ आहे. अविचारीपणाने साधनांची निवड केली असती तर सबळ म्हणता आले असते का? निर्बळतेची आणि सबळतेची कसोटी केवळ त्यांनाच समजू शकते, ज्ञान व विचार यांना सर्वजण शक्तिमत्तेचे चिन्ह समजतात. संस्कृतभाषेत एक म्हण आहे:

बुद्धिर्यस्य बलं तस्य निर्बुद्धेस्तु कुतो बलम्!

बुद्धी बाळगणाराच बलिष्ठ आहे. बुद्धी नसेल तर बळ कुठले? ईश्वराच्या सृष्टीमध्ये अविचाराने ठाण मांडले असते आणि त्यामुळे मिल महोदयांच्या आवश्यकतेचा विचार न करता त्यांच्या पायामध्ये डोळे आणि पाठीमागे नाक बसविले असते, पाचन- शक्तीचे यंत्र डोक्यात ठेवले असते आणि त्याचा तोंडाशी काहीच संबंध नसता, मिलच्या डोळ्यांच्या पापण्याखाली मोठ-मोठी नखे असती तर 'साधनांचा विचार आणि बुद्धिपूर्वक निवड (Careful and Skilfull choice of Contrivances) ईश्वराच्या अपूर्णत्वास प्रगट करते असा आक्षेप करण्याची वेळ आली नसती. पण हा आक्षेप किती गमतीदार आहे! तत्त्ववेत्त्याने असा आक्षेप करावा यापेक्षा मनोरंजक ते दुसरे काय असणार?

आम्ही वर सांगितले आहे की, ज्या प्रकारे आम्ही हात, यंत्राची सहायता न घेता केवळ इच्छा-शक्तीद्वारे वर उचलतो त्याचप्रकारे ईश्वर सुद्धा केवळ इच्छेद्वारे प्रकृती (परमाणू)मध्ये संयोग-

वियोग करून सृष्टीची रचना करतो. आम्हास हात उचलण्यासाठी शरीररूप यंत्राची आवश्यकता तरी भासते आणि हे यंत्र लकवा किंवा अर्धांगवायूमुळे बिघडते तेव्हा या यंत्रासही उचलण्यासाठी इतर यंत्रांची आवश्यकता भासते. पण ईश्वरास या यंत्राची कधीच गरज भासत नाही.

बुद्धिपूर्वक निवड तर आवश्यकच आहे. सर्व साधनांना त्यानेच बनविले आहे आणि त्यामध्ये गुण व योग्यतासुद्धा त्यानेच उत्पन्न केल्या आहेत असे स्वीकारले तरी जी वस्तू किंवा घटना एका जीवासाठी साधक ठरते तीच दुसऱ्यासाठी बाधकही ठरते. म्हणून प्रत्येक जीवास आवश्यकतेनुसार साधन देणे आवश्यक आहे. बुद्धी आणि विचारांच्या उपयोगानेच हे होऊ शकते. मिलचे डोके आणि सिंहाचे पंजे बनविणारा ईश्वरच आहे. पण जर विचार न करता मिलना सिंहाचे पंजे आणि मिलचे डोके सिंहास दिले गेले असते तर दोघांची आवश्यकता पूर्ण झाली असती काय? मुळीच नाही. आणि असे करणे हे ईश्वराच्या सर्वशक्तिमत्तेचे सूचक ठरले असते काय? मुळीच नाही.

आता केवळ एक शंका शिल्लक राहते. ती म्हणजे, ईश्वर जीवांना आता दिलेल्या साधनांऐवजी इतर साधनांद्वारे त्यांच्या आवश्यकता पूर्ण करू शकत नाही काय? म्हणजे डोळ्याच्या पापणीत नखेही असती आणि रुतलीही नसती असे करणे ईश्वरास शक्य नाही काय? ही शंका हास्यास्पद तर आहेच. पण आम्ही एवढेच सांगू इच्छितो की, असे झाले असते तरी मिल महोदयांच्या आक्षेपातून सुटका झाली नसती. कारण त्या स्थितीत साधनाच्या एखाद्या वेगळयाच स्वरूपाविषयी विचार प्रारंभ केला असता. ज्यांनी आक्षेप करण्याचा विडाच उचलला आहे त्यांना शांती तरी कशी मिळणार? त्यांना डोळे आणि नाक दिले गेले तरी नाकाने का दिसत नाही? डोळ्याने सुवास का समजत नाही? अग्नी तहान का भागवीत नाही? पाणी दिव्यास का पेटवत नाही अशा अनेक शंका ते करू शकतात. या आक्षेपांना कुठलीही सीमा असू शकत नाही.

## चौथी शंका

सृष्टीमध्ये साधनांचा विचार आणि बुद्धिपूर्वक वापर आढळून येतो म्हणून जे. एस. मिल ईश्वराचा स्वीकार करू शकत नाहीत. आता आम्ही त्या आक्षेपांचे वर्णन करीत आहोत ज्यांना सृष्टीमध्ये दोषच दोष आढळून येतात.

अगोदर मिलचा विचार करू. एकीकडे ते साधनांचा बुद्धिपूर्वक वापर करणाऱ्या ईश्वरास स्वीकारू शकत नाहीत. कारण बुद्धीची आवश्यकता हे निर्बळतेचे सूचक आहे. दुसरीकडे ते सृष्टीमध्ये अविचारीपणा असल्याबद्दलसुद्धा आक्षेप करीत आहेत.

"मानवांच्या नीति-नियमात प्राणिहत्येपेक्षा मोठे पाप कोणतेच नाही असे स्वीकारण्यात आले आहे. पण सृष्टी प्राण्याची एकदा तरी हत्या नक्कीच करते. एक मूल जन्म घेताना आईस अनेक दिवस किती तरी कष्ट सोसावे लागतात. कधी तर मृत्यूसुद्धा ओढवतो. एक वादळ उभ्या पिकांची, नासाडी-नासधूस करते आणि पिकाविषयी बाळगलेल्या सर्व आशांचा चुराडा होतो. सारांश हाच आहे की, जीवन किंवा संपत्तीच्या नाशासाठी सर्वात भयंकर असे जे पाप मनुष्य करू शकतो ते या सृष्टीद्वारे होते. जेवढा अन्याय, नाश व हत्याकांड वादळ किंवा रोगामुळे घडून येते तेवढे

अराजकतेच्या किंवा क्रूरतेच्या राज्यातही घडून येत नाही.''

प्रोफेसर हेल्म होल्टजनी 'मनुष्याचे नेत्र फारच कुरूप बनवले गेले आहेत' असा आक्षेप केला आहे. ''डोळयामध्ये ते सर्व दोष आढळून येतात, जे एखाद्या पाहण्यासाठी वापरल्या जाणाऱ्या यंत्रामध्ये आढळून येऊ शकतात. एवढेच नव्हे तर त्या यंत्रापेक्षाही अधिक दोष आढळून येतात. जर एखाद्या चष्माविक्रेत्याने या दोषाचा चष्मा मला दिला असता तर मी त्यास त्याची मूर्खता किंवा असावधानी जबरदस्तीने दाखविली असती आणि त्याचा चष्मा परत केला असता''. नेत्रामध्ये सहा दोष दाखवण्यात आले आहेत.

१. चकाकणाऱ्या रंगाचा अभाव असणे.
२. डोळे वर्तुळाकार नसणे, कार्निया व भिंगाचे दोषपूर्ण केन्द्रीकरण व असमदृष्टी दोष.
३. प्रकाशित बिंदूच्या प्रतिच्छायेसभोवार विषम उत्सर्जन.
४. दोषयुक्त पारदर्शिता असणे.
५. वाहणारे कण असणे.
६. दृष्टिक्षेपामध्ये इतर रिक्तस्थान व काळा बिंदू असणे.

- Chromatic aberration.
- Spherical aberration and defective centering of the cornea and lens, together producing the imperfection known as astigmatism.
- Irregular radiation round the images of illuminated points.
- Defective transparency
- Floating Corpuscles.
- "The blind spot" with other gaps in the field of vision.

कामटी महोदय लैपलेसचे अनुकरण करतात. त्यांचे म्हणणे ''सौरमंडळ अधिक लाभ देऊ शकण्याजोगे बनलेले नाही. पृथ्वी सूर्याभोवती जेवढ्या वेळात फिरते तेवढ्या वेळात चंद्र पृथ्वीभोवती फिरला असता तर चंद्र प्रत्येक रात्री पूर्ण प्रकाशित झाला असता. - - - - - ध्रुव प्रदेशाजवळील क्षेत्र, अफ्रिका, एशिया, पॅसिफिक महासागर यांना उंच बनविण्याचा विचार त्यांनी मांडला आहे. ग्रीनलॅन्ड बेटास बुडवले आणि उत्तर अमेरिकेच्या व आशियाच्या नद्या उत्तरेकडेच प्रवाहित होण्याजोगी या दोन खंडांची रचना केली तर आइसलॅण्ड व कॅनडाचे हवामान उत्तम होऊ शकते.

(थिज्म पृ.२२९, २३५)

लॅंग (Longe) आणि हक्सले (Huxely) यांचा आक्षेप हा आहे की, 'शेतामध्ये एका ससाला मारण्यासाठी करोड़ो तोफा डागल्यामुळे जो अपव्यय होतो तेवढाच अपव्यय सृष्टीमध्ये आहे.''

(थिज्म : पृ.२४३)

अशा प्रकारे सृष्टीच्या रचयित्यामध्ये मूर्खता, अज्ञानता, क्रूरता व अपव्यय हे सर्व दोष आढळून येतात. कामटी अँड कंपनीस सृष्टी बनविण्याचा ठेका देण्यात आला असता तर वरील दोष त्यांच्या

सृष्टीत दिसले नसते. पण सृष्टि-निर्मात्याचा हाही एक सर्वात मोठा दोष आहे जो पूर्वोक्त दोषांपेक्षाही मोठा आहे तो हा की, तो स्वतः चांगली वस्तू बनवीत नाही आणि इतरांना बनवूही देत नाही. ज्या हेल्महोल्टजनी डोळ्यांच्या एवढ्या दोषांचा तपास लावला, त्या बिचाऱ्यास एक डोळासुद्धा बनविण्याची संधी मिळू शकली नाही. ते स्वतः म्हणतात : 'मी माझ्या डोळ्यांना परत करू शकत नाही. एवढे दोष असतानाही शक्य असेतोवर ते ठेवून घेण्यातच मला आनंद होईल."

आम्ही विचारतो की, हेल्महोल्ट्ज अशा प्रकारचा चष्मा बनविणाऱ्यास चष्मा परत करावयास तयार होते तर ते या दोषयुक्त डोळ्याऐवजी चांगले नेत्र का बनवून घेत नाहीत. तसे एखादे नेत्र बनवू शकले असते तर त्या नेत्राची आणि प्राकृतिक नेत्राची तुलना होऊ शकली असती आणि हेल्महोल्ट्जनांही अनुभवास आले असते की, कोणते नेत्र अधिक उपयोगी आहेत. हेल्महोल्ट्जनी कमीत कमी एका बाबीवर तरी विचार करावयास पाहिजे होता. ती ही की, अनेक पशुपक्ष्यांचे डोळे मनुष्याच्या डोळयांपेक्षा अधिक प्रबळ आहेत. घुबड रात्री पाहू शकते. आम्ही पाहू शकत नाही. मांजर रात्री आणि दिवसा दोन्ही वेळा पाहू शकते. जेवढे दूर पाहू शकते तेवढ्या दूरवर आम्ही दुर्बिणीनेही पाहू शकत नाही. अनेक पक्ष्यांचे डोळे आमच्यापेक्षा निर्बळ आहेत तर अनेकांचे प्रबळ आहेत. सर्पाचे कान आमच्या कानापेक्षा अधिक संवेदनशील आहेत. हरणाचे नाक आमच्या नाकापेक्षा अधिक संवेदनक्षम आहे. यावरून सृष्टि-निर्माता आमच्या इंद्रियांपेक्षा उत्तम इंद्रिये बनवू शकतो असे दिसून येते. अशी इंद्रिये आमच्या शरीरासाठी अधिक उपयुक्त ठरली असती की नाही या बाबतीत संदेहच आहे. स्वतः हेल्महोल्ट्जनीसुद्धा स्वीकारले आहे की,

"डोळे स्वतःच्या कर्तव्याचे पालन करण्यासाठी पूर्णपणे उपयुक्त आहेत ही बाब डोळ्यांच्या दोषांच्या न्यूनतेमुळे स्पष्ट होत आहे."

डोळे जर स्वतःचे काम करण्यासाठी पूर्णपणे उपयुक्त असतील तर यापेक्षा जास्त ते काय हवे आहे? जे दोषदर्शनाद्वारे सृष्टिकर्त्याच्या अज्ञानास दाखवू इच्छितात ते हे विसरतात की, हेल्महोल्ट्ज किंवा इतर नेत्रज्ञांनी नेत्राचे ज्ञानसुद्धा याच दोषपूर्ण नेत्रांच्या निरीक्षणाद्वारेच मिळविले आहे. ज्या व्यक्तीस डोळे आहेत त्या व्यक्तीसच चष्मा उपयोगी पडू शकतो. नेत्र नसलेल्यांना नेत्र देणारा असा तो कोणता नेत्रज्ञ आहे? एखाद्या विद्वानाने डोळ्याचे निरीक्षण व त्याची नक्कल न करता एखादाही डोळा बनविला असता तर ती त्याची कारीगरी होऊ शकली असती. तसे होणे तर शक्यच नाही.

ज्या प्राण्यास दोषयुक्त डोळे किंवा इतर अवयव दिले गेले आहेत, तो या अवयवांपेक्षा उत्तम अवयवांचा अधिकारी होता असे कसे म्हणता येईल? सर्वोत्कृष्ट अवयव किंवा पदार्थ, ज्यांची कल्पना मनुष्य करू शकतो, ते सर्वच सृष्टीमध्ये आढळून येतात. पण ते प्रत्येक प्राण्यास दिले गेले नाहीत. मासे पाण्यात पोहू शकतात. पक्षी हवेत उडू शकतात. सर्प पृथ्वीमध्येही राहू शकतात. यासाठी कल्ले किंवा पंख या दोन्हींची निर्मिती सृष्टिकर्त्याने करून दाखविली आहे. पण मनुष्यास असे वाटते की, मलाही कल्ले आणि पंख दिले असते तर बरे झाले असते वाटेल तेव्हा पोहताही

आले असते आणि उडताही आले असते. पण अपात्र जीवास सृष्टिनिर्माता ती साधने कशी देऊ शकतो? ईश्वराच्या फुलपाखरांना रंगी-बेरंगी पंख देण्यात आले आहेत. पण त्याच प्रकारचे सौंदर्य मनुष्याला नाही दिले गेले. म्हणजे सृष्टी एखाद्या अज्ञानी व्यक्तीने (सत्तेने) बनविली आहे असा अर्थ थोडाच होऊ शकतो? जो जी वस्तू घेण्यास पात्र नाही त्यास ती वस्तू मिळणार तरी कशी? मिळाली तरी ती त्याच्या काय उपयोगाची? यामुळे सृष्टिकर्त्याच्या उत्तम बुद्धिमत्तेचीच जाणीव होते, अज्ञानाची नव्हे.

आता मिल यांचा आक्षेप शिल्लक आहे. तो म्हणजे सृष्टि-निर्माता फारच क्रूर आहे. या विषयावर आम्ही बरेचसे पाप आणि दुःख या अध्यायात लिहिले आहे. मिलनी जगाच्या सुख-दुःखाची तुलनाच केली नाही. प्रत्येक प्राण्यास एकदा तरी मरावेच लागते असा यांचा आक्षेप आहे. पण मृत्यू झाला नसता तर सृष्टीची काय अवस्था झाली असती हे मिलना ठाऊक नाही. एका वर्तमानपत्रात एका ख्रिश्चनाने केलेले गणित प्रकाशित झाले होते. आदमनी निषिद्ध वृक्षाचे फळ खाल्ले नसते आणि मृत्युदेवतेस सृष्टीमध्ये शिरण्यास वाव मिळाला नसता तर आज पृथ्वीवर मनुष्यांची एवढी संख्या वाढली असती की एकेकाच्या डोक्यावर पन्नास जणांना उभे राहावे लागले असते. मिलचे वीस-तीस पिढीचे पूर्वज जीवंत असते तर लवकरच हा आक्षेपही करावा लागला असता की, सृष्टिकर्ता कसा क्रूर आहे जो प्राण्यांना जन्म देतो पण कोणासही येथून काढीत नाही. एखाद्या मनुष्यास संपूर्ण आनंद देऊनही एकाच ठिकाणी राहण्यास भाग पाडले तर तो थोड्याच दिवसात त्या आनंदापासूनही विरक्त होईल. त्यास त्या सुखाचाही उबग येईल. याच प्रकारे मृत्यू नसता आणि मनुष्यास नेहमीसाठी येथेच राहावे लागले असते तर नक्कीच त्यास जगाचा आनंद कस्पटासमान क्षुद्र वाटला असता. एका वादळामुळे अधून-मधून पिकांची नासाडीही होत असेल पण जी पिके हाती लागतात ती काय मिलच्या प्रयत्नाने? एका पावसाने शेकडो प्राण्यांची भूक भागविली जात असलेली आपण पाहतोच. प्रसवकाळी स्त्रियांना फारच कष्ट सोसावे लागतात असा आक्षेप मिल करतात. पण त्यांना हे माहीत नाही की, किती तरी स्त्रिया आणि त्यांचे पती नेहमी प्राकृतिक नियमांच्या उल्लंघनासाठी प्रयत्न करीत असतात. ईश्वर केवळ सुखानुभवाचे पदार्थच देत नाही तर सुखानुभवाचे सामर्थ्यही देतो. असे असूनही मनुष्य त्यास दोषी ठरवतो ही त्याच्या कृतघ्नतेची पराकाष्ठाच नव्हे काय? विश्व हे सौंदर्याची खाण आहे. पाहण्यासाठी, अनुभवण्यासाठी दृष्टी असणे आवश्यक आहे. अनुभवाची क्षमता, पात्रता असेल तर जग हे सुखाचे आगार आहे. परमेश्वराच्या कृपेस समजण्याची दृष्टी असेल तर जग हे दयेचा सागर आहे. योग्यता आणि शक्ती नसेल तर सृष्टीचा तरी काय दोष? डोळे असूनही न पाहणारे, कान असूनही न ऐकणारे नाहीत काय? स्वादिष्ट, गोड पदार्थातही कडवटपणाचा अनुभव करणारे रोगी नाहीत काय? डोळ्याद्वारे प्रकाशाचा लाभ न घेऊ शकणाऱ्या कितीतरी व्यक्ती नाहीत काय? स्वादिष्ट पदार्थांना प्रकाशाला दोष देणाऱ्यांची कीवच करावीशी वाटते.

कामटी आणि लैपलेस यांच्या चंद्राविषयीच्या आक्षेपास पाहून मला एक संवाद आठवला.

माझ्या चार-पाच वर्षांच्या मुलाने त्याच्या फाटलेल्या पतंगास चिटकवण्यासाठी बाटलीत डिंक न सापडल्यामुळे तक्रार नोंदवली की, बाबांनी लिफाफे बनविण्यासाठी सर्वच्या सर्व डिंक वाया घालवला आहे. ही मुलाची दृष्टी आहे. तो असे समजतो की, डिंकाचा योग्य उपयोग पतंग जोडणे हाच होऊ शकतो. चिकटवले जाणारे लिफाफे त्याच्या उदरनिर्वाहाचे साधन आहे हे त्यास काय ठाऊक? अगदी असाच दृष्टिकोण कामटी महोदयांचा आहे. चंद्र हा एक दीप मात्र आहे असे ते समजतात. सूर्याची परिक्रमा करण्यास पृथ्वीस जेवढा वेळ लागतो तेवढाच वेळ पृथ्वीची परिक्रमा करण्यास चंद्रास लागला असता तर चंद्र प्रत्येक रात्री पूर्ण उगवला असता, असे ते म्हणतात. पण, ज्या चंद्रामुळे समुद्रामध्ये भरती व ओहोटी येते, तो चंद्र गॅसबत्तीच्या प्रयोजनाशिवाय इतर अनेक उद्देशांसाठी बनविला गेला आहे. त्या चंद्रामध्ये कामटी महोदयांच्या म्हणण्यानुसार परिवर्तन केले तर काय परिणाम होईल यावर त्यांनी विचारच केला नाही.अशा दिग्गज वैज्ञानिकांची अशी बालबुद्धी पाहून आश्चर्यच वाटते.

ज्या ईश्वराने ही सृष्टी बनविली तो ही बाब जाणत नाही काय? लैपलेस, कामटी किंवा इतर ज्योतिषशास्त्रज्ञांच्या बुद्धीमध्ये असलेल्या गणिताच्या ज्ञानाएवढे ज्ञानही प्रदर्शित होत नाही काय? नाही म्हणणे हे विडंबनाची पराकाष्ठाच होईल. सृष्टीमध्ये एवढे ज्ञान नव्हते तर यांच्या बुद्धीमध्ये कोठून आले? ज्या ज्ञानासाठी सृष्टीमध्ये उदाहरण सापडत नाही ते ज्ञान एखाद्याकडे असेल तर तो वेडा ठरेल. सृष्टीमध्ये यापेक्षा अधिक ज्ञान दिसून येते. एवढेच नाही तर या सर्वांचे ज्ञान समुद्रातील थेंबाप्रमाणे क्षुद्र आहे असे दाखवून देणाऱ्या अपार ज्ञानाची जाणीव होते. या आधारावर चंद्राची अशा प्रकारची निर्मिती करण्याचा काही तरी उपयोग नक्कीच असेल असा विचार करावयास नको काय? काही जणांनी हिशेब केला आहे की, कामटींच्या म्हणण्यानुसार चंद्राची रचना केली गेली असती तर आता प्रकाशित होत असलेल्या चंद्राचा केवळ १६वा भागच प्रकाशित होऊ शकला असता. कामटी यांचा मुद्दा बरोबर जरी असला आणि तसाच चंद्र बनविला असता, तरी कामटी म्हणाले असते की, चंद्र दिवसा का उगवत नाही? वेगवेगळे आक्षेप करणे सोपे आहे, वास्तविकता शोधणे कठीण आहे. आशिया, उत्तर अमेरिका व इतर महाद्वीपांच्या आज दिसत असलेल्या रचनेचे काहीतरी कारण नक्कीच असेल. या कारणांचा शोध घेणे हे भूगोलवेत्त्यांचे काम आहे. जे आहे ते निरुपयोगी दाखवून वाट्टेल तसे प्रस्ताव मांडणे जाणकारांना तरी शोभणारे नाही. मनुष्याचा सर्वात मोठा दोष हा आहे की, तो प्रत्येक वस्तू स्वतःसाठीच बनविण्यात आली आहे असे समजतो. आणि याच दृष्टीने सृष्टीच्या सर्व घटनांचे विवेचन करतो. या अनंत सृष्टीत अनंत जीव आहेत असा विचार तो करीत नाही. या सर्वांचे कल्याण करणे ईश्वराचे काम आहे. आणि हाच या सृष्टीचा उपयोग आहे. जी वस्तू एका प्राण्यासाठी हानिकारक आहे तीच दुसऱ्यास लाभदायक आहे. वैद्याच्या दुकानात विष आणि औषधी दोन्ही आहेत, दोन्हींचाही उपयोग आहे. जो औषधी घेण्याऐवजी विष घेतो त्याने स्वतःच्या अज्ञानास दोष दिला पाहिजे, विष ठेवणाऱ्यास नव्हे. उत्तर समुद्रास नद्या मिळत असतील तर त्यांचा काही तरी उपयोग असेलच. ज्याने नद्या

  

बनवल्या त्यास यांचा उपयोग माहीत असेल. उपयोगाचे ज्ञान असल्याशिवाय नद्या बनविल्याच कशा जाऊ शकतात? हे एवढे साधारण काम आहे काय?

आता आणखी एक आक्षेप शिल्लक आहे. तो म्हणजे अपव्यय. सृष्टीमध्ये अपव्यय आहे म्हणणे तर अगदीच चूक आहे. सृष्टीची कोणतीही घटना हे सिद्ध करू शकत नाही. एका सशास मारण्यासाठी कोट्यवधी तर सोडाच एक गोळीसुद्धा वापरावी लागत नाही. सृष्टिकर्ता कधीतरी एखादी गोळी सोडतो आणि शेकडो प्राण्यांना जीवनमुक्त करतो. जेवढी मितव्ययता सृष्टीमध्ये आहे, त्यापेक्षा अधिक मितव्ययतेची कल्पनासुद्धा केली जाऊ शकत नाही. खरे पाहता, 'मितव्यय' या शब्दाचा पूर्ण अर्थ समजणेही आम्हास अशक्य आहे. आमची दृष्टी एवढी सीमित आहे की, आम्ही सृष्टीचा फारच थोडा भाग पाहू शकतो आणि त्या भागाच्या केवळ एका अंशाचीच जाणीव आम्हास होते. त्यामुळे आम्ही अनेक घटनांचा उपयोग जाणू शकत नाही, पण विचारशील मनुष्याने आपल्या अल्पज्ञतेचा विचार करून सृष्टीच्या वास्तविकतेचे व्यापक दृष्टीने अध्ययन केले पाहिजे.

## पाचवी शंका

ईश्वर कोणत्याही प्रमाणाद्वारे सिद्ध होऊ शकत नाही. कारण, 'इन्द्रियार्थसन्निकर्षोत्पन्नं ज्ञानमव्यपदेश्यमव्यभिचारिव्यवसायात्मकं प्रत्यक्षम्'। न्यायदर्शन सू. १।१।४.

रूप, रस, गंध, स्पर्श, शब्द या विषयांचा क्षेत्र, जिव्हा, नासिका, त्वचा, श्रोत्र या इंद्रियांशी, या इंद्रियांचा मनाशी, मनाच्या आत्म्याशी घडून येणाऱ्या संबंधांमुळे जे ज्ञान होते त्यास प्रत्यक्ष-ज्ञान म्हणतात. त्या ज्ञानासाठी साधन होत असलेले इंद्रिय-प्रत्यक्ष हे प्रमाण आहे. परंतु हे ज्ञान व्यपदेश्य म्हणजे संज्ञा-संज्ञीच्या संबंधाद्वारे झालेले नसावे. उदाहरणादाखल, एखाद्याने एखाद्यास म्हटले की, 'पाणी असे असते' पाण्याबद्दल शब्दज्ञानाद्वारे कितीही सांगितले तरी नेत्र, जिव्हा, त्वचा या इंद्रियांद्वारे पाणी पाहिले किंवा अनुभवले जाणार नाही, तोवर पाण्यासंबंधीचे ज्ञान 'प्रत्यक्ष-ज्ञान' या श्रेणीत समाविष्ट होणार नाही. शब्दाचे प्रत्यक्ष कानाने होत आहे. पण पाणी या पदार्थाचे प्रत्यक्ष होत नाही. म्हणून शब्दाद्वारे होणारे ज्ञान पदार्थासंबंधीचे प्रत्यक्ष-ज्ञान म्हटले जाऊ शकणार नाही. शब्द-प्रमाण हे 'पाणी' जाणण्यासाठी प्रत्यक्ष-प्रमाण होऊ शकणार नाही. दुसरे 'अव्यभिचारी.' रात्रीच्या वेळी अंधुक प्रकाशात दोर हे सापच आहे असे वाटते, पण प्रकाशात ते ज्ञान नष्ट होते. अशा ज्ञानास 'व्यभिचारी' म्हणतात. हे प्रत्यक्ष ज्ञान होऊ शकत नाही. 'व्यवसायात्मक.' दुरून नदीकाठची वाळू पाहून 'तिथे नेमके काय असेल? असे अनिश्चित ज्ञानही प्रत्यक्ष होऊ शकत नाही. अव्यपदेश्य, अव्यभिचारी, आणि निश्चयात्मक ज्ञान हेच प्रत्यक्ष ज्ञान म्हटले जाऊ शकते.

प्रत्यक्ष ज्ञानासाठी विषय-वस्तु-अर्थ याशी (सन्निकर्ष) संयोग होणे आवश्यक आहे. ईश्वर इंद्रियांचा विषय नाही असे सर्वच आस्तिक स्वीकारतात. म्हणून प्रत्यक्ष प्रमाणाद्वारे ईश्वर सिद्ध होऊ शकत नाही. कपिलमुनी म्हणतात की, 'ईश्वरासिद्धेः'

प्रत्यक्ष प्रमाणाद्वारे ईश्वराची सिद्धी होऊ शकत नाही. दुसरे अनुमान प्रमाण आहे :

अथ तत्पूर्वकं त्रिविधमनुमानं पूर्ववच्छेषवत्सामान्यतोदृष्टञ्च । (न्यायदर्शन १।१।५)

जे प्रत्यक्षपूर्वक म्हणजे एखाद्या वस्तूचा एखादा भाग किंवा संपूर्ण वस्तू एखाद्या काळी प्रत्यक्ष झाली असेल आणि त्याच वस्तूचा सहचारी (बरोबर राहणारा) पदार्थ दुरून प्रत्यक्ष झाल्यामुळे होणाऱ्या अदृष्ट अवयवीच्या ज्ञानास 'अनुमिती' म्हणतात. हे ज्ञान ज्या प्रमाणाद्वारे होते त्यास 'अनुमान प्रमाण' म्हणतात.

अग्नी आणि धूर यांचा नित्य संबंध आम्ही पाहतो. अग्नीशिवाय धूर असत नाही. या संबंधाची अगोदर जाणीव झाल्यानंतर केव्हातरी पर्वतात धूर पाहून लगेच तिथे अग्नी आहे असे समजतो. म्हणजे अगोदर अग्नी आणि धूर यांचे प्रत्यक्ष, नंतर केवळ धुराचे प्रत्यक्ष झाल्यामुळे अग्नीचे जे ज्ञान होते ते 'अनुमिती' आहे. धुरामुळे हे ज्ञान होत असल्यामुळे 'धूर' हे अग्नीचे ज्ञान करवून देण्यासाठी साधन ठरत असल्यामुळे ते 'अनुमान-प्रमाण' आहे.

अनुमान प्रमाणासाठी एक भाग किंवा संपूर्ण वस्तूचे एखाद्या ठिकाणी, एखाद्या वेळी प्रत्यक्ष होणे आवश्यक आहे. वर सांगितलेच आहे की, ईश्वराचे प्रत्यक्ष होऊ शकत नाही म्हणून त्याचे अनुमानही करता येत नाही.

तिसरे उपमान :

प्रसिद्ध साधर्म्यात्साध्यसाधनमुपमानम् ॥ (न्याय. १।१।६)

दोन वस्तू किंवा प्राण्यातील सर्वश्रुत सर्वसम्मत अशा सादृश्याच्या प्रत्यक्षाद्वारे सिद्ध करण्याजोग्या ज्ञानाच्या सिद्धीचे जे साधन असते त्यास 'उपमान' म्हणतात.

अरण्यात राहणाऱ्या गाईस 'गवय' असे म्हणतात. एखादी व्यक्तीने 'गवय' म्हणजे कोणता प्राणी? तो कसा असतो? असे विचारले असता 'तो गायीसारखा असतो असतो असे उत्तर दिले जाते. गाय ही प्रसिद्ध वस्तू आणि 'गवय'चे ज्ञान सादृश्यतेमुळे होते. अरण्यातून जात असता 'गवय' प्राण्यास पाहून हा गायीसारखा आहे म्हणून 'गवय' आहे असे जेव्हा ज्ञान होते तेव्हा ते गवय 'प्रत्यक्षच' असते. अशा प्रकारे प्रसिद्ध सादृश्याद्वारे वस्तूच्या प्रत्यक्षानंतर जे ज्ञान होते त्यास 'उपमिति' म्हणतात. या ज्ञानाचे कारण सादृश्य असल्यामुळे हे 'सादृश्य' उपमान - प्रमाण समजले जाते.

उपमान प्रमाणासाठीसुद्धा प्रत्यक्षाची आवश्यकता आहे. प्रत्यक्षाद्वारे ईश्वर सिद्ध होऊ शकत नाही म्हणून उपमानाद्वारेसुद्धा ईश्वराची सिद्धी शक्य नाही.

चौथे शब्दप्रमाण

आप्तोपदेशः शब्दः (न्याय. १।१।७)

आप्तांचा (आप्तस्तु यथार्थवक्ता) सत्योपदेष्ट्यांचा उपदेश शब्द प्रमाण समजला जातो. हेसुद्धा प्रत्यक्षावरच अवलंबून आहे. प्रत्यक्षाची व्याख्या करताना याचे विवेचन करण्यात आले आहे. म्हणून ईश्वराच्या सिद्धीसाठी कोणतेच प्रमाण नाही. प्रमाणाशिवाय ईश्वराच्या अस्तित्वास स्वीकारणे बुद्धिमत्ता नाही. आता आम्ही या शंकेचे निरसन करू. खरे पाहता, अनुमान प्रमाणाचा अर्थ ठीक-

ठीक न समजल्यामुळे ही शंका उद्भवली आहे. कार्यास पाहून कारणाचे अनुमान करण्यासाठी कारणाच्या प्रत्यक्षाची मुळीच आवश्यकता वाटत नाही. प्रत्यक्षच होऊ शकले असते तर अनुमान प्रमाणाच्या वापराची आवश्यकताच भासली नसती. अनुमान प्रमाण तिथेच वापरले जाते ज्या ठिकाणी प्रत्यक्ष- प्रमाण कार्य करू शकत नाही. एखाद्या वेळी अग्नी व धूर दोन्हीचे प्रत्यक्ष होत असेल तर धुराद्वारे अग्नीचे अनुमान करण्याची काय गरज? एक म्हणसुद्धा आहे. प्रत्यक्षे किं प्रमाणम्? म्हणजे प्रत्यक्ष वस्तूसाठी इतर कोणत्याही प्रमाणाची आवश्यकता नाही. प्रत्यक्ष स्वतःच पुरेसे प्रमाण समजले जाते.

सूर्याचा प्रकाश आसमंतात पसरलेला असताना दिवा पेटविणे व्यर्थ आहे. याचप्रकारे इतर प्रमाणांची आवश्यकता तेव्हाच भासते जेव्हा प्रत्यक्ष प्रमाण कार्य करत नाही. म्हणून, ईश्वर प्रत्यक्ष-प्रमाणाद्वारे सिद्ध होत नसेल तर अनुमानही काम करू शकत नाही, अशी शंका करणे अगदी भ्रम आहे. ईश्वर प्रत्यक्षाद्वारेच सिद्ध झाला असता तर अनुमानाची गरजच भासली नसती. ज्यांना ईश्वराचा प्रत्यक्ष (अनुभव) होतो त्यांना याची आवश्यकताही वाटत नाही. ईश्वरानुभव ज्यांना होत नाही त्यांच्यासाठी अनुमानाची आवश्यकता आहे.

अनुमानाचे लक्षण करीत असताना 'तत्पूर्वकम्' या शब्दाचा जो उल्लेख केला आहे, त्याचा अर्थ हा नाही की, ज्या कार्याचे कारण आम्ही सिद्ध करू इच्छितो त्या कारणाचेही प्रत्यक्ष व्हावयास पाहिजे. त्याचा अर्थ हाच आहे की, त्याच प्रकारच्या कारण आणि कार्याचा पूर्वी प्रत्यक्ष झालेला असावा आणि आता केवळ कार्याचा प्रत्यक्ष व्हावा, कारणाचा नव्हे. सांख्यशास्त्रात अनुमान प्रमाणाचे लक्षण खालीलप्रमाणे केले आहे.

प्रतिबन्धदृशः प्रतिबद्धज्ञानमनुमानम्॥ सांख्य १।११

प्रतिबंध किंवा संबंधाच्या ज्ञानाद्वारे संबद्ध वस्तूचे ज्ञान होणेच अनुमान प्रमाण आहे. तात्पर्य हेच आहे की, प्रत्यक्ष हा संबंधाचा होतो, संबद्ध वस्तूचा नव्हे.

खरे पाहता, प्रमाणाची आवश्यकता तेव्हाच भासते जेव्हा प्रमाणाशिवाय ज्ञान होऊ शकत नाही. सांख्यशास्त्रातील विवेचन लक्षात घेण्याजोगे आहे.

द्वयोरेकतरस्य वा ऽप्यसंनिकृष्टार्थपरिच्छित्तिः प्रमा।

तत्साधकतमं यत् तत् त्रिविधं प्रमाणम् । सां. १।८७

(असंनिकृष्टार्थपरिच्छित्तिः) म्हणजे अज्ञात विषयाची निश्चितपणे माहिती मिळविणे 'प्रमा' किंवा 'यथार्थज्ञान' म्हटले जाते. (यत्) जे (तत् साधकतमम्) त्या प्रमेचे साधन आहे, ते 'प्रमाण' आहे. अशा प्रकारे अनुमानासाठी तीन बाबी आवश्यक आहेत.

१. कारण आणि कार्य यांचे प्रत्यक्ष होणे.
२. आता त्याच प्रकारच्या कार्याचे प्रत्यक्ष होणे.
३. आणि त्याच्या कारणाचे प्रत्यक्ष न होणे.

आम्ही ईश्वरसिद्धीसाठी जेव्हा अनुमानाचा वापर करतो तेव्हा या तीन बाबी स्पष्टपणे दाखवतो..

१. आम्ही कुंभाराद्वारेच माठ बनवला जात असलेला किंवा कर्त्याद्वारेच कृती होत असलेली पाहिली. म्हणून कारणाशिवाय (कर्त्याशिवाय) (अनेक कारणांपैकी कर्ता एक कारण) कार्य होऊ शकत नाही. वस्तू निर्मित होत नाही.

२. आम्ही सृष्टीच्या सर्व घटना पाहतो. त्यांना 'प्रारंभ' आहे असे दिसते. त्या 'कार्य' श्रेणीत ठेवल्या जाऊ शकतात. हे आम्हास प्रत्यक्ष दिसून येते.

३. या घटनांचे, कार्यांचे कारण (म्हणजे ईश्वर) प्रत्यक्ष दिसत नाही. म्हणून अनुमानासाठी ज्या तीन अवस्था आवश्यक होत्या त्या पूर्ण झाल्या. अनुमान प्रमाणाचा वापर न करण्यासाठी कारण ते असे कोणतेच नाही. म्हणून अन्नंभट्टांनी लिहिले आहे की,

क्षित्यङ्कुरादिकं कर्तृजन्यं कार्य्यत्वाद् घटवद् इति अनुमानस्य प्रमाणत्वात् ।

(तर्कदीपिका : पृ. १२)

पृथ्वी, अंकुर (मोड फुटणे) वगैरेंचा कर्ता नक्कीच कोणीतरी आहे. कारण हेसुद्धा माठाप्रमाणे कार्यश्रेणीत समाविष्ट होतात. अशा प्रकारे अनुमान प्रमाणाद्वारे ईश्वराची सिद्धी होऊ शकते.

उदयनाचार्यांनी 'न्याय कुसमाञ्जली'मध्ये ईश्वराच्या सिद्धीसाठी खालील युक्त्या दिल्या आहेत.

कार्य्यायोजनधृत्यादेः परात् प्रत्ययतः श्रुतेः ।
वाक्यात् सङ्ख्याविशेषाच्च साध्यो विम्बविदव्यः ॥ ५।१

१. उत्पन्न झालेली सृष्टी कार्य आहे म्हणून कारण पाहिजे.
२. आयोजन : परमाणूंच्या संयोगासाठी क्रिया आवश्यक आहे. या क्रियेसाठी कर्ता आवश्यक आहे.
३. धृती : सृष्टीचा कोणीतरी आधार पाहिजे.
४. पद : अनेक प्रकारच्या कार्यांना शिकविणारा कोणी तरी पाहिजे.
५. प्रत्यय : वेदांमध्ये ज्ञानप्रदान करण्याची शक्ती कुणी दिली?
६. श्रुती : वेद कुणी बनविले?
७. वाक्य : भाषा कुणी रचली?
८. संख्याविशेष : दोन परमाणूंच्या संयोगाने द्व्यणुक बनतो. हे कोणास सुचले?

आता शब्द प्रमाणाविषयी शंका घेणे मुळीच समंजसपणाचे नाही. आप्त म्हणजे विद्वान, हितचिंतक व सत्यभाषी व्यक्ती. एक व्यक्ती अशी असेल आणि त्या व्यक्तीने प्रत्यक्ष व अनुमानाद्वारे ईश्वरास सिद्ध केले असेल तर त्याच्या 'उपदेशास' स्वीकारणे आमचे कर्तव्य आहे. हाच शब्द-प्रमाणाचा उपयोग आहे. एक ऋषी जेव्हा म्हणतो की,

'त्वमेव प्रत्यक्षं ब्रह्मासि'

म्हणजे 'तू प्रत्यक्ष ब्रह्म आहेस' आणि तो आम्हास ईश्वराविषयी उपदेश करीत असेल तर न मानण्यास कारण तरी कोणते? एक प्रश्न उद्भवू शकतो. तो म्हणजे आम्ही या व्यक्तीस-उपनिषद्‌कारास 'आप्त' समजत नाही. ही बाब वेगळी आहे. इथे प्रश्न हा नाही की, अमुक ऋषी

  

आप्त आहे की नाही? प्रश्न हा आहे की, शब्दप्रमाणाद्वारे ईश्वराची सिद्धी करता येते की नाही? येथे याचे उत्तर देण्यात आले आहे. मुख्य प्रश्न आप्तत्वाविषयीचा आहे. एका व्यक्तीस सर्वच जण आप्त समजू शकत नाहीत. जे त्यास आप्त समजत नाहीत त्यांनी त्यांच्या आप्तत्वाविषयी शंका करावी आणि ईश्वरास अनुमानाद्वारे सिद्ध करावे. पण शब्द- प्रमाणाशिवाय आजपर्यंत कोणाचेच काम पार पडले नाही, पडू शकणार नाही. त्याचे कारण हे की, अनुमानासाठी 'कार्या'चे प्रत्यक्ष आवश्यक आहे. पण शब्दासाठी कार्य व कारण या दोन्हींचे प्रत्यक्ष असण्याची मुळीच आवश्यकता नाही. जी व्यक्ती आप्ताच्या उपदेशाद्वारे लाभ मिळवू इच्छिते, ती असे समजते की, त्या आप्तपुरुषाने प्रत्यक्ष किंवा अनुमानाद्वारे ती बाब सिद्ध केली आहे. माझा त्यावर विश्वास आहे म्हणून मी त्याचे म्हणणे स्वीकारतो.

जगात अशी कामे फारच कमी आहेत, ज्यासाठी प्रत्येक वस्तूच्या प्रत्यक्षाची आवश्यकता भासते. माझ्या मते असे काम एकही नाही. म्हणून अनेकांना अनुमानासाठीसुद्धा एका भागाचे प्रत्यक्ष होणे आवश्यक आहे. अधिकांश व्यक्ती एका भागाचेसुद्धा प्रत्यक्ष करू शकत नाहीत. म्हणून शब्द प्रमाणाचाच आश्रय घ्यावा लागतो. न्यूटनने पृथ्वीची गुरुत्वाकर्षणशक्ती डोळयाने पाहिली नाही. त्यास झाडावरून फळ खाली पडत असलेली घटना दिसली. पण त्याने अनुमान प्रमाणाद्वारे पृथ्वीची गुरुत्वाकर्षणशक्ती सिद्ध केली. गॅलिलियोनेसुद्धा पृथ्वी वर्तुळाकार किंवा नारिंगी आकाराची असल्याचे प्रत्यक्ष पाहिले नाही. केवळ अनुमानच केले. सर्वसाधारण व्यक्तींना तर परीक्षण करण्याचीही संधी सापडत नाही. म्हणून जगविख्यात वैज्ञानिकांनाच आप्त समजून व्यवहार करावा लागतो. वैद्य-चिकित्सक अध्ययन करीत असताना 'अमुक प्रकारच्या ज्वरामध्ये नाडीची गती अमुक प्रकारची असते' हे प्रत्यक्ष पाहतात. आता तो एका रोग्यास पाहतो आणि त्याच्या नाडीच्या गतीवरून त्यास अमुक प्रकारचा ताप असेल असे तो अनुमान करतो. त्या रुग्णाजवळ बसून ज्वर व नाडीच्या संबंधात प्रत्यक्षपणे पाहण्यास त्यास वेळ नाही. प्रत्यक्षाची अवस्था वैद्यक विद्यालयात शिकत असताना होती. आता अनुमानाची अवस्था आहे. पण रुग्णाची सेवा करणाऱ्यांना ताप व नाडीची गती यांच्याशी कसलाही संबंध नाही. त्यांच्यासाठी शब्द प्रमाण एकच प्रमाण आहे. वैद्याच्या म्हणण्यावर पूर्णपणे विश्वास ठेवतात एवढेच.

आता आणखी एक प्रश्न शिल्लक राहतो तो हा की, एखाद्यास ईश्वराचा प्रत्यक्ष होऊ शकत नाही? आम्ही वर दाखवून दिले आहे की, काही जण ईश्वरास प्रत्यक्षाद्वारे जाणता येते असे सांगतात. त्या व्यर्थच्या गप्पा आहेत असे का समजावे? जी बाब अनुमानाद्वारे सिद्ध होऊ शकते तीच बाब एखाद्यास प्रत्यक्षाद्वारे सिद्ध होणे शक्य आहे. याचा अर्थ हा नव्हे की, प्रत्येकाने ईश्वरास प्रत्यक्षाद्वारे जाणलेच पाहिजे, अशी सक्ती करावी. पण ज्यांनी प्रत्यक्ष अनुभवाद्वारे जाणले त्यांना लबाड ठरविण्याचा अधिकारही त्यास नाही. अनुमानाद्वारेही ईश्वराचे न होणे जोवर सिद्ध केले जात नाही तोवर तरी आस्तिकांच्या आस्तिकतेला नावे ठेवता येणार नाहीत.

आम्ही वर सांगितले आहे की, ईश्वरास सर्वजण प्रत्यक्षाद्वारे जाणू शकत नाहीत. पण ज्यांनी

तर्क किंवा प्रमाणांचा वापर करणे पद्धतशीरपणे जाणले आहे त्यांच्याकरिता ईश्वर ही असिद्ध वस्तू नाही. ईश्वराच्या प्रत्यक्षाविषयी महर्षी दयानंद सातव्या समुल्लासात लिहितात :

**प्रश्न** : आपण ईश्वर आहे म्हणता पण त्याची सिद्धी कशा प्रकारे करता?

**उत्तर** : प्रत्यक्षादी सर्व प्रमाणाद्वारे.

**प्रश्न** : ईश्वराच्या सिद्धीसाठी प्रत्यक्षादी प्रमाण कार्य करू शकत नाहीत.

**उत्तर** : इन्द्रियार्थसन्निकर्षोत्पन्नं ज्ञानमव्यपदेश्यमव्यभिचारिव्यवसायात्मकं प्रत्यक्षम्
|| न्याय. अ. १ सु. ४||

हे गौतम महर्षीकृत न्यायशास्त्राचे सूत्र आहे. श्रोत्र, त्वचा, नेत्र, जिव्हा, नासिका व मन या इंद्रियांचा शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध, सुख-दुःख, सत्यासत्य विषयांशी संबंध झाल्यामुळे जे ज्ञान उत्पन्न होते ते प्रत्यक्ष ज्ञान आहे. पण ते भ्रांतिरहित असावे. आता विचार करणे आवश्यक आहे. इंद्रिये आणि मन यांद्वारे गुणांचा प्रत्यक्ष होतो, गुणीचा नव्हे. ज्याप्रमाणे त्वचा वगैरे इंद्रियांद्वारे स्पर्श आदींचे ज्ञान झाल्यामुळे पृथ्वी जी गुणी आहे तिचा आत्मायुक्त मनाद्वारे प्रत्यक्ष केला जातो, त्याचप्रमाणे या प्रत्यक्ष सृष्टीत रचनाविशेष व ज्ञानादी गुणांच्या प्रत्यक्षामुळे परमेश्वराचाही प्रत्यक्ष होतो. स. प्र./ समु. ७.

महर्षींच्या तर्कात फारसा स्पष्टपणा नाही. कारण रचनाविशेष इत्यादि गुणांच्या प्रत्यक्षामुळे 'परमेश्वराचा' सुद्धा प्रत्यक्ष होत असेल तर घड्याळाच्या रचना विशेषाच्या प्रत्यक्षामुळे घड्याळ बनविणारासुद्धा प्रत्यक्ष दिसला पाहिजे. असे होत नाही. म्हणून ही युक्ती सर्व नैय्यायिकांनी प्रत्यक्ष प्रमाणान्तर्गत न ठेवता अनुमानान्तर्गत ठेवले आहे; पण शुद्ध आत्म्यांना ईश्वराचा दिसणाऱ्या जगांप्रमाणे प्रत्यक्ष होतो, या तिळमात्रही शंका घेण्याचे कारण नाही. योगशास्त्रात म्हटले आहे की :

तदा द्रष्टुः स्वरूपेऽवस्थानम् || योग. समाधिपाद

योगमार्गात प्राविण्य संपादन केल्यावर जीवात्मा ईश्वराचा (प्रत्यक्ष) अनुभव घेऊ लागतो, त्यावेळी त्यास सृष्टिरचनेद्वारे ईश्वराच्या सिद्धीची आवश्यकता भासत नाही. पण ही अवस्था सर्वांची असणे शक्य नाही. केवळ योगीजनांचीच असते.

गुणांच्या प्रत्यक्षामुळे गुणीचे प्रत्यक्ष होते हे बरोबर आहे. पण ईश्वराच्या सर्व गुणांचे प्रत्यक्ष होत नाही. आम्ही त्या गुणांचे अनुमान करतो. सृष्टिरचना गुण नव्हे, कर्म आहे. या कर्माद्वारे आम्ही ईश्वराच्या ज्ञानरूपी गुणाचे अनुमान करतो म्हणून ज्ञानी ईश्वर जो गुणी (गुणयुक्त) आहे त्याचे सुद्धा अनुमान होतेच. याच प्रकारे ईश्वराच्या दयाळूपणास आम्ही ईश्वराच्या क्रियेआधारे अनुमानप्रमाणाद्वारे सिद्ध करतो. पण ज्या व्यक्ती ईश्वराच्या अस्तित्वाविषयी पूर्णपणे विचार करू इच्छितात आणि ज्यांचा 'तज्जपस्तदर्थभावनम्' नित्य नियम आहे ते ईश्वराच्या दयाळूपणास क्षणोक्षणी प्रत्यक्षतः अनुभवू शकतात. त्यांची दृष्टी उपकारापासून उन्नत होत जाऊन उपकारकर्त्यावर जाऊन स्थिरावते. हीच आस्तिकतेची परमावस्था आहे. बहुतेक याच अर्थाने महर्षी

  

दयानंदांनी म्हटले आहे.

"जेव्हा जीवात्मा शुद्ध होऊन परमेश्वराच्या विचारामध्ये तत्पर होतो तेव्हा त्यास त्याच वेळी दोन्ही जीव व ईश्वर प्रत्यक्ष होतात." (स. प्र. समु. ७)

महर्षी दयानंदांनी 'दोन्ही' शब्दाचा प्रयोग केला आहे- 'याचा अर्थ आहे' जीवात्मा व परमात्मा'. कारण सर्वसाधारणपणे मनुष्यास स्वतःचे म्हणजे जीवाचेसुद्धा प्रत्यक्ष होत नाही. त्याची इंद्रिये बहिर्मुख असल्यामुळे तो सृष्टीच्या पदार्थातच लिप्त राहतो. डोळे सुंदरतेकडे, कान मंजुळ शब्दाकडे, जिव्हा स्वादिष्ट पदार्थाकडे, नासिका सुगंधाकडे, त्वचा सुखद स्पर्शाकडे आकर्षिली जात असते. मन हे विचार, कल्पना, स्मृती, भावना या सर्वांनी आच्छादिलेले असते. केवळ योगावस्थेतच 'चित्ताच्या प्रवृत्त्यांचा निरोध होतो व जीवात्म्यास स्वतःच्या व ईश्वराच्या प्रत्यक्ष अनुभवाची संधी मिळते. त्याच वेळी जीवास हेही प्रत्यक्ष होते की, अशुभ कर्म करताना आत्म्यातून भीती, शंका, लज्जा व शुभ कर्म करताना निर्भय, निःशंकता व आनंदोत्साह उत्पन्न होतो. तो जीवाकडून नसून परमेश्वराकडून आहे.

ही लज्जा आणि उत्साह सर्वांच्याच हृदयात उत्पन्न होतात. पण उपदेश कोण करीत आहे याची जाणीव सर्वांना होत नाही. दूरवरच्या वस्तूचा सुगंध सर्वांनाच जाणवतो पण जाणकारासच नेमक्या कोणत्या फुलाचा सुगंध आहे हे जसे कळते तसे आस्तिकांनाच अंतर्निहित उपदेश कोणाचा आहे हे कळून येते. हे समजणेच खरी आस्तिकता आहे.

## सहावी शंका

वेदांती (अद्वैतवादी) ईश्वरास सृष्टीचे निमित्तकारण (Efficient Cause) मानीत नाहीत. हे केवळ नैय्यायिक मत आहे. या मतावर खालील शंका होऊ शकतात.

१. संपूर्ण सृष्टी बनविलेली आहे हे सिद्ध करणे कठीण आहे. सृष्टीचे वेगवेगळे अवयव बनलेले असणे शक्य आहे. पण जी गोष्ट अवयवांमध्ये आढळून येते तीच अवयवीमध्ये सुद्धा आढळेलच असा काही नियम नाही. उदाहरणासाठी, वाऱ्याच्या गिरणीचे अवयव फिरतात. पण जाते मात्र स्वतः फिरत नाही.

२. आमचे ज्ञान परिमित आहे. परिमित ज्ञानाद्वारे "जगामध्ये एकही वस्तू अशी नाही जी बनविली गेली नाही" असे कसे म्हणता येईल? न बनविलेली वस्तूसुद्धा असणे शक्य आहे.

३. नैय्यायिक स्वतः परमाणू, देश, काळ व आत्मा यांना नित्य मानतात. मग ईश्वर सर्वांचा बनवणारा कसा होऊ शकतो. या वस्तूंना सोडून इतर वस्तूंना ईश्वर बनवतो असे म्हणाल तर तो सर्वज्ञ आणि सर्वशक्तिमान कसा राहू शकतो?

४. कर्ता होण्यासाठी इच्छा असणे आवश्यक आहे. इच्छा असेल तर सुख-दुःखही असेल. मग ईश्वर इतर जीवांप्रमाणे होईल.

५. सृष्टीस कार्य सिद्ध करणे कठीण आहे. कारण, कार्य आणि कारण सापेक्षिक असतात. जोपर्यंत ईश्वरास कारण सिद्ध करणार नाही तोपर्यंत सृष्टीस 'कार्य' सिद्ध करू शकत नाही आणि

जोपर्यंत सृष्टी 'कार्य' सिद्ध होऊ शकत नाही. तोपर्यंत ईश्वर 'कारण' सिद्ध होऊ शकत नाही. अशा प्रकारे अन्योन्याश्रय दोष उत्पन्न होते.

वरील सर्व शंका निराधार आहेत. मग ती वेदांती लोकांची असो की इतर कुणाची असो. खरे पाहता, वेदांताचा सिद्धांत तोच आहे ज्याचे प्रतिपादन आम्ही आरंभापासून करीत आहोत. स्वतःस वेदांती म्हणवून घेणाऱ्यांच्या सिद्धांतामध्ये आणि वास्तविक सिद्धांतामध्ये फार मोठा फरक आहे.

१. तत्त्ववेत्त्यांच्या दृष्टीने पहिली शंका निराधारच नसून हास्यास्पदही आहे. ज्या अवयवींच्या एका अवयवामध्ये परिवर्तन होते तो अवयवी परिवर्तनशील समजला जातो. शरीराच्या एका अवयवामध्ये रोग झाल्यावर संपूर्ण शरीरच रोगी आहे असे आपण म्हणतो. वाऱ्याच्या गिरणीचा दृष्टांत येथे देणे बरोबर नाही. सृष्टीचा प्रत्येक घटक बनत, बिघडत असताना आम्ही पाहतो. वृक्षाची एक फांदी बनते आणि बिघडते. त्याचप्रमाणे संपूर्ण वृक्षसुद्धा बनतो आणि बिघडतो. वृक्षाप्रमाणे बगीचे, बागेप्रमाणे देश किंवा नगर, देशाप्रमाणे भूमंडळ, भूमंडळाप्रमाणे ब्रह्मांडसुद्धा बनतात व बिघडतात. सृष्टी समष्टिरूपात बनलेली नसून केवळ तिचे अवयवच बनलेले आहेत असे म्हणणे वास्तविक नाही.

२. परिमितज्ञानाच्या आधारावर काही घटना अशाही असू शकतात की, ज्यांना कारण असणे आवश्यक नाही, असे समजणे बुद्धी संगत मुळीच होऊ शकत नाही. शंका करण्यासाठी अशा प्रकारचे एकसुद्धा उदाहरण किंवा प्रमाण आढळून येत नाही. सीमित ज्ञानाच्या आधारावर एखाद्या अज्ञात द्वीपामध्ये किंवा बेटावर सोंड असलेले मनुष्य असतील किंवा एखादा प्राणी कानाद्वारे जेवण करीत असेल असेही तुम्ही समजता काय?

३. घटना व कार्यवस्तू यांचे कारण असणे आवश्यक आहे. जी वस्तू संयुक्त आहे ती केव्हा ना केव्हा संयुक्त झाली असेल आणि त्या संयुक्त होण्याच्या घटनेचे एखादे का? नक्कीच असेल. जे पदार्थ दोन किंवा अधिक परमाणूंच्या संयोगाने बनले नाहीत, जसे देश, काळ, परमाणू त्यांना 'घटने'च्या श्रेणीत ठेवता येत नाही. म्हणून या पदार्थांना नित्यच मानावे लागेल.

या पदार्थांना नित्य स्वीकारल्यामुळे ईश्वराच्या सर्वज्ञतेत, सर्वशक्तिमत्तेत कोणताही दोष आढळून येऊ शकत नाही. सर्वज्ञतेचा अर्थ सर्वांचे ज्ञान बाळगणारा असा आहे.

जी वस्तू जशी आहे तशी जाणणे ज्ञान आणि त्याच्या उलट जाणणे अज्ञान. ईश्वर बनलेल्या वस्तूस बनलेल्या वस्तूप्रमाणे बनलेली नसेल तर ती जशी आहे तशी जाणतो. त्याच्या सर्वज्ञतेचे खंडन कसे होऊ शकते? त्याच्या सर्वशक्तिमत्तेचा सर्वात मोठा पुरावा हाच आहे की, तो या नित्य पदार्थांना ज्या विशिष्ट पद्धतीत संयुक्त करू इच्छितो, तसे करतो. देश, काळ, परमाणू, आत्मा ही सर्व सृष्टिनिर्मितीची सामग्री आहे. आणि ती परमेश्वराच्या नियमाबाहेर जाऊ शकत नाही. मी अमुक शरीरातच राहतो असे जीवात्मा म्हणू शकत नाही. मृत्यूची वेळ येऊन ठेपली म्हणजे अत्यंत प्रिय असलेले शरीरसुद्धा सोडून जाणे भाग पडते. आम्ही परस्पर संयुक्त होणार नाही किंवा संयुक्त होऊन अमुक वस्तू बनविणार नाही, असे परमाणू म्हणू शकत नाहीत.

४. कर्त्यासाठी इच्छा असणे आवश्यक आहे. पण इच्छा स्वाभाविक असेल तर तिच्या पूर्तीमुळे सुख-दुःख काहीच होणार नाही. मी स्वाभाविकपणे श्वास घेतो. श्वास घेण्यामध्ये मला सुखाचा अनुभव होत नाही. जेव्हा स्वभावामध्ये अडथळा निर्माण होतो तेव्हा श्वास थांबल्यामुळे दुःख होते. त्याचप्रमाणे ईश्वराच्या स्वाभाविक इच्छेमध्ये कुणीही अडथळा निर्माण करू शकत नाही आणि म्हणून त्यास दुःखही होऊ शकत नाही. जीवांना सुख-दुःखे केव्हा होतात या विषयी लोकांना माहिती नाही. इच्छित वस्तू जवळ नसेल आणि परिश्रमाद्वारे मिळत असेल तर सुख आणि मिळविण्यात अडथळा आला म्हणजे दुःख होते. ईश्वराजवळ सर्वच वस्तू आहेत. त्या वस्तूंना ईश्वरापासून दूर सारणारा कोणीच नाही. म्हणून ईश्वरामध्ये सुख आणि दुःख दोन्ही नाहीत.

५. कार्य आणि कारण नक्कीच सापेक्षिक (Relative) आहेत. पण कार्याचे कार्यत्व सिद्ध करण्यासाठी कारणाची आवश्यकता नाही. कार्याच्या कार्यत्वास उत्पन्न करण्यासाठी मात्र कारणाची आवश्यकता आहे. कुंभारास न पाहताच माठास पाहून माठ हे कार्य आहे हे मी सिद्ध करू शकतो. एखाद्या वस्तूचे 'कार्य' असण्याचे ज्ञान त्या वस्तूस पाहून होते. आणि जेव्हा ती 'कार्य' सिद्ध होते तेव्हा अनुमान प्रमाणाद्वारे त्याचे एखादे कारण असणेही सिद्ध होतेच.

ईश्वरास सृष्टीचे निमित्तकारण स्वीकारण्याविषयी कोणतीच शंका उद्भवू शकत नाही. पण ईश्वरास उपादान कारण (Material Cause) स्वीकारल्यामुळे अनेक अडचणी उपस्थित होतात. (नवीन वेदांती) अद्वैतवादी परमेश्वरास सृष्टीचे उपादान कारण स्वीकारतात. आम्ही इथे काहींचे वर्णन करतो.

१. उपादान कारण दोन प्रकारचे आहेत. पहिला : दोन किंवा अधिक वस्तूंच्या संयोगाने तिसरी वस्तू बनणे. उदा. अनेक सुटे भाग मिळून घड्याळ तयार होणे. मातीचे व पाण्याचे अनेक परमाणू मिळून माठ तयार होणे. दुसरा : एकाच वस्तूमध्ये परिवर्तन होऊन दुसरी वस्तू बनणे. पाण्यापासून बर्फ, घन तुपाचे द्रव तूप होणे. या दुसऱ्या प्रकारामध्ये सुद्धा उपादान कारण एक वस्तू नाही, अनेक वस्तू आहेत. अशा प्रकारे दोन्ही प्रकारांना एकच स्वरूप दिले जाऊ शकते ते म्हणजे एखाद्या कार्याचे उपादान कारण एक वस्तू नसून अनेक वस्तू असाव्या लागतात. जर एकच वस्तू असेल तर त्यापासून दुसरी वस्तू बनूच शकत नाही. लाकडाचे अनेक तुकडे नसतील तर मेज, खुर्ची कशी बनू शकते? मातीचे अनेक परमाणू नसतील तर माठ कसा बनू शकतो? तुपाचे किंवा पाण्याचे अनेक परमाणू नसते तर त्यांच्यामध्ये प्रसरण व आकुंचन कसे झाले असते? संयोग किंवा वियोग, आकुंचन व प्रसरण जोपर्यंत होणार नाही तोपर्यंत दुसरी वस्तू बनूच शकत नाही. यावरून हाच निष्कर्ष निघतो की, 'एक' ब्रह्म सृष्टीचे उपादान कारण होऊ शकत नाही.

२. उपादान कारण परिवर्तनशील असले पाहिजे. ब्रह्म हे एकरस आणि अखंड आहे असे तुम्ही मानता. मग त्यात परिवर्तन कसे होऊ शकते? परिवर्तनशील ईश्वर ईश्वरच होऊ शकत नाही. 'एकं ब्रह्म द्वितीयं नास्ति' केवळ ब्रह्म एकच आहे. दुसरी वस्तूच विश्वामध्ये नाही असे स्वीकारणारे हा विचार करीत नाहीत की, ईश्वराशिवाय दुसरी कोणतीच वस्तू नसेल तर

ईश्वरामध्ये परिवर्तन-बदल होण्यासाठी ईश्वरापेक्षा भिन्न असे दुसरे कारण असले पाहिजे. वस्तू दोन कारणांमुळे परिवर्तित होते- बदलते. एक त्या वस्तूत अपूर्णता किंवा आवश्यकता असावी. दुसरे इतर एखादी वस्तू त्यात बदल घडविण्यास कारण व्हावी. या दोन्ही बाबी वेदांती ब्रह्मामध्ये स्वीकारीत नाहीत.

३. शुद्धचेतन ब्रह्म परिवर्तित होऊन अचेतन विश्व कसे बनू शकते? विश्वामध्ये आम्ही जड (अचेतन) व चेतन दोन्ही पाहतो. जड (अचेतन) वस्तूच नाही. केवळ चैतन्याचा अभावमात्र आहे असे म्हणाल तर चैतन्याचा अभाव तरी का झाला? अभाव किंवा तिरोभाव (दृष्टिआड होणे) होण्यासाठीसुद्धा कोणते तरी कारण असणे आवश्यक आहे. आम्ही श्री शंकराचार्यांच्या शारीरिक भाष्यातून काही उद्धरणे देत आहोत, जी ईश्वरास सृष्टीचे उपादान कारण ठरवीत नाहीत.

१. उत्पत्तिमत्वे हि जीवस्यानित्यत्वादयो दोषाः प्रसज्येरन्।

ततश्च नैवास्य भगवत्प्राप्तिर्मोक्षः स्यात् कारणप्राप्तौ कार्यस्य प्रविलय प्रसङ्गात्। २।२।४२

जीव ईश्वरापासून बनला असता तर तो अनित्य असता आणि त्यास मोक्षही प्राप्त होऊ शकला नसता. कारण, कार्य कारणामध्ये विलीन होत असते.

२. ईश्वरस्तु पर्जन्यवद् द्रष्टव्यः । यथा हि पर्जन्यो व्रीहियवादिसृष्टौ साधारणं कारणं भवति, व्रीहियवादिवैषम्ये तु तत्तद् बीजगतान्येवासाधारणानि सामर्थ्यानि भवन्ति, एवमीश्वरो देवमनुष्यादिसृष्टौ साधारण कारणं भवति । २.१.३४

ईश्वर ढगाप्रमाणे साधारण कारण आहे. साळी, गहू इत्यादींच्या उत्पत्तीसाठी ढग साधारण कारण होतात आणि साळी व गव्हाच्या विकृतीसाठी असाधारण कारण त्यांच्या बियांमध्ये असते. याचप्रमाणे सृष्टीचे साधारण कारण ईश्वर आहे.

३. तस्मादस्त्यविकृतं ब्रह्म । २।१।२७.

म्हणून ब्रह्म विकाररहित आहे. सृष्टी 'ब्रह्म' पासून बनलेली नाही. कारण ब्रह्म अविकृत आहे.

४. ननु मृदादिदृष्टांतप्रणयनात् परिणामवद् ब्रह्म शास्त्रस्याभिमतमिति गम्यते। परिणामिनो हि मृदादयोऽर्थ लोके समधिगता इति । नेत्युच्यते : ' स वा एव महानज आत्मा ऽ जरो ऽमरो ऽमृतो ऽभयो ब्रह्म' (बृ.४.४.२५) 'स एष नेति नेत्यात्मा' (बृ.३.९.२६) अस्थूलमनणु (बृ.३.८.८) इत्याद्याभ्यः सर्व विक्रियाप्रतिषेधश्रुतिभ्यो ब्रह्मणः कूटस्थत्वावगमात्। ने ह्येकस्य ब्रह्मणः परिणामधर्मत्वं च शक्यं प्रतिपत्तुम् । स्थितिगतिवतस्यादिति चेत्, नः कूटस्थस्येति विशेषणात् । न हि कूटस्थस्य ब्रह्मणः स्थितिगतिवदनेकधर्माश्रयत्वं संभवति ।।२।१।१४।।

मातीच्या दृष्टांताद्वारे असे दिसून येते की, शास्त्रामध्ये ब्रह्म परिणामी मानण्यात आला आहे. कारण जगामध्ये माती वगैरे पदार्थ परिणामी समजले जातात. उत्तरादाखल श्री शंकराचार्य विरोध प्रगट करतात. ते म्हणतात "ब्रह्म महान्, अज, आत्मा, अजर, अमर, अमृत व अभय आहे असे शास्त्रांमध्ये वर्णिले आहे. (बृह.) 'तो आत्मा असा नाही' (बृ.) 'तो स्थूलही नाही आणि अणूही नाही.या सर्व विकृतीचा निषेध करणाऱ्या वचनांद्वारे ब्रह्म कूटस्थ आहे हे सिद्ध आहे. एकच ब्रह्म

परिणामी आणि अपरिणामी असणे शक्य नाही. ज्याप्रमाणे एकच वस्तू केव्हा चालते आणि केव्हा केव्हा चालतही नाही, त्याचप्रमाणे ब्रह्मसुद्धा आहे' असे म्हणाल तर तेही बरोबर नाही. कारण 'ब्रह्म' 'कूटस्थ' आहे असे म्हटले आहे. कूटस्थ 'ब्रह्म' मध्ये स्थिती आणि गतीसारखे अनेक धर्म असू शकत नाहीत.

श्री शंकराचार्यांनी (वेदांतदर्शन २।१।२४) ''उपसंहारदर्शनान्नेति चेन्न क्षीरवद्धि'' या सूत्राचे भाष्य करताना 'ब्रह्म' दुधासारखा परिणामी आहे असे दाखवले आहे. हे बरोबर नाही. सूत्र २।१।१४ मध्ये त्यांनी जे विवेचन केले त्यास विरोधही होतो. आम्ही इथे त्यांची संपूर्ण व्याख्या अगोदर देऊन नंतर त्याचे परीक्षण करू. यावरून श्री शंकर परस्पर विरुद्ध लिखाण कसे करतात ते दिसून येईल. ते लिहितात :

''चेतनं ब्रह्मैकमद्वितीयं जगतः कारणमिति यदुक्तं तन्नोपपद्यते । कस्मात्? उपसंहार दर्शनात् । इह हि ......... स्वाभाविकी ज्ञानबलक्रिया च श्वेताश्वे. ६।८ इति तस्मादेकस्यापि ब्रह्मणो विचित्रशक्तियोगात् क्षीरादिवद् विचित्र परिणाम उपपद्यते ।।

वाचकांच्या सुलभतेसाठी याचे भाषांतर आम्ही अनेक विभागात करीत आहोत. एका विभागाची दुसऱ्या विभागाशी तुलना करणे सोपे जाईल.

१. एक अद्वितीय चेतन ब्रह्म जगाचे कारण आहे हे बरोबर नाही. का? साधनांची आवश्यकता दिसून येत असल्यामुळे जगामध्ये दिसून येते की, कुंभार माठ आणि विणकर वस्त्रनिर्मितीसाठी माती, काठी, चाक, दोरा इत्यादी अनेक साधनांना एकत्र करतात आणि मग कार्य करतात. ब्रह्म एक आणि असहाय आहे. त्याच्याकडे साधने नाहीत म्हणून तो स्रष्टा कसा होऊ शकतो? म्हणून ब्रह्म जगाचे कारण नाही. (ही शंका आहे)

२. (शंकराचार्य या शंकेचे निरसन करीत आहेत.) हा दोष आढळून येत नाही. दुधाप्रमाणे वस्तू स्वाभविकपणे उत्पन्न होतात. दूध किंवा पाणी स्वतःच दही किंवा बर्फ झालेले आम्ही पाहतोच. बाह्यसाधनांची अपेक्षा बाळगत नाहीत. तसेच इथेही घडून येईल.

३. दूध वगैरेपासून दही वगैरे बनविण्यासाठी उष्णता वगैरे बाह्य साधने आहेत. तर मग दूध वगैरेचा दृष्टांत कसा लागू होऊ शकतो? असे म्हणाल तर.

४. हा दोष आढळून येत नाही. दूध ज्या आणि जेवढ्या परिणाममात्रेचा अनुभव करते तेवढेच गर्मीमुळे दही बनते. दुधामध्ये स्वतःच दही होण्याचा स्वभाव नसता तर गर्मीमुळेसुद्धा दही बनले नसते. उदा. वायू किंवा आकाश गर्मीमुळे दही बनत नाहीत. साधन-सामग्रीमुळे अल्पशक्ती असलेले दूध पूर्णत्वास प्राप्त करते.

५. पण ब्रह्म परिपूर्ण शक्तियुक्त आहे. तो दुसऱ्या कोणापासून शक्ती प्राप्त करीत नाही.

६. 'श्रुति' सुद्धा आहे.' 'ब्रह्म'चे कारणही नाही, कार्यही नाही, त्याच्या बरोबरीचाही कोणी नाही. त्याच्यापेक्षा मोठाही कोणी नाही. त्याची शक्ती फार मोठी व अनेक प्रकारची आहे. त्याचे ज्ञान, बळ व क्रिया स्वाभाविक आहेत. श्वेता. ६/८.

७. म्हणून एकच ब्रह्म शक्तिवैचित्र्यामुळे दूध वगैरे ज्याप्रमाणे विशिष्ट परिणाम दर्शवितात तसे ब्रह्महो परिणाम दर्शविते.

श्री शंकराचार्यांच्या म्हणण्याचे थोडे परीक्षण केले तर त्यांनी शेवटी ब्रह्म परिणामी आहे असे सिद्ध केले आहे. पूर्वी ब्रह्म अविकृत, कूटस्थ आहे म्हणून सांगितले. नंतर 'दुधापासून दही' असे उदाहरणही त्यांनीच दिले. याशिवाय 'श्रुति' म्हणजे उपनिषदांच्या वचनाचाही विरोध होतो. कारण 'ब्रह्म'चे कोणतेच कार्य किंवा कारण नाही. करणही (साधन) नाही.

सूत्राचा सरळ अर्थ असा आहे की 'दूध किंवा पाणी यापासून दही किंवा बर्फ बनविण्यासाठी कोणत्याही अशा साधनांची गरज भासत नाही, जशी माठाच्या निर्मितीत चाक, काठी किंवा दोरा वगैरेंची भासते. दुधा किंवा पाण्याप्रमाणेच ईश्वरास प्रकृतीच्या परमाणूंना सृष्टी बनविण्यासाठी कोणत्या साधनांची आवश्यकता नाही. पण श्री शंकराचार्यांना प्रकृतीचे खंडन व अद्वैताची सिद्धी - केवळ एकच ब्रह्म आहे, करावयाची होती. म्हणून त्यांनी उपसंहारादाखल 'माती' सुद्धा समाविष्ट केली. आणि त्यामुळे केवळ आपल्याच कथनाच्या विरुद्ध नव्हे तर श्वेताश्वेतर उपनिषदाच्या वाक्याचा विरोध केला.

५. मृदादिष्वपि कुम्भकाराद्यधिष्ठितेषु विशिष्टाकाररचना दृश्यते तद्वत् प्रधानस्यापि चेतनान्तराधिष्ठितत्वप्रसङ्गः ।

कुंभार वगैरे कर्त्याच्या देखरेखीखाली माठ बनविले जातात. याचप्रकारे एखाद्या इतर चेतनशक्ती अधिष्ठातृत्वामध्ये प्रकतीपासून सृष्टीची रचना होते.

६. मृदादयो रथादयो वा स्वयमचेतनाः सन्तश्चैतनैः कुलालदिभिरश्वादिभिर्वानधिष्ठिता विशिष्टकार्याभिमुखप्रवृत्तयो दृश्यन्ते दृष्टाच्चादृष्टसिद्धिः अतः प्रवृत्त्यनुपपत्तेरपि हेतौ अचेतनं जगत्कारणं अनुमातव्यं भवति । ननु चेतनस्यापि प्रवृत्तिः केवलस्य न दृष्टा, सत्यमेतत्। तथापि चेतनसंयुक्तस्य रथादेरचेतनस्य प्रवृत्तिर्दृष्टा, नत्वचेतनसंयुक्तस्य चेतनस्य प्रवृत्तिर्दृष्टा ।

माती किंवा रथ वगैरे स्वतः अचेतन- क्रियाशून्य आहेत आणि ते कुंभार किंवा घोडे इत्यादी चेतनांच्या आश्रयाशिवाय काहीच कार्य करू शकत नाहीत. याचप्रकारे क्रिया करण्याचा स्वभाव नसल्यामुळे कोणतीही अचेतन वस्तू जगाचे निमित्त कारण होऊ शकत नाही. केवळ चेतनाची सुद्धा प्रवृत्ती दिसून येत नाही असे म्हणाल तर ते बरोबर आहे.पण चेतनाद्वारे अचेतनामध्ये क्रिया दिसून येते. अचेतनाद्वारे चेतनामध्ये दिसून येत नाही. इथे वाचकांनी 'सत्यमेतत्' वर विचार करावा म्हणजे हेतूचे प्राबल्य आणि सार्थकता यांचे महत्त्व त्यांच्या विशेष लक्षात येईल.

लोहचुंबकामध्ये स्वतः गती नसते पण ते लोखंडास गतिमान करते. त्याचप्रमाणे ईश्वर सर्वव्यापक, सर्वांचा आत्मा, सर्वज्ञ व सर्वशक्तिमान् असल्यामुळे सर्वांमध्ये गती उत्पन्न करतो.

## सातवी शंका

तुम्ही सहाव्या, सातव्या आणि आठव्या अध्यायामध्ये ईश्वराच्या गुणांचे वर्णन केले आहे. पण उपनिषदांमध्ये 'निर्गुणः केवलश्च' या वचनानुसार ईश्वरास निर्गुण म्हटले आहे असे दिसते.

निर्गुणामध्ये गुण कसे राहू शकतात?

गुण शब्द अनेक अर्थांमध्ये वापरला जातो. साधारण अर्थामध्ये गुणाची व्याख्या खालीलप्रमाणे आहे.

द्रव्याश्रय्यगुणवान् संयोगविभागेष्वकारणमनपेक्ष इति गुणलक्षणम् ।

(वैशेषिक १।२।१६)

जे द्रव्याच्या आश्रयाने राहते, ज्यामध्ये गुण राहत नाही, जे संयोग आणि विभागांचे कारण नसते, ते 'गुण' म्हटले जाते. अनेक प्रकारचे रंग, परिमाण, वजन हे सर्व गुण आहेत आणि हे वस्तूच्याच आश्रयाने राहतात. या व्याख्येनुसार गुण नसणारी वस्तू कोणतीच आढळून येऊ शकत नाही. गुणाशिवाय गुणीची ओळखच पटू शकत नाही. वेदांतशास्त्रातील खालील सूत्रात 'ब्रह्म'मध्ये असणाऱ्या गुणांचा उल्लेख केला आहे.

१. आकाशस्तल्लिङ्गात् १।१।२२
२. अत एव प्राणः १।१।२३
३. विवक्षित गुणोपपत्तेश्च १।२।२२
४. अत्ता चराचरग्रहणात् १।२।९

तिसऱ्या सूत्राचे भाष्य करताना श्री शंकराचार्य लिहितात : तदिह ये विवक्षिता गुणा उपासनायामुपादेयत्वेनोपदिष्टाः सत्यसंकल्पप्रभृतयस्ते परारस्मिन् ब्रह्मण्युपपद्यन्ते । सत्यसंकल्पत्वं हि सृष्टिस्थितिसंहारेष्वप्रतिबद्धशक्तित्वात् परमात्मन एवावकल्पते परमात्मगुणत्वेन च य आत्मापहतपाप्मा' (छा. ८।७।१)
इत्यत्र सत्यकामः सत्यसंकल्प इति श्रुतम् । आकाशात्मेत्यादिनाकाशवदात्माऽस्येत्यर्थः । १।२।२

सत्यसंकल्प वगैरे जे शुभगुण उपासनेत ग्रहण करण्यास योग्य सांगितले जातात, ते सर्व गुण परमेश्वराचे आहेत. याच अर्थामध्ये छा. उपनिषदात ब्रह्म परमेश्वरास 'अपहतपाप्मा' म्हटले आहे. यावरून ईश्वरामध्ये अनेक गुण आहेत असे सिद्ध होते. आता ईश्वरास निर्गुण का म्हणतात त्याचा विचार करू.

निर्गुण शब्दामध्ये असलेल्या 'गुण' शब्दाचा अर्थ दोन प्रकारे केला जातो.

१. पहिला साधारण अर्थ : या अर्थामध्ये ईश्वरास 'सगुण आणि निर्गुण' दोन्ही वापरले जातात. तो परमेश्वर सर्वांमध्ये व्यापक, शीघ्रकारी, अनंत, बलवान, जो शुद्ध, सर्वज्ञ, सर्वांचा अन्तर्यामी, सर्वोपरी विराजमान, सनातन, स्वतः सिद्ध परमेश्वर आपल्या जीवरूपी सनातन अनादी प्रजेस आपल्या सनातन विद्येद्वारे वस्तूंच्या सत्यस्वरूपाचे ज्ञान वेदाद्वारे करवितो.' ही सगुण स्तुती म्हणजे जे जे गुण परमेश्वरामध्ये आहेत त्या त्या गुणांद्वारे परमेश्वराची स्तुती करणे ही सगुण स्तुती आणि 'तो कधीही शरीर किंवा जन्म धारण करीत नाही, ज्यास व्रण, छिद्र होऊ शकत नाहीत, नाडी वगैरेंच्या बंधनात न येणारा, कधीच पापाचरण न करणारा, क्लेश, दुःख, अज्ञान ज्यास कधीच होत नाही वगैरे जे- जे मोहद्वेष इत्यादी गुण परमेश्वरामध्ये नाहीत त्या- त्या गुणांद्वारे

परमेश्वराची स्तुती करणे ही निर्गुण स्तुती आहे. स.प्र. समु.७.

२. 'गुण' या शब्दाचा आणखी एक अर्थ आहे. तो म्हणजे : प्रकृतीचे सत्त्व, रज आणि तम हे तीन गुण; जीवात्म्याचे अल्पज्ञत्व, अल्पसामर्थ्यत्व वगैरे गुण. या दोन्ही प्रकारच्या गुणांपासून परमेश्वर - ब्रह्म हारहित असल्यामुळे त्यास निर्गुण म्हटले जाते.

### आठवी शंका

कोणतेही मूल आपल्या आई-वडिलांपासून जन्म घेत असलेले आम्ही प्रत्यक्ष पाहतो. म्हणूनच आईस जननी आणि वडिलांस जनक म्हणतात. असे असताना ईश्वर आम्हास बनवितो असे का स्वीकारावे?

योग्य, सरळ आणि सोपे उत्तर हे आहे की, जो वस्तूस बनवतो तो त्या वस्तूस जाणतोसुद्धा. घड्याळ बनविणाऱ्यास घड्याळाच्या प्रत्येक सुट्या भागाचे ज्ञान आहे. पण आईवडिलांना आपल्या अपत्याच्या शरीरीचे मुळीच ज्ञान नाही. आईस गर्भात मुलगा आहे की मुलगी याचेदेखील ज्ञान असत नाही. यावरून हे स्पष्टपणे जाणवते की, आईवडील अपत्याच्या उत्पत्तीचे केवळ साधन आहेत. जननी व जनक शब्दांचा वापरसुद्धा गौण अर्थामध्येच केला आहे.

### नववी शंका

ईश्वर बुद्धिमान असता तर मनुष्याच्या उत्पत्तीसाठी अशी घाणेरडी, ओंगळ व पापमय पद्धती का बनविली असती? जोपर्यंत स्त्री-पुरुष व्यभिचार करीत नाहीत, तोपर्यंत त्यांना संतती होऊच शकत नाही. एवढेच नव्हे तर सर्वात वाईट गोष्ट ही आहे की, उत्पत्तीच्या वेळी मानवास घाणेरड्या जागेतून वाटचाल करावी लागते. जी मूत्राची जागा आहे तिथूनच मूल जन्म घेते. मिश्र देशाचा प्रसिद्ध तत्त्ववेत्ता प्लौटीनस (Plotinus of Socopclis) म्हणतो की, माझ्या जन्म घेण्याच्या पद्धतीचा विचार करताना लाज वाटते. यावरून असे आढळून येते की, एक तर ईश्वर सृष्टीस बनवीत नसेल किंवा तो बुद्धिमान् तरी नसेल. कान, नाक, अंगठा वगैरे अवयवाद्वारे संतानोत्पत्तीची व्यवस्था ईश्वरास करावयास पाहिजे होती.

ही शंका करणारे मुळीच विचार करीत नाहीत, पाप, घाणेरडेपणा व व्यभिचार कशास म्हणतात हे त्यांना माहीत नाही. पाप-पुण्याविषयी आम्ही बरेचसे लिहिले आहे. संतानोत्पत्तीसाठी स्त्री आणि पुरुषाच्या विधिपूर्वक संबंधास व्यभिचार म्हणत नाहीत. ते पापही नव्हे. गृहस्थाश्रमाच्या मुख्य कर्तव्यांमध्ये 'संतानोत्पत्तीसाठी पती-पत्नींनी परस्पर संभोग करणे' हेही एक मुख्य कर्तव्य आहे. विषयवासनेने संभोग करणे पाप व व्यभिचार आहे. शरीराचा उत्कृष्ट भाग असलेल्या मस्तिष्काच्या विकासासाठी शरीरामध्ये वीर्याची उत्पत्ती होते आणि याच श्रेष्ठ वस्तूद्वारे अपत्याचे शरीर बनते. म्हणून वीर्याचा सदुपयोग मस्तिष्क विकासासाठी किंवा संतानोत्पत्तीसाठीच व्हावा. याशिवाय दुरुपयोग करणे पाप व व्यभिचार आहे.

स्त्री-पुरुषाच्या संयोगाद्वारे संतानोत्पत्तीचे विधान ईश्वराने बनविले नसते तर वेग-वेगळ्या मनुष्यांमध्ये संबंधच स्थापित होऊ शकला नसता. भाऊ, बहीण, बाबा, मामा, काका, वगैरे सर्व

संबंध जे मानवसमाजासाठी डिंकाचे काम करतात, ते सृष्टी-उत्पत्तीच्या वर्तमान पद्धतीच्या आधारावरच टिकून आहेत. वेग-वेगळे असलेले कुटुंब व जाती, ते एका आईवडिलापासून उत्पन्न झालेले आहेत म्हणूनच परस्पर संबंध ठेवतात. संतानोत्पत्तीची वर्तमान पद्धती नसेल तर सर्वच संबंध निरर्थक होतील. याच कारणामुळे विवाह संस्काराची गणना जीवनाच्या प्रमुख संस्कारामध्ये केली जाते.

आता प्रश्न आहे घाणेरडेपणाचा. मनुष्याच्या शरीराच्या बनावटीचा विचार केला असता आणि त्याच्या प्रत्येक अवयवाच्या उपयोगावर विचार केला असता यात घाणेरडेपणा मुळीच दिसून येत नाही. मळाविषयी म्हणाल तर ज्या प्रकारे मळ मूत्राशयातून निघते त्याचप्रकारे नाक, कान व तोंडातून निघते. खरे पाहता, जी वस्तू शरीरावयवांच्या निर्मितीसाठी उपयोगी पडत नाही आणि जिचे शरीरातून निघून जाणेच उपयुक्त आहे तीच वस्तू घाणेरडी आहे. पाणी किंवा जेवण यांना सर्वजण पवित्र समजतात. पण मलमूत्रसुद्धा यांचेच भाग आहेत, बाहेरून तर आले नाहीत ना, ज्या भागाचे रक्त बनते तो पवित्र आणि जे बाहेर निघते ते अपवित्र! पवित्रता आणि अपवित्रतासुद्धा सापेक्षिकच आहेत ना! मांस आणि रक्त स्पर्शासाठी, पाहण्यासाठी, खाण्यासाठी अपवित्र आहेत. पण शरीरामध्ये मात्र ही फार पवित्र वस्तू आहे. म्हणूनच तर चिकित्सक म्हणतात की, अमुक वस्तू खाल्यास शुद्ध रक्त उत्पन्न होते. 'शुद्ध रक्त' म्हणजे तरी काय? बळ देणारे रक्तच ना!

गर्भाशयाच्या घाणेरडेपणाच्या भ्रमामध्ये पडूनच पौराणिकांनी नाकातून नासिकेताची व कानातून कर्णाची उत्पत्ती झाल्याची कल्पना केली. पण, त्या बिचाऱ्यांना हे ठाऊक नाही की, कान आणि नाक यामध्ये जर ईश्वराने गर्भाशय बनवले असते तर ऐकण्याचे व गंधग्रहणाचे काम कसे चालले असते? मूल जन्म घेताना त्याचे मल-मूत्राचे अवयवही बाहेर येतात ना! असे दुर्गंधमय अवयव नाकातून किंवा तोंडातून बाहेर पडले असते तर आईस किती कष्ट सोसावे लागले असते? मूल तर त्या वेळेस अशा अवस्थेमध्ये असते की, त्यास आईच्या मूत्राशयाच्या दुर्गंधाची जाणीव सुद्धा होत नाही. त्यावेळेस त्याचे अवयव विकसित नसतात. ते जणू मूर्च्छावस्थेतच असते. म्हणून संतानोत्पत्तीची प्रचलित पद्धती ईश्वराचे बुद्धिमत्तेसच प्रगट करते. त्याच्या बुद्धिहीनतेस नव्हे.

## दहावी शंका

महर्षी कपिलनी सांख्य-शास्त्रात स्पष्ट म्हटले आहे की, ईश्वराचे अस्तित्व सिद्ध होऊ शकत नाही. पाहा :-ईश्वरासिद्धेः सां. १।९२.

याचे उत्तर हेच आहे की, जोपर्यंत ईश्वराच्या अस्तित्वास सिद्ध करणाऱ्या आम्ही दिलेल्या युक्त्या बरोबर आहेत तोपर्यंत कोणी काहीही म्हणो, ईश्वराच्या अस्तित्वास स्वीकारावेच लागेल.

सांख्याविषयी वेग-वेगळी मते आहेत. काही सांख्यानुयायी अनीश्वरवादी आहेत तर कांही ईश्वरवादी. अनीश्वरवादी सांख्य या सूत्राद्वारे ईश्वराचे न होणे सिद्ध करतात व ईश्वरवादी सांख्य याचाच दुसरा अर्थ करतात. काही नास्तिकांची तर अशी प्रवृत्ती झाली आहे की, त्यांना आस्तिक

सुद्धा नास्तिक दिसतात. उदाहरणादाखल काही जण म्हणत आहेत की वेदामध्ये 'ब्रह्म' ईश्वरवाचक नाहीच. इथे आम्ही केवळ या सूत्राचा विचार करू.

या सूत्राच्या वर असलेले सूत्र कोणत्या प्रकरणात आले आहे ते पाहणे आवश्यक आहे. केवळ हे एक सूत्र अर्थ समजण्यासाठी पुरेसे नाही म्हणून आम्ही चार सूत्रांचा विचार करू.

१. यत् सम्बद्धं सत् तदाकारोल्लेखि विज्ञानं तत् प्रत्यक्षम् ।
२. योगिनामबाह्यप्रत्यक्षत्वान्नदोषः ।
३. लीनवस्तुलब्धातिशयसम्बन्धात् वाऽदोषः ।
४. ईश्वरासिद्धेः ।

पहिल्या सूत्रात प्रत्यक्ष प्रमाणाची व्याख्या करण्यात आली आहे. इंद्रिय आणि विषयांच्या संबंधामुळे होणारे विषयकारक ज्ञान 'प्रत्यक्ष' आहे. उदा. काचेच्या ग्लासामध्ये लाल पाणी भरल्यामुळे ग्लासाचा रंगसुद्धा लाल होतो. त्याचप्रमाणे ज्या वस्तूशी आमचा संबंध जुळतो तशा प्रकारचे ज्ञान आम्हास होते. हेच प्रत्यक्ष आहे.

इथे हे स्पष्ट झाले की, हे सर्व सूत्र प्रत्यक्षप्रमाणाच्या व्याख्येशी संबंधित आहेत. ईश्वरसिद्धीचे प्रकरण नाही.

प्रत्यक्षाची जी व्याख्या या सूत्रात करण्यात आली आहे त्या व्याख्येची परीक्षा करावयाची होती. व्याख्या बरोबर आहे की नाही हे पाहावयाचे होते. या व्याख्येत पहिली चूक 'अव्याप्ति दोषा' बाबतीत दाखवण्यात आली आहे. म्हणजे योगीजनांना होणाऱ्या अन्तःप्रत्यक्षाचा समावेश या व्याख्येत होऊ शकत नाही. या शंकेच्या निवारणासाठी दोन सूत्रे दिली गेली. पहिले हे की, इथे बाह्य वस्तूंच्या प्रत्यक्षाचाच विचार करण्यात आला आहे. योगीजनांचे प्रत्यक्ष एक आंतरिक क्रिया आहे. आमची इंद्रिये केवळ बाह्यवस्तूंचेच प्रत्यक्ष करू शकतात, आंतरिक वस्तूंचे नाही. म्हणून जेव्हा आंतरिक प्रत्यक्षाची व्याख्या करण्याची इच्छा नव्हती तेव्हा देण्याची गरजच काय? दुसरे समाधान हे की, योग्यास जर एखाद्या सूक्ष्मवस्तूचे ज्ञान होत असेल तर प्रत्यक्षाच्या व्याख्येत तेव्हा सुद्धा कुठलाही दोष आढळून येणार नाही. कारण लीनवस्तू बीजरूपात का होईना ग्रहण केलीच जाते. योग्याच्या इंद्रियांमध्ये विशेष योग्यता असते आणि त्यांचा सूक्ष्मवस्तूशी संबंध होऊ शकतो. संबंध होऊ शकत असेल तर प्रत्यक्षाचे जे लक्षण दिले आहे त्यात योग्याचे प्रत्यक्षही समाविष्ट होते.

प्रत्यक्षाचे ते 'लक्षण' (व्याख्या) ईश्वराबाबतीत कार्य करू शकत नाही. म्हणजे प्रत्यक्ष-प्रमाणाची जी व्याख्या वर केली आहे, त्या व्याख्येनुसार ईश्वर प्रत्यक्षाद्वारे जाणला जाऊ शकत नाही असे सिद्ध होते. होऊ द्या. व्याख्येत तर काही दोष नाही ना! तात्पर्य हेच आहे की, प्रत्यक्ष, अनुमान व शब्द ही तीन्ही प्रमाणे सर्वसामान्य व्यक्तींच्या ज्ञानाकरिता आहेत. योग्यांसाठी नाहीत आणि ईश्वराच्या ज्ञानप्राप्तीसाठीही नाहीत. प्रमाण म्हणजे 'प्रमाकरण': प्रमा म्हणजे ज्ञान, करण म्हणजे साधन. इंद्रियाद्वारे ज्ञान साधारण व्यक्तींना होते. योगी इंद्रियांचा वापर करीत नाहीत.

ते आंतरिक साधनांद्वारे ज्ञान प्राप्त करतात आणि ईश्वरासाठी तर इंद्रियांची आवश्यकता नाही. म्हणून प्रत्यक्ष प्रमाणाचा ईश्वराशी संबंध नाही. ईश्वरदेखील इंद्रियाद्वारे वस्तू पाहत नाही. आम्हीदेखील ईश्वरास पाहू शकत नाही. इथे अजून एक बाब लक्षात ठेवली पाहिजे. सूत्रामध्ये 'ईश्वरासिद्धेः' शब्द आहे. 'ईश्वराभावात्' नाही. कपिल नास्तिक असते तर 'ईश्वराचा अभाव असल्यामुळे' असे म्हणाले असते. 'अभावाच्या ठिकाणी 'असिद्धि' म्हणण्याचे तात्पर्य हेच आहे की, प्रत्यक्ष प्रमाणाशी ईश्वराचा काहीही संबंध नाही.

केवळ एका सूत्राद्वारे कपिलमुनींना नास्तिक समजणे बरोबर नाही. सांख्यशास्त्रातील इतर अनेक सूत्रात कपिल ईश्वरवादी होते असे दिसून येते. काही सूत्रे आम्ही खाली देत आहोत.

१. स हि सर्ववित् सर्वकर्ता सां. ३।५६

तो ईश्वर सर्वज्ञ आणि सर्वांचा कर्ता आहे. हा वरील सूत्राचा अर्थ आहे. या सूत्रात ईश्वरास सर्वज्ञ आणि सर्वसृष्टिकर्ता म्हटले आहे. हा ईश्वरवाद नव्हे काय? आस्तिकांचे म्हणणे हेच आहे की अशी एखादी सत्ता आहे, जी सर्वांचे ज्ञान बाळगते आणि सर्व जगास बनवते.

पुढील सूत्राद्वारे हा अभिप्राय अधिक स्पष्ट होतो.

२. ईदृशेश्वरसिद्धिस्सिद्धा । सा. ३।५७

अशा प्रकारच्या ईश्वराची सिद्धी झाली. कोणत्या प्रकारच्या ईश्वराची? जो सर्वज्ञ आणि सृष्टिकर्ता आहे.

काही जणांचे मत आहे की, इथे त्या ईश्वराचा उल्लेख आहे जो हळू-हळू उन्नती करीत ईश्वर झाला आहे. जसे, जैनी 'जीव क्रमाक्रमाने उन्नत होत होत शेवटी सिद्ध म्हणजे ईश्वर होतो' असे स्वीकारतात. पण त्यांनी विचार केला पाहिजे की, उन्नती करीत करीत 'सर्वविद्' म्हणजे 'सर्वज्ञ' होणे एखाद्या वेळी शक्य होईल असे स्वीकारले तरी, 'सर्वकर्ता' किंवा 'सृष्टिकर्ता' होणे कसे काय शक्य आहे? जैनांचे सिद्ध पुरुष सूर्य, चंद्र वगैरेंचे निर्माते नाहीत म्हणून ते ईश्वर होऊ शकत नाहीत. इथे सृष्टिरचना करणाऱ्या ईश्वराविषयीच विवेचन करीत आहोत.

३. समाधिसुषुप्तिमोक्षेषु ब्रह्मरूपता । सां. ५।११६

'जीवास समाधी, सुषुप्ती व मोक्ष अवस्थेत ब्रह्मरूपता प्राप्त होते' असे या सूत्रात स्पष्ट केले आहे.

पुढील सूत्रात ईश्वर-अस्तित्वासाठी समर्पक हेतू देण्यात आला.

द्वयोः सबीजमन्यत्र तद्धतिः । सां. ५।११७.

समाधी व सुषुप्तीमध्ये दुःखाचे कारण असते. मोक्षामध्ये तेसुद्धा नष्ट होते. तात्पर्य हेच आहे की, 'ब्रह्म' - परमेश्वर आनंद स्वरुप आहे. जीवामध्ये आनंद नाही. पण जीव समाधी, सुषुप्ती व मोक्षामध्ये 'ब्रह्म' परमेश्वराच्या आनंदास अनुभवतो व ब्रह्मरूपता अनुभवतो. कपिल ईश्वरवादी नसते तर त्यांनी ब्रह्म (ईश्वर) साक्षात्काराचा उल्लेख केला नसता.

४. वेदांना कपिलमुनी अपौरुषेय मानतात. म्हणजे ते मनुष्यकृत नाहीत. खालील सूत्रे

पुराव्यादाखल देता येतात.

१. न पौरुषेयत्वं तत् कर्त्तुः पुरुषस्याभावात् ।

२. मुक्तामुक्तयोरयोग्यत्वात् ।

३. नापौरुषेयत्वात् नित्यत्वमंकुरादिवत् ।

४. तेषामपि तद्योगे दृष्टबाधादिप्रसक्तिः ।

५. यस्मिन्नदृष्टेऽपि कृतबुद्धिरूपजायते तत् पौरुषेयम् ।

६. निजशक्त्यभिव्यक्तेः स्वतः प्रमाण्यम् । सां.५। ४६-५१

१. कोणत्याही व्यक्तीने वेद बनविले नाहीत म्हणून ते अपौरुषेय आहेत. पौरुषेय नाहीत.

२. पुरुष (जीवात्मे) दोन प्रकारचे असू शकतात. मुक्त आणि अमुक्त किंवा बद्ध. या दोघांमध्येही वेद बनविण्याची योग्यता नाही. मुक्त पुरुष कसा बनवू शकतो? बद्धास मुक्तावस्थेचे ज्ञान कसे होऊ शकते? वेदांमध्ये या सर्व विषयांचे ज्ञान आहे म्हणून ते मनुष्यकृत नाहीत.

३. वेद अपौरुषेय असले तरी अनित्य आहेत. कारण, सृष्टीच्या आरंभी उत्पन्न होतात. जसे : वृक्षाचे अंकुर मनुष्यकृत नाहीत तरी अनित्य आहेत.

४. आम्ही ''अंकुर अनित्य असल्यामुळे त्याससुद्धा मनुष्यकृत मानू'' असे म्हणाल तर दृष्ट बाधेचा दोष उद्भवेल. तात्पर्य हेच की, अंकुर मनुष्यकृत नाहीत. हे तर प्रत्यक्षसिद्ध आहे.

५. पौरुषेय म्हणजे मनुष्यकृत. ज्या वस्तूचा कर्ता मनुष्य अप्रत्यक्ष असला तरी त्या वस्तूस पाहून 'कोणत्या तरी मनुष्याने नक्कीच ही वस्तू बनविली आहे' असे ज्ञान होत असेल तर त्या वस्तूस 'मनुष्यकृत' म्हणू. वृक्षांना पाहून मनुष्याने बनविले अशी बुद्धी होत नाही. त्याचप्रमाणे वेदांना पाहून हे मनुष्यकृत आहेत असे ज्ञान होत नाही.

६. वेद आपल्या ज्ञानवत्तेमुळे स्वतःप्रमाण आहेत. सूर्यास पाहण्यासाठी एखाद्या दुसऱ्या दिव्याची गरज भासत नाही तशी वेदांची स्थिती आहे. म्हणून वेद अपौरुषेय म्हणजे कोणत्याही मनुष्याद्वारे बनवले गेले नाही.

या सहा सूत्रांवर विचार केला तर सहजच लक्षात येते की, महर्षी कपिल वेदांना ईश्वरकृतही मानतात मग त्यांच्या ईश्वरवादी होण्याबाबतीत शंकाच कशी उत्पन्न होऊ शकते? एखाद्या व्यक्तीने वेदांचा स्वीकार केल्यानंतर ते मनुष्यकृतही नाहीत व ईश्वरकृतही नाहीत असे तो म्हणू शकतो काय? वेद मनुष्यकृत किंवा ईश्वरकृत असतील. महर्षी कपिलनी वेदांना ईश्वरकृत मानल्यामुळे ईश्वराचा स्वीकार त्यांनी केला आहे असे सिद्ध होते.

आता इथे अशा सूत्रांचे वर्णन करू की, ज्यांचा अर्थ न समजल्यामुळे महर्षी कपिल नास्तिक समजले जातात.

१. नेश्वराधिष्ठिते फलनिष्पत्तिः कर्मणा तत् सिद्धेः। सां.५।२

फळाची (सखः-दुःखाची) प्राप्ती ईश्वरामुळे नसून कर्मामुळे होते.

या सूत्रामुळे बरेच जण असे समजतात की, ईश्वर कर्माचे फळ देत नसून कर्म स्वतःच फळ

देतात. पण या सूत्राचे तात्पर्य असे नाही. असे असते तर या पूर्वीच्या सूत्रात मंगलाचरणाचे लाभ सांगितले गेले नसते. याचा केवळ हाच अर्थ आहे की, मंगलाचरण करण्यात आले तरी, जे काही सुख-दुःख मिळते ते आमच्या कर्माशिवाय केवळ ईश्वराच्या इच्छेनेच मिळते असे समजू नये. सुख-दुःखाचे मुख्य कारण कर्म आहे. आमचे कर्म नसेल तर ईश्वर फळ कसा देऊ शकतो? पुढील सूत्र आमच्या म्हणण्यास स्पष्ट करीत आहे :

स्वोपकारादधिष्ठानं लोकवत्। सां. ५।३

जगामध्ये मनुष्य स्वतःच्याच लाभासाठी काम करतात. ईश्वरसुद्धा कर्माशिवाय सुख किंवा दुःख देत असेल तर त्याचाही स्वार्थ सिद्ध होतो. ईश्वर स्वार्थी नाही. स्वतःसाठी तो काहीच करीत नाही. म्हणून तो कर्माशिवाय फळ देत नाही.

२. प्रमाणाभावान्न तत् सिद्धिः ।
संबन्धाभावान्नानुमानम् ।
श्रुतिरपि प्रधानकार्यत्वस्य । सांख्य. ५।१०, ११, १२

या सूत्रांचा अनेक व्यक्ती "ईश्वराच्या सिद्धीसाठी कोणतेही प्रमाण नाही, अनुमानही नाही. श्रुतीद्वारे सुद्धा हेच दिसून येते की, सृष्टीचे (प्रधान) प्रकृती हेच कारण आहे," असा अर्थ करतात.

इथे एक बाब स्पष्ट आहे. ती म्हणजे प्रकृतीस सृष्टीचे कारण स्वीकारले आहे. ईश्वरास नाही. आता प्रश्न केवळ एवढाच आहे की, 'कारण' या शब्दाद्वारे उपादान कारण समजावे की निमित्त कारण? जगामध्ये दोन्ही विचार प्रचलित आहेत. काही जण ईश्वरास केवळ निमित्तकारण मानतात आणि काही जण उपादान कारण सुद्धा मानतात. पण प्रकृती मात्र केवळ उपादान कारणच मानली जाते. प्रकृतीस निमित्तकारण मानणारे कोणीच नाहीत. इथे सूत्रामध्ये प्रधान (प्रकृती) सृष्टीचे कारण मानण्यात आले आहे. यावरून स्पष्ट होते की, या सर्व सूत्रात ईश्वराच्या उपादान कारण होण्याचा निषेध केला गेला आहे. निमित्त कारण होण्याचा नव्हे. ईश्वर निमित्त कारण आहे हे इतर सूत्रांद्वारे सिद्ध आहे. आम्ही सुद्धा यां पुस्तकात 'ईश्वर निमित्त कारण आहे, उपादान कारण नाही' हेच सिद्ध केले आहे.

□□□

# अध्याय : अकरावा

## आस्तिकतेची उपयोगिता

वेदाहमेतं पुरुषं महान्तमादित्यवर्णं तमसः परस्तात् ।
तमेव विदित्वाऽतिमृत्युमेति नान्यः पन्था विद्यतेऽयनाय ।।

महान, ज्योतिस्वरूप व अज्ञानरहित ईश्वरास जाणल्यामुळेच मनुष्य मृत्यूपासून वाचू शकतो. दुःखातून तरून जाण्यासाठी याशिवाय दुसरा कोणताच मार्ग नाही.

दुःख व मृत्यूपासून वाचण्याचा सर्व प्राणी प्रयत्न करतात. ही प्रत्येकाची स्वाभाविक इच्छा आहे. मानवसमाजाच्या वेगवेगळ्या संघटनांचे निरीक्षण केले असता सर्वांची हीच उपयोगिता व हाच उद्देश दिसून येतो. भुकेच्या दुःखातून मुक्त होण्यासाठी आम्ही शेती करतो. शारीरिक गरजा पूर्ण होण्यासाठी व्यापार व कला-कुसरीचे उद्योगधंदे उभारतो. शारीरिक रोगांमुळे होणाऱ्या दुःखातून सुटका करून घेण्यासाठी, मृत्यूपासून बचाव करण्यासाठी इस्पितळांची उभारणी केली जाते. इतरांनी स्वार्थाच्या आहारी जाऊन त्रास देऊ नये म्हणून न्यायालय उघडतो. बाह्य आक्रमणापासून मुक्त राहण्याकरिता सैन्य बाळगतो. हे सर्व विभाग आमच्या दुःखांना दूर सारण्यासाठीच बनवले गेले आहेत तरी पण वेद म्हणतात की, मृत्यूस जिंकण्याकरिता किंवा दुःखातून मुक्त होण्याकरिता ईश्वरप्राप्ती शिवाय दुसरा कोणताच मार्ग नाही. असे का? ईश्वराशिवाय आम्ही आमच्या जीवनाची वाटचाल सुखाने पार पाडू शकत नाही काय? आस्तिकतेचा आमच्या जीवनाशी एवढा घनिष्ठ संबंध कोणता आहे की, ज्याचा (आस्तिकतेचा) स्वीकार केला नाही तर आमचे जीवन सुखी होऊच शकत नाही? सर्व आस्तिक सुखी व सर्व नास्तिक दुःखी आहेत काय? ज्या व्यक्ती 'ऋणं कृत्वा घृतं पिबेत्' या तत्त्वानुकूल जीवन जगणाऱ्या आहेत त्या सुखी नाहीत काय? मनुष्य समाजाच्या यशाचे एक मात्र साधन आस्तिकताच आहे काय? जोपर्यंत या प्रश्नाचे समर्पक असे योग्य उत्तर मिळत नाही तोवर ईश्वरासंबंधी विचार करण्याचा काहीच उपयोग दिसत नाही.

ईश्वर असो किंवा नसो, सृष्टी ईश्वराने बनविलेली असो किंवा इतर कोणी. ईश्वर सर्वव्यापक असो किंवा सृष्टीला बनवून एखाद्या इतर स्थळी गेलेला असो. ईश्वर सर्वशक्तिमान् असो की अत्यंत दुर्बळ असो. प्रश्न हा आहे की आमच्या व्यावहारिक जीवनात ईश्वराच्या अस्तित्वाचा काय उपयोग आहे? कार्लाइल म्हणतो की, सृष्टीच्या आदी काळापासून आजपर्यंत 'मी काय आहे'? याच्या अन्वेषणात मनुष्य दत्तचित्त आहे. आणि आजपावेतो त्यास त्याचे ज्ञान झाले नाही म्हणून याचा विचार करण्यात वेळ घालविणे मूर्खता आहे. 'मला काय करावयास पाहिजे? याचा विचार केला पाहिजे. 'मी कोण आहे'? याचा नव्हे. मी कोण आहे? हा प्रश्न सभ्य समाजासाठी अनावश्यक वाटत असेल तर ईश्वर काय आहे हा प्रश्न यापेक्षाही अधिक अनावश्यक वाटेल. आमचे जीवन अल्पकालिक आहे. वेळ कमी आहे. काम अधिक आहे. म्हणून या स्वल्प जीवनाचा आणखी थोडा वेळ व्यर्थ प्रश्नांच्या विवंचनेत घालविला तर कर्तव्यपूर्तीसाठी वेळ तो कुठे राहणार?

  

वेळ तो कसा मिळणार? आस्तिकतेसाठी समाज आणि व्यक्ती वेडेपिसे झाले आहेत. यांनी आपल्या विचार-प्रक्रियेला जणू मूठमातीच दिली आहे. हे सर्व काल्पनिक ईश्वराच्या मागे धावपळ करीत आहेत. यांचा बराच वेळ ईश्वराची स्तुती, प्रार्थना, उपासना यांमध्ये खर्च होतो. एकदाचे ईश्वरासंबंधीचे काल्पनिक भूत यांच्या मानगुटीवरून खाली उतरले तर यांचा वेळ, पैसा व श्रम-शक्ती इतर उपयुक्त कार्यांसाठी कामी येतील.

असे विचार अनेक जणांचे आहेत. आणि म्हणूनच आधुनिक सुशिक्षित समाज अशा प्रकारच्या प्रश्नांपासून दूर राहू इच्छितो.

पण, आमच्या मते ही त्यांची घोडचूक आहे. या प्रश्नापासून जेवढे दूर राहण्याचा प्रयत्न करू तेवढ्याच प्रमाणात दुःखाची वाढ होत राहणार आहे. मानव समाजांच्या वेगवेगळया संस्था आमच्या सुखाकरिताच आहेत. यात शंका नाही. पण जोपर्यंत आम्ही खरे आस्तिक होणार नाही तोवर आम्हास उत्कृष्ट आणि पूर्णत्वाची जाणीव करून देणारे सुखही मिळू शकणार नाही.

'आम्ही कोण?' या प्रश्नास बगल देऊन 'आम्ही काय केले पाहिजे?' या प्रश्नाचा विचार मानवांनी करावा असे जे कार्लाइल म्हणतो ते काही बरोबर नाही. स्वतःच्या अस्तित्वाचा विचार केल्याशिवाय स्वतःच्या कर्तव्यास आम्ही जाणू शकतो काय? कर्तव्याचा आणि अस्तित्वाचा काहीच संबंध नाही काय? 'आम्ही कोण?' याचे ज्ञान झाल्याशिवाय 'आमचे कर्तव्य काय' हे कसे कळेल? वेग-वेगळया व्यक्तींची वेगवेगळी कर्तव्ये आहेत हे जगात पाहतोच. असे का? त्यांचे पद आणि अधिकार यात भिन्नता असणे हेच त्याचे कारण आहे. सर्व राजपत्रित कर्मचाऱ्यांचे एकच कर्तव्य नसते. सेनापतीचे आणि कोषाध्यक्षाचे एकच कर्तव्य नाही. या लोकांनी जर 'मी कोण आहे' हे जाणण्याचा प्रयत्न केला नाही तर आपल्या कर्तव्याचे पालन कसे करू शकतील? 'मी कोण?' या प्रश्नाविषयी उदासीन झालात तर लगेच 'माझे कर्तव्य काय?' या प्रश्नाविषयी निराश व्हावे लागेल. यानंतर काही कर्तव्यच शिल्लक राहत नाही. मनुष्य व दगड हे दोन्ही एकच होतील.

काही जण म्हणतील की, कर्तव्याचा आणि आस्तिकतेचा काय संबंध आहे? आम्ही करीत असलेले विवेचन काळजीपूर्वक वाचले तरच या प्रश्नाची उकल होणार आहे. मानव समाज कर्तव्यांचा एक समुदाय आहे. प्रत्येक मनुष्य काही तरी करीतच असतो. म्हणून मी काय केले पाहिजे असा प्रश्न दररोज उठत असतो. काही जणांची कर्तव्यतत्परता या प्रश्नाच्या उलगड्यावर अवलंबून आहे तर काही जण समाजाच्या रीति-रिवाजांचेच अनुकरण करतात. तरी पण या अनुकरण करणाऱ्यांचे कर्तव्यसुद्धा विचार न करता होत नाही. यांचा विचार समाजधुरीण करीत असतात. याच प्रश्नांच्या समूहाचे नाव आचरण शास्त्र - नीतीशास्त्र (Ethics) आहे. व्यवहारशास्त्रासंबंधीच्या अडचणी 'मनुष्य काय आहे?' या प्रश्नाचा विचार केल्याशिवाय सोडविल्या जाऊ शकतात काय? विचार करणाऱ्या प्रत्येक मनुष्याचा व्यवहार एकसारखाच असतो काय? इतिहासाची तरी साक्ष याबाबतीत मिळत नाही.

या विषयाशी निगडित असलेल्या वेगवेगळ्या विचारप्रवाहाचे विवेचन श्री शंकराचार्यांनी केले

आहे.

१. देहश्चात्र चैतन्यविशिष्टात्मेति प्राकृताजना लोकायतिका प्रतिपन्नाः ।
२. इन्द्रियाण्येव चेतनात्मेत्यपरे ।
३. मन इत्यन्ये ।
४. विज्ञानमात्रं क्षणिकमित्येके ।
५. शून्यमित्यपरे ।
६. अस्ति देहादिव्यतिरिक्तः संसारी कर्ता भोक्तेत्यपरे ।
७. भोक्तैव केवलं न कर्तेत्येके ।
८. अस्ति तद्व्यक्तिरिक्त ईश्वर सर्वतः सर्वशक्तिरिति केचित् ।
९. आत्मा स भोक्तुरित्यपरे । (शारीरिक भाष्यः १.१.१)

१. चैतन्य (ज्ञान आणि क्रिया करण्याचे सामर्थ्य) असलेला देह हाच आत्मा आहे. शरीरापेक्षा भिन्न आत्मा नाही.
२. इंद्रिये हीच आत्मा आहेत, असे काही जणांचे मत आहे.
३. मन हाच आत्मा आहे, हे तिसरे मत आहे.
४. विज्ञानरूप क्षणिक वस्तूसच आत्मा समजले पाहिजे. आत्मा हा नित्य पदार्थ नाही; हे चौथे मत आहे.
५. आत्मा शून्य आहे, हे पाचवे मत आहे.
६. कर्ता, भोक्ता असलेला आत्मा देहापेक्षा वेगळा आहे, हे सहावे मत आहे.
७. आत्मा भोक्ता आहे, कर्ता नाही, हे सातवे मत आहे.
८. या आत्म्यापेक्षा सर्वशक्तिमान् सर्वज्ञ असलेला ईश्वर वेगळा आहे, हे आठवे मत आहे.
९. भोक्ता जीवात्म्यापेक्षा ईश्वर वेगळा नाही, हे नववे मत आहे.

या सर्व मतांचा स्वीकार करणाऱ्यांचा सदाचार व व्यवहार एकसारखाच असेल काय? मुळीच नाही. विचाराप्रमाणेच मनुष्याचे आचरणही असते. त्याच्या सिद्धांताचा, त्याच्या तत्त्वज्ञानाचा व त्याच्या विज्ञानाचा त्याच्या जीवनावर फार मोठा प्रभाव पडतो. काहीजण असेही आहेत की, ज्यांच्या अंतर्मनात दडलेले विचार इच्छाशक्तीच्या निर्बलतेमुळे त्यांना सामाजिक मर्यादेच्या बाहेर घेऊन जाऊन शकत नाहीत. पण, केव्हा ना केव्हा तरी आंतरिक विचार इच्छाशक्तीससुद्धा कलाटणी दिल्याशिवाय राहत नाहीत यात मुळीच संदेह नाही. जमिनीखालून वाहणाऱ्या, मऊ जमीन दिसताच उफाळून वर येणाऱ्या पाण्याच्या प्रवाहासारखे माणसाचे तत्त्वज्ञान असते.

मी शरीरापेक्षा वेगळा नाही, जन्माअगोदर माझी सत्ता नव्हती, मृत्यूनंतर राहणार नाही असे मानणाऱ्या मनुष्यासाठी लोक-परलोक हेच आहेत व मृत्यूच त्याच्या जीवनाचा अंत आहे. अशा व्यक्तीचे विचार शरीरसुखाच्या विचारांना ओलांडून पुढे जाऊच शकत नाहीत. कर्ज काढून तूप पिण्याची म्हणजे इतरांकडून ऋण घेऊन परतफेड करण्याची चिंता न बाळगता मौजमजा करण्याची

  

प्रवृत्ती बळावेल. सबंध जीवन भोग-विलासात मग्न राहील. अशाच प्रकारची माणसे जगभर पसरली तर त्यांच्यासाठी सदाचार, परोपकार, अहिंसा वगैरे निरर्थकच ठरणार! त्यांनी आत्मत्याग करावा तरी कुणासाठी? आत्मत्यागाचा अर्थच त्यांच्या शब्दकोशात नाही. अशी माणसे कष्ट सहन करून दुसऱ्यांच्या उद्धारासाठी प्रयत्न करतील काय? 'मी' शरीरापेक्षा वेगळा नाही असा जर पूर्ण विश्वास झाला तर असा विचार बाळगणाऱ्यांचे जीवन नक्कीच विलासी बनेल. इतिहासाची साक्ष हे सिद्ध करीत आहे. भारतातील चार्वाक मतानुयायी व ग्रीसच्या एपीक्यूरियन्सचे जीवन किती रंगेल होते याची साक्ष आम्हाला इतिहासाद्वारे मिळतच आहे. 'अङ्गनालिङ्गनाजन्यं सुखमेव पुमर्थता' असा उद्घोष करणारे ते हेच. स्त्रीचे आलिंगन हाच पुरुषार्थ आहे. यांच्या मते सुंदर रमणींना एकत्र करून त्यांच्या आलिंगनात जगाला विसरून जीवन घालविणाराच सर्वात मोठा उद्योगी व श्रेष्ठ पुरुष आहे.

अशाच प्रकारे जे सर्व जगास व स्वतःस शून्य समजतात, त्यांच्याकडे कर्तव्य परायणतेसाठी प्रेरणा करणारी कोणती बाब आहे? शून्यवादाचा प्रचारच समूहास व व्यक्तीस शून्याकडे घेऊन जातो. या भावनेच्या विकासाबरोबरच यांचा विकास, यांची उन्नतीसुद्धा कृष्णपक्षातील चंद्राप्रमाणे कमी कमी होत अमावस्येच्या काळोखापर्यंत पोहचते.

ज्यांनी स्वतःला ईश्वरच समजले आहे त्यांचा व्यवहार स्वतःस उन्नतीशील समजणाऱ्यांपेक्षा वेगळा आहे असे दिसून येते. कारण, एके ठिकाणी उन्नतीचा मार्ग मोकळा आहे व दुसऱ्या ठिकाणी बंद झालेला आहे.

जो समाज किंवा जी व्यक्ती आस्तिक असेल तिचे जीवन नास्तिकापेक्षा नक्कीच वेगळे असणार! आस्तिकतेबाबत असलेल्या त्याच्या विचारानुकूलच त्याचे आचरणही असणार. म्हणून आस्तिकतेशी संबंधित असलेल्या विचारांची मनुष्यजीवनासाठी काहीच आवश्यकता नाही असे म्हणणे बरोबर नाही. खरे पाहता, ईश्वराच्या अस्तित्वाचा प्रश्न केवळ बौद्धिक कवायत नसून हा प्रश्न समाजाच्या उन्नतीच्या मार्गात प्रमुख भूमिका वठविणारा आहे. जीवन आणि मृत्यूच्या सर्व प्रश्नांची उकल करणारा असा हा प्रश्न आहे. म्हणूनच उपनिषदात :

सर्वे वेदा यत्पदमामनन्ति, तपांसि सर्वाणि च यद्वदन्ति ।
यदिच्छतो ब्रह्मचर्यं चरन्ति, तत्तेपदं संग्रहेण ब्रवीमि ॥ असे म्हटले आहे.

ज्या सर्वश्रेष्ठ पदाचे (प्राप्त करण्याजोगे स्थान) चारही वेद पुन्हा पुन्हा वर्णन करतात, ज्याच्या प्राप्तीसाठी सर्व तपे, व्रते केली जातात, ज्याची इच्छा बाळगून ब्रह्मचर्याचे पालन केले जाते तोच ईश्वर आहे. खरोखरच, ज्याचा ईश्वरावर विश्वास नाही, ज्याच्या समोर ईश्वरप्राप्तीसारखा उच्च आदर्श नाही, तो ब्रह्मचर्य पालनासारखी कठीण तपश्चर्या कशासाठी करील? त्याच्यासाठी तर स्त्री आलिंगन हेच संपूर्ण जीवनाचे उद्दिष्ट असेल. हीच त्याच्या पुरुषार्थाची इतिश्री आहे.

मानव-जीवनाचा उद्देश काय आहे याचा विचार करा. थोड्या वेळेसाठी आस्तिकतेस दूर ठेवा. ईश्वर असो की नसो, त्याच्याशी आमचे काही प्रयोजन नाही. आम्ही त्याच्याविषयी विचारच का

करावा?

अंजुम शनास को भी खलल है दिमाग का ।
पूछो अगर जमीं की, कहे आस्माँ की बात ।।

आम्ही आकाश, पाताळ एक करू इच्छीत नाही. एखादा निर्दोष, निरागस मनुष्य जसा विचार करतो, तसे विचार करू इच्छितो. मनुष्य जीवनाचा उद्देश काय आहे? दुःखांना दूर करणे हे तर निषेधात्मक वाक्य आहे. आमचे दुःख कसे दूर होऊ शकते? आमच्यात व पशू-पक्ष्यात फरक तो कोणता आहे? ते तर दुःखांना दूर राहण्यासाठीच अहोरात्र धडपड करीत असतात.

आहारनिद्राभयमैथुनं च सामान्यमेतत् पशुभिर्नराणाम् ।

दुःख दूर करण्याची साधारण उपायावर दृष्टी फेकली तर पशू व मनुष्य सारखेच दिसतात. मग मनुष्यजीवनाचा उद्देश काय आहे? आणि त्याचा ईश्वर-अस्तित्वाशी काय संबंध आहे?

आधुनिक नीतिकारांनी (आचरणशास्त्रज्ञांनी) ईश्वराच्या सहायाची अपेक्षा न बाळगताच आचरणशास्त्राचे विवेचन केले आहे. त्यांची अनेक मते आहेत.मिल वगैरे विद्वान स्वतःला 'यूटीलिटेरियन' (utilitarian) किंवा लाभवादी किंवा उपयोगितावादी म्हणवून घेतात.आम्ही तेच काम करावे ज्यामुळे लाभच लाभ होईल असे त्यांचे म्हणणे आहे. कशाचा लाभ? पैशाचा, यशाचा की स्वास्थ्याचा! लाभवादी म्हणतील 'सुखाचा.' बरे तर! सुखच अभीष्ट वस्तू असेल तर जे कांही सुखासाठी केले जाईल, करण्यात येईल ते सर्व उचितच ठरेल. चोरी, भ्रष्टाचार, बलात्कार वगैरे सगळी दुष्कर्मे बरोबरच ठरतील. 'अनुचित' असे कर्म जगात कोणतेच उरणार नाही. ''अधिकात अधिक मनुष्याचा अधिकात अधिक सुख मिळवून देणे'' (greatest happiness of the greatest number of men), हाच जीवनाचा उद्देश आहे, असे म्हणाल तर मनुष्य अनेक दुष्कृत्यांपासून वाचेल यात तिळमात्रही शंका नाही. पण, एखाद्या मनुष्याने स्वतःचे प्राण अर्पण करून अधिकात अधिक मनुष्यांच्या सुखसंपादनासाठी का प्रयत्न करावा? या प्रश्नाचे उत्तर कोणते? आज माझ्या बलिदानामुळे देशवासियांचे कल्याण होईल. त्यांचे दास्य दूर होईल, त्यांना स्वातंत्र्य मिळेल! पण, मी असे का करावे? याचा मोबदला म्हणून मला काय मिळेल? माझ्या मृत्यूनंतर माझे देशवासी माझ्या या ऋणाची परतफेड कशी करतील? त्यांनी परतफेड नाही केली तर मला त्याचा मोबदला कसा मिळेल? हे सर्व प्रश्न असे आहेत, ज्यांचे उत्तर केवळ लाभवादी देऊ शकत नाहीत. ईश्वरवादी म्हणू शकतो की, मृत्यू माझा अंत नाही. मला ईश्वराच्या नियमांचे व आज्ञेचे पालन करावयाचे आहे. मानवजातीच्या कल्याणासाठी मी जर आज प्राण अर्पण करीन तर माझा आत्मिक विकास होईल. मला ईश्वराकडून फळ मिळेल. मला स्वतःला समाधान लाभेल. लाभवादी म्हणतील की, हासुद्धा लाभच आहे ना! लाभ आहे पण या लाभासाठी प्रेरक असा विचार उपयोगितावादात सापडूच शकत नाही. ज्या विचारातून हा लाभ घडून येत आहे ती आस्तिकता आहे. ही प्रेरणाशक्ती फक्त उच्चकोटीची आहे.

सदाचाररूपी भवनाची उभारणी ईश्वरास्तित्वाच्या पायावर न करू इच्छिणारे सदाचारास

निराधार करीत आहेत. ते मानव जातीचे मनोविज्ञान जाणत नाहीत. ईश्वर-विश्वासामुळे सदाचारास किती पाठबळ मिळाले आहे याची त्यांना जाण नाही.

आस्तिकतेमुळे सदाचार दास्यश्रृंखलेत बंदिस्त झाला. असा आक्षेप काहीजण करतात. "पुण्यासाठी पुण्य करावे" (Virtue for Virtues Sake) ही भावना लोकांमध्ये नाही. ईश्वर दंड देईल म्हणून ते खोटे बोलत नाहीत, अप्रसन्न होईल म्हणून चोरी करीत नाहीत. अशा प्रकारे लोकांच्या मानत भीतीची भावना दृढ होते. त्यामुळे ते खरे सदाचारी बनत नाहींत, बनू शकत नाहीत. पण, असा आक्षेप करणारे खोलवर जाऊन विचार करीत नाहीत. गंभीरतेने चिंतन करीत नाहीत. खरे पाहता, 'व्यक्ती तितक्या प्रकृती' म्हणजे मनुष्यांचे स्वभाव निरनिराळे असतात. त्यांच्या अंतःकरणात दया, प्रेम, करुणा वगैरे भावना आहेतच. त्यासोबत भीतीचा भाव सुद्धा आहे. भीतीचा भाव मनुष्यामध्ये स्वाभाविकपणे असतो. तो बाहेरून आलेला नाही. तो इतर भावांप्रमाणे एक भाव आहे. त्यास जगातून नाहीसे करणे कुणासही शक्य नाही. निकृष्ट अवस्थेत भीती अधिक असते आणि विकसित अवस्थेत हा भाव कमी असतो. पण, मानवी स्वभावात भीतीला मुळी स्थानच नाही असे म्हणू शकत नाही.

ही भीती कशासाठी? याचा उपयोग काय आहे? उत्क्रांतिवादी डार्विन 'भीतीचा उन्नतीसाठी उपयोग होतो' असे म्हणतात. आवश्यकतेविना कोणताही भाव असूच शकत नाही, असा त्यांचा सिद्धांत आहे. या बाबतीत आम्हीदेखील त्यांच्याशी सहमत आहोत. भीतीचा आचरण-शास्त्रात (व्यवहारशास्त्रात) काय उपयोग आहे हे आता पाहावयाचे आहे. एक नियम उदाहरणादाखल, खरे बोलणे हे मानव समाजासाठी उपयोगी आहे, यामुळे जगाचे कल्याण होते. या नियमामुळे अधिकात अधिक लोकांना अधिक सुखाची प्राप्ती होऊ शकते. म्हणून मानव समाजाने नियम बनवला आहे की, खरे बोलणे आवश्यक आहे. आणि जो व्यक्ती खरे बोलणार नाही तिला समाज किंवा राजा दंड देईल. उच्च कोटीच्या व्यक्ती शिक्षेचा विचार न करताच खरे बोलतील व असत्याशी घृणा करतील. परंतु निकृष्ट श्रेणीच्या लोकांना या दंडाचा विचार करूनच खरे बोलावे लागेल. लोकांच्या वास्तविक स्थितीचा शोध घेतला तर मानव समाजाच्या अतिशय उच्च अवस्थेतसुद्धा अशा निकृष्ट व्यक्तींचे अस्तित्व होते. आता या लोकाकरिता भीतीचा अनुभव करविणारी साधने कोणती आहेत? ते निकृष्ट आहेत म्हणून भीतीच त्यांना नियमात ठेवू शकते. पण, सर्वव्यापी भीती कोठून आणता येईल? समाज किंवा राजा प्रत्येक अवस्थेत गुन्हेगारास पकडू शकत नाहीत. खोटे बोलण्यामुळे एका मनुष्याचे प्राण वाचतात. त्याच्या खोटेपणाचा समाज किंवा राजासुद्धा शोध घेऊ शकत नाही. अशा स्थितीत त्या व्यक्तीने खोटे का बोलू नये? ईश्वर- विश्वासी म्हणेल 'समाज पाहू शकणार नाही, राजा पाहू शकणार नाही. पण, जो 'पश्चत्यचक्षुः स श्रृणोत्यकर्णः' डोळयाशिवाय पाहतो, कानाशिवाय ऐकतो, त्याच्या सूक्ष्मदृष्टीतून माझी सुटका कशी होऊ शकते? मी स्वतःचा बचाव कसा करून घेऊ शकतो? अशा प्रकारे खरा ईश्वरविश्वास तेव्हासुद्धा पापापासून दूर राहिल जेव्हा त्यास व्यक्ती, समाज, राजाचीसुध्दा भीती नाही. पण ज्याचा ईश्वरावर

विश्वास नाही तो अशा वेळी खोटे बोलणे पुण्य समजतो. कारण तेच लाभदायक ठरते. याच कारणामुळे स्वतंत्र नीतिवाद्यांनी विशेष अवस्थेत खोटे बोलणे हेच उपयुक्त आहे, असे विधान मांडले आहे.

आमच्या वरील उदाहरणात 'भीती' ही सदाचाराचे प्रमुख साधन आहे यात मुळीच संदेह नाही असे दाखवून दिले आहे. निकृष्ट अवस्थेत 'भीती' एक उत्तम साधन म्हणून स्वीकारणे आवश्यक आहे. तसे स्वीकार न करण्यासाठी इतर कोणतेही कारण दिसत नाही. एक शास्त्र आहे, ते जर अधिक उपयोगी असेल तर त्याचा उपयोग का करू नये? अवश्य केला पाहिजे.

एक बाब लक्षात घेणे अतिशय आवश्यक आहे. ईश्वराची भीती आणि इतरांची 'भीती' या दोन्हीत विलक्षण असा फरक आहे. ही भीती नसून भीतीतून मुक्त होण्याचे सर्वोत्तम साधन आहे. म्हणूनच आस्तिकांनी 'खुदात्रर्स' 'गॉडफियरिंग' अशा शब्दांची निर्मिती केली आहे. ईश्वराची भीती बाळगणे हा अति उत्तम गुण समजला जातो. जो ईश्वरास भितो तो त्याच्या नियमांचे उल्लंघन करूच शकत नाही. करीत नाही. खरे पाहता, नियमांचे उल्लंघन निर्भयतेचे सूचक नव्हेच. ते कायरतेचे, निर्बलतेचे सूचक आहे.

नियमोल्लंघनाचा व भीतीचा कोणता संबंध आहे? या बाबतीत लोकांमध्ये एक प्रकारचा भ्रम पसरलेला आहे. "नियमांचे उल्लंघन करु शकणाराच वीर आहे" अशा प्रकारचा गैरसमज सुशिक्षित, अशिक्षित सर्व जण बाळगतात. यापेक्षा अधिक घोडचूक ती कोणती असणार? नियमांचे पालन करण्यासाठी बळ पाहिजे, उल्लंघनासाठी बळाची काय गरज? निर्बळ आहे म्हणूनच तर मनुष्य नियमांचे उल्लंघन करतो. तो प्रलोभनांच्या तावडीत सापडतो. त्याचा पाय लगेच घसरतो. एखादा खाद्य पदार्थ पाहताच तोंडाला पाणी सुटते. सुंदर युवतीस पाहताच मन चलबिचल होते. ही सर्व नियमोल्लंघनाची उदाहरणे आहेत, निर्भयतेची व वीरतेची नव्हेत. बळ आणि निर्भयता नियमांचे पालन करण्यात आहे, उल्लंघनात नाही, असा विश्वास जर मनुष्यास झाला तर शेकडो मोठी माणसे खऱ्या मोठेपणास प्राप्त करू शकतात. पण, लोकांच्या मनामध्ये 'समरथ को नहि दोष गुसाईं'च्या विषाक्त शिकवणुकीने ठाण मांडले आहे. ती त्यांना प्रलोभनांशी युद्ध करू देत नाही. "मी राजा आहे" माझ्या राज्यात माझ्यापेक्षा वरचढ तो कोण आहे? कुणीच नाही. म्हणून मी सर्वात अधिक विलासाचे जीवन जगू शकतो, स्त्रियांचे सतीत्व नष्ट करु शकतो व कुलटांच्या समूहाचे समूह माझ्या महालात ठेवू शकतो," हे विचार वीर पुरुषाचे विचार आहेत काय? हे आत्म्याच्या अभयतेचे सूचक आहेत काय? वस्तुतः ही तर निकृष्ट कोटीची निर्बळता आहे. हे भयाचे निकृष्टतम रूप आहे.

परस्त्री-कुच-कुम्भेषु कुम्भेषु परदन्तिनाम् ।
निपतन्ति न भीरुणां दृष्टयः शरवृष्टयः ।।

(परस्त्री आणि शत्रू यांच्यावर कटाक्ष न फेकणारे भीरुच असावेत.)

असे म्हणणारे वस्तुतः स्वतः भीरू असतात. पण, दुसऱ्यांना डरपोक सिद्ध करतात.

  

खरी निर्भयता तीच आहे जी आत्म्यास जगाच्या प्रबळ प्रलोभनांशी युद्ध करण्यास शिकविते. आणि ती निर्भयता ईश्वराच्या भीतीमुळेच प्राप्त होते. जो ईश्वराची भीती बाळगतो तो जगामध्ये कुणाचीही भीती बाळगत नाही. जो ईश्वरास भीत नाही तो जगातील अतिक्षुद्र वस्तूंनाही घाबरणार! डोळे उघडून पाहा. राजा आणि रंक या दोघांचे जीवन आम्हास हेच दाखवून देते. ज्यांनी ईश्वराची भीती बाळगली नाही, त्याच्या नियमांचे उल्लंघन करीत राहिले ते शेवटी फारच दुःखद व निकृष्ट अवस्थेत जाऊन पोहोचले.

म्हणून ईश्वराच्या भीतीची साधारण भीतीबरोबर तुलना करणे योग्य नाही. निकृष्ट मनुष्यांना पापकर्मापासून वाचवण्यासाठी भीती ही अत्यंत उपयोगी आहे असे आम्ही वर सांगितले आहे परंतु हीच भीती मनुष्यास हळू-हळू प्रेमाकडे सुद्धा घेऊन जाते. जे ईश्वरास भीतात, काही दिवसातच ते त्याच्याशी प्रेमही करतात. आणि भीतीचा निकृष्ट भाव प्रेमाच्या उत्कृष्ट भावनेत रूपांतरित होतो. ईश्वराची भीती बाळगणे व त्याच्याशी प्रेम करणे हे दोन्ही शेवटी एक होतात.

प्रेम हा मनुष्याचा अति उत्कृष्ट भाव आहे. प्रेमपूर्ण हृदय अमूल्य रत्नांचा कोष आहे, ज्याच्या समोर जगाचे संपूर्ण ऐश्वर्य कस्पटासमान आहे. पण, या उत्कृष्टतम भावनेचा सर्वोच्च विकास तेव्हाच होतो जेव्हा जीव परमेश्वराच्या प्रेमात मग्न होतो. जेव्हा त्यास अणू-अणूतच नव्हे तर प्रत्येक परमाणूत आपल्या प्रियतमाचा साक्षात्कार होतो. आपल्या आत्म्यात अपार प्रकाशाचा अनुभव करतो. तेव्हा त्यास स्वतःचीसुद्धा जाणीव राहत नाही. त्या स्थितीसच उपनिषदात :

'ब्रह्म विद् ब्रह्म एव भवति'

'ब्रह्मज्ञ ब्रह्मच होतो' असे अतिशयोक्तीने म्हटले आहे. खरे पाहता, मनुष्यास सदाचारसंपन्न बनविण्यासाठी ईश्वरप्रेमाशिवाय इतर कोणत्याही साधनांची आवश्यकता नाही. सदाचारासाठी बनविले जाणारे सर्व नियम ईश्वर - प्रेमाच्या अंतर्गत समाविष्ट होतात. 'अधिकात अधिक मनुष्यांच्या अधिकात अधिक सुखाचे संपादन करणे' हेच मनुष्याचे कर्तव्य आहे, असे जे मिल किंवा इतर उपयोगितावाद्यांचे म्हणणे आहे, त्यानुसार त्यासाठी ईश्वरप्रेमापेक्षा उत्कृष्ट असे साधन दुसरे कोणते होऊ शकते? ज्याचे माझ्यावर प्रेम आहे तो माझ्या मुलावर नक्कीच प्रेम करणार! याच उदाहरणानुसार ज्याचे ईश्वराशी प्रेम आहे त्याचे मानवमात्राशी प्रेम नक्कीच असेल. अधिक मनुष्यांचे सुख संपादन करणे मनुष्याचे कर्तव्य आहे असे मिल म्हणतात. त्यांचा विचार मनुष्याच्या पुढे जाऊच शकत नाही. परंतु ईश्वरप्रेमाची वाटचाल याही पुढे जाते. केवळ मनुष्यच ईश्वराचे पुत्र आहेत काय? अन्य प्राणी पुत्र नव्हेत काय? मनुष्याच्या सुखासाठी इतर प्राण्यांना दुःख दिले जाऊ शकते काय? मुळीच नाही. आस्तिक, खरा आस्तिक इतर प्राण्यांना दुःख देण्याचे साहस तरी कसे करू शकेल? त्याच्या हृदयातून 'मित्रस्याहं चक्षुषा सर्वाणि भूतानि समीक्षे' 'मी सर्व प्राण्यांना मित्र-दृष्टीने पाहतो' असेच उद्गार बाहेर पडणार नाहीत काय? दोन भावंडांचा प्रत्यक्ष असा संबंध कोणताच नाही. वडिलांमुळेच त्या दोघांचा संबंध जुळतो. याच प्रकारे मनुष्याचा इतरांशी (मानवांशी व प्राण्यांशी) अगदी जवळचा संबंध निर्मित करणारे एखादे दृढतम सूत्र असेल

तर ती 'आस्तिकता' आहे.

खरोखरच आास्तिकता जर सार्वजनिक संजीवनी औषधी असेल तर आस्तिक इतरांशी क्रूरतेचा व्यवहार करताना का आढळून येतात? ईश्वराची अधिक भक्ती करणारेच अधिक स्वार्थी, कपटी व क्रूर का दिसून येतात? असा आक्षेप काहीजण करतात.

या आक्षेपात थोडीशी अतिशयोक्तीही आहे व थोडा भ्रमही आहे. ईश्वरभक्तीच्या वाढीबरोबर स्वार्थाची व क्रूरतेची वाढ होते असे म्हणणे चूक आहे. वस्तुतः जगातील वेगवेगळया संस्था, विभाग यांमध्ये ईश्वरभक्तांना सेवा करीत असलेले पाहतो. कधी कधी स्वतःस आस्तिक म्हणवून घेणारे सुद्धा स्वार्थी, क्रूर, कपटी झालेले आढळून येतात. पण, याचे मुख्य कारण आस्तिकता नसून पाखंड आहे. जगामध्ये बहुरूपिये पुष्कळच आहेत. ते अनेक वेश धारण करून जगास धोका देऊ इच्छितात. बऱ्याच ठिकाणी प्रतिष्ठित व्यक्तीचे रुप धारण करतात. या वेशधाऱ्यांवरून आम्ही आस्तिकतेच्या संदर्भात अचूक निष्कर्षाप्रत पोहचू शकत नाही.

याशिवाय इतर बाबी जशा हळुवारपणे विकसित होतात तसा आस्तिकतेचाही हळुवारपणेच विकास होतो. आस्तिकता 'छूमंतर' म्हणून जादूची कांडी फिरविल्याने उत्पन्न होणारी नव्हे. हळू हळू क्रमाक्रमाने शिकत शिकतच मनुष्य गणित, भूगोल व इतर विषयात पारंगत होतो, तसे ईश्वराची जवळीक, ईश्वर-विश्वाससुद्धा क्रमिक अभ्यास व अध्ययन यांद्वारेच आत्मसात केला जातो. यासाठी गुरू पाहिजे, परिस्थिती पाहिजे, शिष्याचे शुद्ध अंतःकरणही पाहिजे. ईश्वर-विश्वास विकसित अंतकरणाद्वारेच अनुभवला जाऊ शकतो. अनेक ईश्वर-विश्वासी व्यक्ती वेगवेगळया स्थितीत दिसून येतात. काही छळ कपटात आकंठ बुडालेले आहेत. काही असेही आहेत, जे परिस्थितीशी दोन हात करू शकत नाहीत. अटीतटीची झुंज देऊ शकत नाहीत. काहींना आस्तिकतेच्या सिद्धांताचे ज्ञान नाही. त्यामुळे ते रीति-रिवाज किंवा पाखंड हीच 'आस्तिकता' आहे असे समजतात.ते पितळेलाच सोने समजत आहेत.

पण यामुळेच आस्तिकतेची उपयोगिता, श्रेष्ठता मुळीच कमी होणार नाही. वस्तुतः आस्तिकतेची जाणीव झाली नसती तर आजच्या स्थितीपेक्षा खालची पातळी समाजाने गाठली असती.

प्रलोभन, भीती, संकट अशा अनेक बाबी मनुष्यास खोटे बोलण्याची प्रेरणा करतात.तेव्हा ईश्वरविश्वास, मनुष्यास सत्य मार्गावर दृढ राहण्यासाठी आंतरिक बळ देतो. ईश्वर - विश्वासी मृत्यूदंडास देखील भीणार नाही. आनंदाने कर्तव्यपालनासाठी सदैव तत्पर असतो. मृत्युच्या वेळी देखील ईश्वराची करूणापूर्ण कृपा त्याच्यावर आहे असे तो समजतो. ईश्वर विश्वास माणसास सहनशील बनवितो. शम, दम, इंद्रिय-निग्रहासाठी सहायक ठरतो. पापापासून दूर नेतो. खरे पाहता मानवजीवनासाठी ईश्वर - विश्वास हा एक पारसमणी आहे, ज्याच्या स्पर्शाने माणसाच्या जीवनाचे सोने होते.

ईश्वर-विश्वास नसेल तर आम्ही या गुणांना धारण करू शकत नाही काय? असे काही जण

विचारतील. त्याचे उत्तर आम्ही ठामपणे 'मुळीच नाही' असेच देऊ. इतिहासाची साक्ष किंवा इतर कोणतेही उदाहरण या बाबतीत मिळणार नाही. खरे पाहता, सृष्टीच्या प्रारंभापासून ईश्वर-विश्वास कोणत्या तरी स्वरूपात मानवसमाजात व्याप्त आहे. याच आधारावरील लोकांनी व्यवहारशास्त्राची रचना केली. नीति-नियमांचा मूळ आधार ईश्वर-विश्वासच आहे. मनुष्याच्या जीवनावर त्याचा कुठल्या तरी स्वरूपात प्रभाव पडला आहे. म्हणूनच एखादा मनुष्य ईश्वर विश्वास नसला तरी ते नियम एका सीमेपर्यंत तरी त्यास सदाचाराच्या नियमांचे उल्लंघन करू देत नाहीत. त्यामुळे पापकृत्य एका मर्यादेच्या पलीकडे जात नाहीत. अशा स्थितीत नास्तिकांनी ईश्वर - विश्वास ज्या ठिकाणी तिळमात्रही नाही अशा ठिकाणी जाऊन, आपल्या सर्व पूर्वसंस्कारांना धुऊन टाकून ईश्वरविश्वासांशिवाय मनुष्य सदाचारी होऊ शकतो हे दाखवून द्यावे. पण हे कसे शक्य आहे? गुरुत्वाकर्षण शक्तीशिवाय फिरू शकतो की नाही हे जाणून घेण्याची माझी इच्छा असेल तर जिथे ही शक्ती मुळीच नाही तेथे जावे लागेल. हे शक्य आहे काय? मुळीच नाही. जी बाब शक्य कोटीतली नाही त्याबद्दल व्यर्थ कल्पना तरी कशासाठी? वैज्ञानिक प्रयोगामध्ये कारण नसताना कल्पना केलीच जाऊ शकत नाही.

आणखी एका बाबीवर विचार करावयाचा आहे. सदाचार म्हणजे काय? खोटे न बोलणे, इतरांना त्रास न देणे, चोरी न करणे, हेच ना ! सामाजिक गरजाच मनुष्यास या नियमांचे पालन करण्यास भाग पाडतात. असे थोड्या वेळाकरिता समजू या. पण प्रेरणा बाहेरूनच येईल ना! आणि या सदाचाराची एक मर्यादा - सीमा असेलच ना ! पण जर सदाचारासाठी आत्म- शांती ( self satisfaction) सुद्धा आवश्यक असेल तर ती वरील बाबीद्वारे होणार नाही. जोपर्यंत मनुष्य स्वतःमधल्या महान शक्तीच्या प्रकाशाचा अनुभव करीत नाही तो पर्यंत तो परम सुख किंवा परम आनंदापासून वंचितच राहतो. चेतन मनुष्य जड (अचेतन) वस्तूच्या उपयोगाद्वारे केवळ शारीरिक दुःखापासून वाचू शकतो व शारीरिक सुखे किती क्षणभंगुर असतात, याची जाणीव प्रत्येक विलासी पुरुषाला असतेच.

'पीत्वा पीत्वा पुनः पीत्वा यावत पतति भूतले'

स्वतःचा तोल न सावरण्याइतपत पिऊनदेखील तृप्ती मिळू शकत नाही.भोग - विलासाचा अग्नी प्रत्येक आहुतीमुळे अधिकच प्रचंड होतो आणि मनुष्याचा आत्मा त्यामध्ये दग्ध होतो. बाह्य विषय सुख देण्यासाठी नसून शरीराच्या केवळ साधारण गरजांच्या पूर्तीसाठीच आहेत. भूक असेल तर जेवण करावे. त्यामुळे शरीर कार्य करण्यास सक्षम राहील. जीवनाचा उद्देश जेवणच करणे आहे असे जर समजण्यात आले तर लवकरच दुःखाच्या परंपरेला तोंड द्यावे लागते आणि इतर उदात्त अशा अतिसूक्ष्म सुखापासून हात धुऊन बसावे लागते. जे. एस. मिल महोदयांनी 'यूटीलिटेरियनिज्म' (Utilitarianism) या आपल्या पुस्तकात एक प्रश्न केला आहे. सुखाची इच्छा करणेच जर मनुष्य जीवनाचा उद्देश असेल तर वराह आणि मनुष्य यांमध्ये फरक तो कोणता? 'चिखलात लोळणाऱ्या वराहाच्या सुखापेक्षा अधिक सुख कोमल मखमली शय्येवर लोळणाऱ्या

राजास होत नाही.' असे उत्तर मिलनीच दिले आहे. मनुष्य आणि वराह यांच्या सुखात अंतर आहे. सूक्ष्मतम आनंदाचा अनुभव करण्याची शक्ती वराहामध्ये नाही. मिल महोदयांचे हे म्हणणे अगदी बरोबर आहे. पण 'मिल' महोदयांनी हीच युक्ती थोडी पुढे चालवून उत्कृष्ट सूक्ष्मतम आनंदाविषयी विचार केला असता तर वराहाच्या सुखापेक्षा मानवी सुख उच्च प्रतीचे आहे हे जसे समजले असते, तसे विलासी व्यक्तीच्या सुखापेक्षा ईश्वर-विश्वासी ज्या आनंदाचा अनुभव करतो ते सुख हजारपटीने श्रेष्ठ आहे हे त्यांना समजले असते. एक गणितज्ञ गणितासंबंधीच्या कठीण प्रश्नांना सोडवण्यात जो आनंद अनुभवतो तो षट् रसयुक्त पंचपक्वान्नाद्वारेही अनुभवत नाही. पण त्या सूक्ष्म सुखाची जाण नसलेला बालक मिठाई खाऊन, यापेक्षा अधिक सुखद वस्तू असेल काय? असे म्हणतो. बालबुद्धी बाळगणाऱ्या माणसांची स्थिती अशीच आहे. ते इंद्रियांच्या तृप्तीतच जीवनाचे सार-सर्वस्व समजतात. चेतन जीवात्मा इंद्रियांच्या वशात असेतोवर ती त्यास वाट्टेल तसे नाचवतात. इतरांच्या आदेशाप्रमाणे, इतरांच्या इशाऱ्यावर नाचणाऱ्यास सुख ते कसे मिळणार? दुःखातून सुटकेचा मार्ग तो कसा सापडणार? म्हणूनच वेदात :

यस्तु सर्वाणि भूतानि आत्मन्येवानुपश्यति ।
सर्वभूतेषु चात्मानं ततो न विचिकित्सति ॥
यस्मिन्सर्वाणि भूतान्यात्मैवाभूद्विजानतः ।
तत्र को मोहः कः शोकः एकत्वमनुपश्यतः ॥

यजु.अ.४० म.६,७

जो संपूर्ण सृष्टी एका परमेश्वरात व्याप्त आहे असे जाणतो त्यास कोणत्याही प्रकारचा मोह किंवा दुःख होऊ शकत नाही.

ईश्वरभक्तांना सांसारिक सुखावर लाथ मारताना व आपल्या कर्तव्यपालनामध्ये कोणाचेही भय बाळगत नसलेले आम्ही पाहतो ते याच कारणामुळे. लोकांनी त्यांना मूर्ख म्हटले किंवा निंदा केली तरी ते तिळमात्रही काळजी करीत नाहीत. त्यांचे हृदय प्रेमाने ओथंबलेले आहे. तेच सदाचाराचे वस्तुतः खरे आधार आहेत.

ईश्वर सदाचार, दुराचार या दोन्हीपासून मुक्त आहे. तो आचाररहित (Unmoral) आहे, तो आम्हास सदाचार कसे शिकवू शकतो? असा काही जणांचा आक्षेप आहे. निराचार शब्दाचा अर्थ वाचकांना माहीतच असेल. एक आहे सदाचार, दुसरा आहे दुराचार. हे दोन्ही सापेक्षिक शब्द आहेत. मनुष्य सदाचारी तरी असेल किंवा दुराचारी तरी असेल. परंतु कुत्रा, मांजर वगैरे प्राण्यांची कामे बुद्धिपूर्वक होत नसल्यामुळे त्यांच्या बाबतीत सदाचार, दुराचार यांचा प्रश्नच उद्भवत नाही. म्हणून त्या प्राण्यांची गणना (Moral Beings) नैतिक प्राण्यांमध्ये होत नाही. त्यांना सदाचारी किंवा दुराचारी असे म्हणता येत नाही. याचप्रमाणे ईश्वराबाबतीत नैतिकतेसंबंधी प्रश्न उद्भवत नाही, असे काही जणांचे म्हणणे आहे. तो सुद्धा अतिनैतिक म्हणजे (Unmoral Being) आहे. कारण तो एकाच प्रकारची कामे करतो. नैतिकता बाळगणाऱ्यानेच नैतिकता शिकवावी.

अतिनैतिक ईश्वर मानवास सदाचारी कसे बनवू शकतो? असा काही जणांचा आक्षेप आहे.

कुत्र्या, मांजराप्रमाणे ईश्वराची स्थिती नाही. खरे पाहता, ज्या दृष्टिकोणातून मनुष्य सदाचारी म्हटला तसे ईश्वरासही सदाचारी म्हणता येईल. ईश्वर 'सत्' आहे म्हणून त्याचा व्यवहारसुद्धा सदाचारच म्हणवला जाईल. कुत्रा, मांजर वगैरे प्राणी खोटे बोलत नाहीत, चोरी करीत नाहीत. पण, हा केवळ निषेधात्मक (Negative) सदाचार आहे, बुद्धिपूर्वक नाही. ईश्वराची सर्व कामे बुद्धिपूर्वक असतात. तो दुराचारण करू शकत नाही म्हणून त्यास अतिनैतिक म्हणता येत नाही. सत्पुरुषांचा व्यवहार मानवमात्रासाठी अनुसरणीय असल्याप्रमाणे दया, प्रेम, न्याय, परोपकार वगैरे जे ईश्वराचे गुण आहेत, त्यांचेही अनुसरण करणे मनुष्यांना आवश्यक आहे. ईश्वरास अतिनैतिक बनवून त्यापासून सदाचारापासून वेगळा करू पाहणे हा केवळ 'शब्दच्छल' आहे. खरे पाहता, असे म्हणणे अर्थहीन आहे. आर.एस. आर्मस्ट्राँगचे म्हणणे खरोखरच सत्यतेच्या अगदी जवळचे आहे.

"Goodness is the life of harmony with the eternal conditions which spring from the being of God, and blessedness (The pure and perfect happiness) is the keeling of that harmony in the life"

(God & the soul P. 141)

सत्पुरुष म्हणजे ईश्वरामुळे अस्तित्वात असलेल्या 'सत्' नियमांच्या अनुकूल जीवन जगणे हाच सदाचार आहे. आणि या अनुकूलतेचा अनुभव करणेच परमानंद आहे.

आस्तिकांनी ईश्वराच्या अशा काही गुणांचे वर्णन केले आहे की, ज्यांना सदाचाराच्या श्रेणीत ठेवता येत नाही. कोणताही सदाचारी मनुष्य त्यांचा स्वीकार करावयास तयार होणार नाही. असे असताना ईश्वराच्या कामांचे अनुकरण करून आम्ही सदाचारी बनू शकतो असे कसे म्हणता येईल? मिल महोदय एका ठिकाणी असाच आक्षेप करतात :

"ईश्वराच्या अस्तित्वास सिद्ध करणारे प्रमाण मिळाल्यास मी ईश्वराचे अस्तित्व स्वीकारीन. पण, एका सदाचारी मनुष्यास वापरल्या जाणाऱ्या विशेषणाद्वारे त्यास संबोधित करण्यासाठी केव्हाच तयार होणार नाही. ईश्वराने मला घोर नरकात टाकले तरी मी त्याचा स्वीकार करीन. पण, एका क्रूर सत्तेस दयाळू म्हणून खोटे बोलणे मी कधीच स्वीकारणार नाही."

खरे पाहता, हे वीर, पराक्रमी पुरुषाचे वाक्य आहे. या वाक्याचा उद्घोष करताना मिल आपल्या लाभवादा (उपयोगितावादा) चीसुद्धा पर्वा करीत नाहीत. घोर कष्ट मिळत असतानासुद्धा ते सत्यवादीच राहू इच्छितात. या सत्यवादितेसाठी त्यांना कुठून प्रेरणा मिळते? लाभवाद आणि सुखवाद, ज्यांचे ते प्रचारक आहेत, दुःख सहन करून सत्य बोलण्याची प्रेरणा त्यांना कधीच करणार नाही. ही प्रेरणा महर्षी दयानंदांद्वारे वर्णिलेल्या ईश्वरीय ध्वनीतूनच झालेली आहे असे मला वाटते. यावरून खरे पाहता, सदाचाराची कसोटी आमच्या आत्यामध्येच उपस्थित आहे असे दिसून येते. कितीही दुःख सहन करावे लागले तरी पापापासून दूर राहण्याचा, पुण्यकर्मामध्ये निष्ठा बाळगण्याचा उपदेश अंतरात्मा प्रत्येक आत्म्यास देत आहे. ज्या ईश्वरीय सत्तेच्या स्वीकारासाठी मिल महोदयांना पुरावा आढळला नाही, तीच सत्ता मिल यांना त्यांच्या सिद्धांताविरुद्ध बोलण्यास

भाग पाडीत आहे. पराकोटीचे दुःख अनुभवले तरी चालेल पण खोटे बोलणे बरोबर नाही असे ती सत्ता सांगत आहे आणि त्याचा स्वीकार मिल महोदय करीत आहेत. डॉ.वार्डनी बरोबरच म्हटले आहे :

"When a crucical case really comes before him, his better nature compells him to decide sternely, premptorily, effusively, indignantly against his own doctrine".

''एका प्रामाणिक वेळी मिलची उच्च प्रकृती त्यांना त्यांच्या मताविरुद्धसुद्धा निर्णय घेण्यासाठी भाग पाडीत आहे.''

हा सत्य बोलण्याचा उपदेश, क्रूर शक्तीशी सामना करण्याचा उपदेश, 'घोर कष्टामध्ये सुद्धा सत्यपरायणतेचा उपदेश, ज्या उपदेशावर मुग्ध होऊन त्यांच्या लेखणीतून अशा उच्च भावनांचा उद्घोष बाहेर पडत आहे, हा उपदेश त्या ईश्वरीय सत्तेचा ध्वनी आहे, ज्या सत्तेने वेदात :

''अश्रद्धामनृते दधात् श्रद्धां सत्ये प्रजापतिः ।

असत्यामध्ये अश्रद्धा, सत्यामध्ये श्रद्धा बाळगली पाहिजे'' असा उपदेश केला आहे. ही बाब जर मिल महोदयांना उमजली असती तर किती आनंद झाला असता!

पण, जोपर्यंत जगात खऱ्या आस्तिकतेचा प्रचार होत नाही तोवर हे शक्य नाही. ईश्वरास अत्यंत क्रूर, दुराचारी समजणारे कितीतरी पंथ आज अस्तित्वात आहेत. तुळशीदास रामायणात अयोध्या कांडात लिहितात :

विधन मनावहिं देव कुचाली।

इंद्र, विष्णू, महादेव वगैरे देवांनी न केलेले असे कोणते पाप आहे की ज्याचे वर्णन पुराणात आढळून येत नाही? देवी-देवतांनी न केलेले असे ते कोणते वाईट काम आहे? ईर्ष्या, द्वेष, व्यभिचार, छळ-कपट ऱ्या सर्वांनी देवतांच्या गाथा, पुराण व तत्सदृश, इतर पंथीय ग्रंथ भरलेले आहेत. यूनानचे काव्यग्रंथ इलियड व ओडेसी वाचून पहा. तेथेसुद्धा देवी-देवतांनी अशाच प्रकारे भ्रष्टाचाराचे स्तोम माजविले आहे. ग्रीकांच्या देवमालेचे एकदा परीक्षण करून पहा. एवढेच नव्हे तर जगप्रसिद्ध पंथांचे मूळग्रंथ 'बायबल' व 'कुरान' यांना तपासून पाहा. त्यातील ईश्वरासंबंधीचे वर्णन वाचून तार्किक मनुष्याच्या हृदयात आस्तिकतेविषयी उपरती झाली नाही तरच नवल! एकदा नास्तिकतेचे बीजारोपण मनुष्याच्या हृदयात झाले म्हणजे त्यास अनेक प्रकारे पल्लवित व पुष्पित होण्यासाठी अधिक वेळ लागत नाही.

ईश्वराच्या सत्य स्वरूपास जाणणे आवश्यक आहे. तेव्हाच आमचे हृदय वास्तविक धार्मिक भावनेने परिपूर्ण होईल. तेव्हाच आम्ही सदाचारी बनू शकतो.

आस्तिक दुःखी आहेत व नास्तिक सुखी आहेत असे म्हणणाऱ्या लोकांचे म्हणणे निरर्थक आहे. सुख, दुःख आणि सुख, दुःखाचे आडंबर, दिखाऊपणा यात आकाशपाताळाचे अंतर आहे. सर्वसाधारण व्यक्ती वरच्या देखाव्यावरूनच सुखाची किंवा दुःखाची कल्पना करतात. महालात

राहणारे सर्वजण सुखी व कैदेत राहणारे सर्वच जण दुःखी आहेत असे ते समजतात. पण जे सुख-दुःखाच्या वास्तविक स्वरूपास जाणतात ते अशा भ्रमात फसत नाहीत. सुख-दुःख हे आंतरिक आहेत, बाहेरून येणारे नव्हेत. जगातील ऐश्वर्याचे शिखर गाठूनही मनुष्य दुःखी असू शकतो व कारागृहात राहूनही सुखी असू शकतो. खरे तर, नास्तिकांना सुख कशास म्हणावे हे देखील माहीत नाही. ते चार्वाकाप्रमाणे साधारण सुखांनाच सुख समजत आहेत. भयंकर संकटे ओढवतील तेव्हा, मानवी-शक्ती सहकार्यासाठी धावणार नाही तेव्हा, धैर्य देण्यासाठी कुणीच राहणार नाही तेव्हा, नास्तिकासमोर घोर अंधकाराचे साम्राज्य पसरेल. त्या वेळी त्यास सांत्वना कोण देणार? त्या संतप्त हृदयास 'भिऊ नको, मी तुझ्या पाठीशी आहे' असे म्हणणारा कोण आहे? अशा व्यक्तीसाठी तळपत्या सूर्याची दुपारसुद्धा मध्यरात्रीप्रमाणे आहे. आपल्या बाहुबलावर विश्वास ठेवीत असला तरी एक वेळ अशी येते की, बाहुबलसुद्धा कुचकामी ठरते. अशा व्यक्तीची ईश्वर-विश्वासी व्यक्तीशी तुलना करा. निर्जन अरण्य असो, समुद्र असो की वादळ असो, भेडसावणारी अर्धी रात्र असो की कारागृह असो, सबंध शरीर रोगाने पछाडलेले असो की फासावर चढण्याची पाळी येवो, कोणतेही कष्ट, कितीही संकटे आली तरी ईश्वर-विश्वासी व्यक्तीचा आनंद हिरावला जाऊ शकत नाही. ईश्वराचे स्मरण होताच आनंदाचा झरा वाहू लागतो. अग्निज्वालांनी दग्ध होत असतानासुद्धा ओठावर हास्य नृत्य करीत असलेले दिसून येईल. आईच्या कुशीत ज्वराने फणफणत असलेले मूल सांत्वनेचा अनुभव करते तर जगदंबेच्या कुशीत, अंगाईगीताच्या गोडव्याचा व मस्तकावर अमृतकराचा स्पर्श अनुभव करीत आपले दुःख न विसरणारा असा दुःखी तो कोण आहे?

नित्यो नित्यानां, चेतनश्चेतनानाम् ।
एको बहूनां यो विदधाति कामान् ।।
तमात्मस्थं ये ऽनुपश्यन्तिधीरास्तेषां –
सुखं शाश्वतं नेतरेषाम् ।। (कठोपनिषद)

नित्य पदार्थांमध्ये नित्य आणि चेतनांमध्ये चेतन असलेल्या परमेश्वरास स्वतःच्या हृदयात पाहणाऱ्यासच वास्तविक सुख मिळते, इतरांना मानवजीवनाच्या उदात्त सुखाचा अनुभव होत नाही.

पण, काहीजण या वास्तविक आनंदास भ्रम समजतात. ते म्हणतात :

You speak of the starry heavens restoring your soul peace and consciousness of God. I have found a cup of coffee have the like effect. Do you not think that a dose of opium or Bashish, if of right amount would open up heaven to you?

ताऱ्यांनी भरलेल्या आकाशात पाहून जो आनंद व ईश्वर - विचार तू अनुभवत आहेस तो आनंद मला एक कप कॉफीच्या प्याल्यातच मिळत आहे. अफीम किंवा नशा वाढवणाऱ्या वस्तूचे सेवन केले तर स्वर्गाचे द्वार उघडत नाही काय?

असे म्हणणाऱ्या महाभागांनीच, 'पीत्वा पीत्वा पुनः पीत्वा यावत्पतति भूतले'चा सिद्धांत शोधून काढला होता. त्यांच्या दृष्टीत 'मूर्च्छा' हाच आनंद आहे. ज्ञानाचा, जाणीवेचा, चैतन्याचा नाश हाच आनंद असेल तर दगड-विटा वगैरे आमच्यापेक्षा कितीतरी आनंदी असतील. मादक वस्तूची नशा काही वेळानंतर उतरेल पण दगडा-विटांना दुःखाची जाणीव कधीच होत नाही. दुःख दूर करण्यासाठी मादक वस्तूंचा वापर करणारे किती मूर्ख आहेत? एक महाशय, जेव्हा त्यांना मानसिक त्रास होत असे तेव्हा ते एक 'बॉटल' दारू घेत असत. दारू ही दुःखाला दूर पळवून लावणारी तोफ आहे असे त्यांना वाटत असे. पण अनेक वेळा दुःखच त्यांचा नशा उतरवून टाकीत असे. दारूमध्ये दुःख दूर करण्याची शक्ती असती तर दारूच्या दुकानापासून दुःख शेकडो मैल दूर राहिले असते. पण, दारूड्यांना विचारुन पहा. दुःख आपल्या सर्व सैन्यानिशी त्यांच्यावर कसे आक्रमण करते आणि त्यांचा कसा पाठलाग करते ते!

ज्या वेळी आमच्या हृदयग्रंथी सैल होतात, सर्व संदेह संपुष्टात येतात. तर्क आणि भावनेच्या बंधनातून आम्ही जेव्हा मुक्त होतो, तेव्हा परमेश्वराचा साक्षात्कार होतो. तेव्हाच दुःखाचा वास्तविक पाहता अंत होतो.

भिद्यते हृदयग्रन्थिश्छिद्यन्ते सर्व संशयाः ।
क्षीयन्ते चास्य कर्माणि तस्मिन् दृष्टे परावरे ॥

(कठोपनिषद)

❑❑❑

# अध्याय : बारावा

## ईश्वर-साक्षात्काराची साधनें

ईश्वर प्रत्येक ठिकाणी व प्रत्येक काळात व्यापक असल्यामुळे प्रत्येक जीवास स्वभावतःच प्राप्त आहे.

तदेजति तन्नैजति तद्दूरे तद्वन्तिके ।
तदन्तरस्य सर्वस्य तदु सर्वस्यास्य बाह्यतः ॥

ईश्वर अचल- स्थिर आहे. पण तोच ब्रह्मांडास चालवणारा आहे. तो दूरही आहे जवळही आहे. तो सर्वांच्या आतबाहेर सर्वत्र आहे.

सर्वांच्या जवळ असूनसुद्धा वास्तविकरीत्या तो दूरच आहे. काळाच्या, स्थळाच्या अपेक्षेने तो जवळ असला तरी सर्वांना त्याचा अनुभव होत नाही.

हा अनुभव कसा होऊ शकेल याचे विवेचन या अध्यायात करण्यात आले आहे.

ईश्वराच्या अनुभवासाठी (साक्षात्कारासाठी) तीन साधनांचा अवलंब करावा लागतो. ज्ञान, कर्म व उपासना ही ती तीन साधने आहेत. ईश्वर साक्षात्कार एकेका साधनाद्वारे होत नसून तीन्हींच्या सहकार्यानेच होतो. या तीन्ही साधनांच्या एकत्रीकरणाचे नाव 'ईश्वर-भक्ती' आहे. या एकत्रित साधन-त्रयाद्वारेच मोक्ष मिळतो. एकेका साधनाबाबतीत विचार करू या.

### कर्म

ईश्वरभक्तीच्या 'कर्म' या भागाचा विचार अगोदर करू या. कर्म आणि त्याच्या फळाचे विवेचन करताना माणसाने सत्कर्म करीत जीवन जगावे असे सांगितले होते. वेदामध्ये किती सुंदर उपदेश देण्यात आला आहे. पाहा.

कुर्वन्नेवेह कर्माणि जिजीविषेच्छतं समाः ।
एवं त्वयि नान्यथेतोऽस्ति न कर्म लिप्यते नरे ॥ यजु : अ.४० म.३

मनुष्याने सबंध जीवन उत्तम कर्म करीत राहावे. फळाची अपेक्षा नसलेले कर्म केल्यानेच कर्माच्या बंधनातून मुक्त होता येते. मुक्त होण्याचा हाच एकमेव मार्ग आहे असे सांगितले आहे.

वेदामध्ये कर्माची अवहेलना करण्यात आली आहे असे अनेकजण समजतात. "ऋते ज्ञानान्नमुक्तिः" ज्ञानाशिवाय मुक्ती नाही अशा वाक्यामुळे त्यांना भ्रम झाला असेल. कर्माशिवाय ज्ञान मिळू शकत नाही याची जाणीव ते बाळगत नाहीत. या भ्रमामध्ये पडून स्वतःला वेदांती म्हणवून घेणारे चिमटा हलवीत, चिपळया वाजवीत सर्व जबाबदारी झटकून विनाकारण भटकत असतात.

आम्ही शरीराकडे पाहिले असता यात ज्ञानेंद्रिये व कर्मेंद्रिये दोन्ही आढळून येतात. नेत्र पायांना चालण्यांसाठी सहायता करतात आणि पाय नेत्रांना वेगवेगळया ठिकाणी घेऊन जाऊन उत्तम

दृश्य दाखवितात. त्यामुळे ज्ञान वाढते. अशा प्रकारे ज्ञान आणि कर्म परस्परांच्या उन्नतीसाठी कारणीभूत ठरतात. एका वेळी कर्म अगोदर तर दुसऱ्या वेळी ज्ञान अगोदर होते. केव्हा ज्ञानपूर्वक कर्म करतो तर केव्हा कर्मपूर्वक ज्ञानप्राप्ती होते.

सांसारिक कर्म करीत ईश्वराची प्राप्ती (प्राप्ती म्हणजे साक्षात्कार; साक्षात्कार म्हणजे आनंदाची अनुभूती) होऊ शकत नाही असे काही जणांचे मत आहे. म्हणून ते जगास सोडून ईश्वराचा शोध घेतात. जणू ईश्वर जगामध्ये नसून जगाच्या बाहेर कुठे तरी दडून बसला आहे. कर्म करीत असेपर्यंत भक्तीसाठी वेळच मिळत नाही असे काहीजणांचे मत आहे. पण वेद या मताचा विरोध करीत आहेत. कर्माचरणाशिवाय आमचे कल्याण होऊच शकत नाही असा उपदेश वेद करीत आहेत.

बाळाच्या जन्माबरोबरच त्याच्या कर्मांचा प्रारंभ होतो. त्याच्या अविकसित बुद्धीद्वारे होणाऱ्या कर्मांचा जबाबदार तो असणार नाही. तरीपण त्याच्या आईवडिलांच्या व संबंधितांच्या कर्मांचा प्रभाव त्याच्या मनावर पडल्याशिवाय राहत नाही. म्हणूनच तर वैदिक संस्कार केले पाहिजेत. यज्ञ वगैरे करण्याचा हाच उद्देश आहे. यामुळे बालमनावर सुसंस्कार घडतात. हे शुभ संस्कारच मनुष्यास येणाऱ्या जीवनात शुभकर्म करण्यासाठी व अशुभ कर्म टाळण्यासाठी योग्य बनवतात. आणि हेच कर्म शेवटी ईश्वर-साक्षात्कार करवून देते. या वाक्यातील 'शेवटी' हा शब्द 'मुक्ती' बोधक आहे. पण मुक्तीच्या अगोदर या कर्माद्वारे ईश्वर-साक्षात्कार होऊ शकत नाही असे मात्र कोणी समजू नये. वस्तुतः शुभ संस्काराच्या प्रारंभाबरोबरच ईश्वराच्या अनुभवाची सुरुवात होते. ईश्वराचा अनुभव शरीरास पुष्टी देणाऱ्या व अधिक अन्न ग्रहण करण्याचे सामर्थ्य देणाऱ्या आहाराप्रमाणे आहे. शुभसंस्काराच्या उत्पत्तीबरोबरच मनुष्य ईश्वराचा अनुभव करतो व हा ईश्वराचा अनुभव पुण्यकर्म करण्यासाठी मनुष्यास सहायता करतो. पुण्यकर्म ईश्वरानुभूतीकडे वळवतात व यामुळे अधिक पुण्य करण्यास सहायता मिळते. अशा प्रकारे एकमेकांच्या साहाय्याने शेवटी मोक्षाचा अनुभव होतो. यजुर्वेदात :

व्रतेन दीक्षामाप्नोति दीक्षयाप्नोति दक्षिणाम् ।
दक्षिणया श्रद्धामाप्नोति श्रद्धया सत्यमाप्यते ।।

शुभकर्म करण्याचे व्रत घेतलेल्या मनुष्यास शुभकर्म करण्याचा अधिकार प्राप्त होतो. अधिकारप्राप्तीमुळे योग्यतेची वाढ होते. योग्यतेमुळे श्रद्धा, उत्साह उत्पन्न होतो. श्रद्धेमुळे सत्याची प्राप्ती होते, असे सांगितले आहे.

वेदांतशास्त्राच्या पहिल्या सूत्राची व्याख्या करताना श्री शंकराचार्यांनी ब्रह्मजिज्ञासेसाठी चार विषयांची आवश्यकता प्रतिपादन केली आहे.

१. नित्यानित्यवस्तुविवेक : कोणती वस्तू नित्य आहे, कोणती अनित्य आहे याचा निश्चय होणे.

२. इहामुत्रार्थभोगविराग : लौकिक व पारलौकिक सुखांच्या अनुभवाची विरक्ती होणे.

३. शमदमादि साधन सम्पत् : (शमदमादिरूपस्य साधनस्य संपत् (प्रकर्ष इति भामती) शम, दम म्हणजे मन व इन्द्रियांना आपल्या स्वाधीन ठेवणे.

४. मुमुक्षत्व : मोक्षाची इच्छा.

ईश्वरभक्तीशिवाय नित्य-अनित्य वस्तूंच्या बाबतीत विवेकाचा उदय होऊच शकत नाही. ईश्वराचा अनुभव होऊ लागताच नित्य-अनित्य वस्तूंच्या विवेकाचा प्रारंभ होतो. खरे पाहता, नित्य-अनित्य-विवेक व ईश्वराचा अनुभव एकमेकासोबतच होत असतो. जसे दिवा असेल तर दिव्यासोबत इतर वस्तूंनाही पाहता येते. सूर्याचा प्रकाश सूर्यासहित इतर वस्तूंनाही दाखवितो. याचप्रमाणे ब्रह्मज्ञान आम्हास ब्रह्म व इतर वस्तूंच्या विवेकासाठी सहायता करते. त्याचप्रमाणे ब्रह्मजिज्ञासा, ईश्वर-साक्षात्काराची प्रबळ इच्छा असल्याशिवाय विलासी जीवनापासून मनुष्य विमुखही होऊ शकत नाही. इंद्रियाचा संयमदेखील साधला जाऊ शकत नाही. म्हणून हे सर्व एका स्थितीत साधन व दुसऱ्या स्थितीत साध्य होऊन कार्यसिद्धी करीत आहेत. मूल डोळे उघडताच सूर्याचा प्रकाश ग्रहण करते. पण, प्रचंड प्रकाशाचे ग्रहण करण्याचे सामर्थ्य त्याच्याजवळ नाही. सूर्याच्या कोवळया किरणांनाच ते ग्रहण करू शकते. पण, तीच कोवळी किरणे मुलाच्या नेत्रांना अधिक प्रकाश ग्रहण करण्याची शक्ती देतात. अशीच स्थिती ब्रह्म जिज्ञासेची आहे.

ब्रह्मजिज्ञासेचा, ईश्वर साक्षात्काराचा कर्माशी काहीही संबंध नाही, असे बऱ्याच जणांचे मत आहे. पण, हा त्यांचा गैरसमज आहे. शंकराचार्य लिहितात :

वेद एवाग्निहोत्रादीनां श्रेयः साधनानामनित्यफलतां दर्शयति ।
तद्यथेह कर्मचितोलोकः क्षीयते एवमेवामुत्र पुण्यचितोलोकः क्षीयते ।।
(छान्दोग्य ८/१६)

वेदामध्ये अग्निहोत्रादि श्रेय साधनांचे फळ अनित्य आहे असे वर्णिले आहे. 'इहलोकासाठी केलेल्या कर्माचे फळ नष्ट झाल्याप्रमाणे परलोकासाठी केलेल्या पुण्यकर्माचे फळही नष्ट होते, असे छान्दोग्य उपनिषदामध्ये वर्णिले आहे.

असे असेल तर अग्निहोत्रादि साधने 'श्रेय' आहेत असे का म्हटले आहे? मद्यपान, परस्त्री-गमन यांसारख्या कर्माच्या फळाप्रमाणे अग्निहोत्रादि कर्माची फळेसुद्धा अनित्य असतील तर ही तरी का केली जावीत? यांना श्रेय साधन म्हणण्याचा उद्देश काही तरी असेलच ना! आणि उद्देश आहेच. ही दोन्ही प्रकारची कामे एकसारखी नाहीत. एक ईश्वर-साक्षात्काराकडे घेऊन जाते तर दुसरे ईश्वरापासून दूर नेते. साध्याची प्राप्ती होताच साधनाचा नाश होतो. स्वयंपाक होताच चूल विझविली जाते. अग्नी अनित्य आहे म्हणून त्याचे प्रज्वलन निष्प्रयोजन आहे असा अर्थ होत नाही. कर्मफळाचा नाश होतो असे जे उपनिषदे सांगतात ते बरोबरच आहे. पण, फळाच्या क्षीणतेबरोबर साधन होण्याची योग्यताही त्या फळामध्ये आहे.

ईश्वर-साक्षात्काराच्या इच्छेने केली जाणारी, आमच्या जीवनाशी संबंधित असलेली सर्व शुभकर्मे आमच्यासाठी अत्यावश्यक आहेत. याशिवाय आम्ही ईश्वरसाक्षात्काराच्या साधनांचे संपादन

करूच शकत नाही. यात काही दूरची तर काही साधने जवळची आहेत. मनुष्य साध्यापासून जेवढा दूर असेल तेवढ्याच अधिक साधनांचा उपयोग करावा लागेल. हे एका उदाहरणाद्वारे स्पष्ट करता येईल.

आम्हास उद्‌गीरहून मुंबईस जावयाचे असेल तर रिक्षाद्वारे स्टेशन गाठावे लागेल. तिकीट घेऊन गाडीत बसावे लागेल. अनेक स्टेशन मागे टाकीत, गाड्यांची अदला-बदल करीत मुंबईस पोहचावे लागेल. ही सर्व साधने मुंबईस पोहचवणारी असली तरी यात काही जवळची आहेत तर काही दूरची आहेत. जेवण करणेसुद्धा मुंबईस पोहचण्याचे साधन आहे. पण, तेच जेवण चोरी करण्याचेही साधन बनू शकते. यावरून साध्याची प्राप्ती करवून देणारी, साध्यास दृष्टिक्षेपात ठेवून केली जाणारी सर्व कामे साधन होऊ शकतात.

एखादी बाब साधनाच्या कक्षेत येण्यासाठी दोन निकष आवश्यक आहेत.

१. साध्यापर्यंत पोहचवण्याची योग्यता.

२. साध्याच्या पूर्ततेच्या दृष्टीने सहायक ठरणे.

यांपैकी एखादेही नसेल तर ते साधन होऊ शकत नाही. मुंबईस जाण्यासाठी पुण्यास जावे लागते. पण जाणाऱ्यांची दृष्टी पुण्याऐवजी मुंबईवर असावी लागते. कुठे चाललात? असे विचारताच 'मुंबई' असे उत्तर देतो. 'पुणे' असे म्हणत नाही. पुण्यास जावे लागत असले तरी दृष्टी मुंबईवरच आहे.

सांसारिक कामे अशीच असतात. आम्ही चार प्रकारची कामे करतो.

१. काही कामे ईश्वर- साक्षात्कार करवून देण्याच्या योग्यतेची असतात. ती त्याच उद्देशाने केली जातात. दान देणे, विद्या शिकणे, परोपकार करणे इत्यादी.

२. काही कामे ईश्वर-साक्षात्कार करवून देण्याची योग्यता बाळगत असली तरी ती या उद्देशाने केली जात नाहीत. कीर्तीसाठी दान देणे, एखाद्या स्वार्थपूर्तीसाठी इतरांना सहायता करणे वगैरे.

३. ईश्वर साक्षात्काराची इच्छा बाळगून काही कामे केली जातात पण त्यांच्यात ती योग्यता नसते. मूर्तिपूजा, पशूंचा बळी देणे वगैरे.

४. काही कामात ईश्वरानुभवाची योग्यताही नसते आणि ती त्या उद्देशाने केलीही जात नाहीत. चोरी, व्यभिचार वगैरे.

तिसऱ्या आणि चौथ्या श्रेणीच्या कामामुळे जगाचेही कल्याण होत नाही व कर्त्याच्या आत्म्याची उन्नतीही होत नाही. म्हणून ही निषिद्ध आहेत. यांच्यामुळे समाज आणि व्यक्ती या दोघांचीही हानी होते.

दुसऱ्या श्रेणीची कामे मनुष्यास ईश्वरानुभव करवून देत नाहीत. पण त्यास अनुभवाची जवळीक मिळवून देऊ शकतात. मनुष्य शुभ कर्म करतो, पण सकाम भावनेने शुभकर्म करण्याची आवड असल्याने निषिद्ध कर्मे त्याच्या आत्म्यावर विपरीत प्रभाव पाडू शकत नाहीत. स्वार्थाने प्रेरित होऊन

पुण्यकर्म करीत असल्यामुळे त्यास सन्मार्गापासून विचलित होण्याची भीती असते. तो विचलित होऊही शकतो. पुण्यास पोहचल्यावर मुंबई ऐवजी इतरत्रही जाऊ शकतो. पण, मुंबईस जाण्याचीही शक्यता आहे.

निषिद्ध कर्म करणाऱ्यापेक्षा सकामी, स्वार्थाने प्रेरित होऊन पुण्य करणारा श्रेष्ठ आहे. त्यास ईश्वरानुभूती लवकर होऊ शकते. छान्दोग्योपनिषदाच्या वरील वाक्यात विवेचन केल्याप्रमाणे सकामकर्माच्या फळाचा लाभ अवश्य होतो यात मुळीच संदेह नाही. ही कामे निश्चितच मनुष्यास ईश्वरानुभूतीच्या जवळ घेऊन जातात.

म्हणून यज्ञासारखे शुभकार्य व्यर्थ नसून अत्यावश्यक आहेत. यामुळे अंतःकरणात शुभ-संस्कार उदयास येतात. यांच्या आचरणाशिवाय मनुष्य उन्नतीसाठी योग्य बनू शकत नाही. एखाद्या मनुष्याने जेवण सोडल्यास थोड्याच दिवसांत तो दुर्बळ होईल. डोके फिरू लागेल. अशा स्थितीत मोक्ष मिळवण्याची योग्यता राहील काय? तो योगाची साधना करू शकेल काय? मुळीच नाही. अशीच स्थिती सांसारिक कार्यांची आहे. जीं व्यक्ती या कर्माचे आचरण केल्याशिवाय ईश्वरानुभव मिळवू इच्छिते, ती भ्रमामध्ये वावरत आहे. ईश्वराची जवळीक तर त्यास लाभणारच नाही, उलट तो ईश्वरापासून दूर जाईल. म्हणून ईश्वरानुभवासाठी खालील चार प्रकारची शुभकर्मे आवश्यक आहेत.

१. पंचमहायज्ञादी करणे.
२. स्वतःच्या निर्वाहासाठी शुभकर्मे करणे.
३. दान देणे.
४. इतर प्राण्यांचे दुःख दूर करण्यासाठी प्रयत्न करणे.

या चार प्रकारच्या कर्मांमध्ये ईश्वर-साक्षात्काराकडे नेणाऱ्या सर्व कर्मांचा समावेश होतो.

ही सर्व कर्मे ईश्वरानुभवाच्या उद्देशाने केली गेली तर ईश्वर-साक्षात्कार सहज शक्य होतो व त्यापासून दूर जाण्याची शक्यताही राहत नाही. ईश्वरानुभवाचे उद्दिष्ट नसेल तर मार्गापासून विचलित होण्याची भीती असते, अंतःकरणात मुमुक्षत्वही उदयास येत नाही, नित्य-अनित्य विवेकासाठी काहीच मदत मिळू शकत नाही.

काहीजण यज्ञ-हवन हे कर्मकांड आहेत, असे समजतात. ते दररोज सकाळी उठून संध्या, अग्निहोत्र करतात, इतर यज्ञांमध्ये सुद्धा भाग घेतात. पण ते स्वतःच्या निर्वाहासाठी शुभकर्मे करीत नाहीत. दान देत नाहीत. सामाजिक समस्या सोडवण्याचा प्रयत्नही करीत नाहीत. अशी माणसे कधीच उन्नती करू शकत नाहीत. हे कर्मकांड (कर्तव्यपूर्ती) नव्हे, पाखंड, ढोंग आहे. यज्ञ-हवन करणे पाखंड नव्हे, पण आपल्या कर्तव्यांना यज्ञापुरतेच मर्यादित करणे फार मोठे पाखंड आहे. हिंदू समाजात असे पाखंड, ढोंग अधिक पसरलेले आहे. यज्ञादी ही केवळ कर्मकांडाचे भाग आहेत. ते आवश्यक असले तरी फार मोठा भाग होऊ शकत नाहीत. शेतीची मशागत करून जो पेरणी करीत नाही तो मूर्ख ठरतो. शेतीची मशागत हा आवश्यक भाग असला तरी फार मोठा भाग

नव्हे. पंच महायज्ञ करणे एक प्रकारे स्वतःच्या आत्मक्षेत्रास इतर कार्यासाठी तयार करणेच आहे.

गृहस्थधर्माचे पालन करणे, सुसंतानोत्पत्ती करणे, कुटुंब पोषणाकरिता धनोपार्जन करणे हे सर्व कर्मकांडाचे मुख्य भाग आहेत. विवाह करणे हे व्यक्तिगत स्वार्थाची मर्यादा कमी करणे व शमदमादींचा (बाह्येन्द्रिय संयम व अंतःकरण संयम) अभ्यास करणेच आहे. गृहस्थधर्माची पूर्ती नाही केली तर मनुष्य त्याच्या उन्नतीसाठी आवश्यक असलेल्या अनुभवाची प्राप्ती करू शकत नाही. धर्मशास्त्रात वर्णाश्रमव्यवस्था व त्याच्या कर्तव्याचा उल्लेख याच्यासाठी करण्यात आला आहे. ती कर्तव्ये केवळ अभ्युदयाचीच (भौतिक उन्नती) प्राप्ती करवून देत नाहीत तर निःश्रेयसाची सुद्धा (मोक्षाची- ईश्वरानुभवाची) प्राप्ती करवून देतात. गृहस्थाश्रमातच औदार्य , प्रेम यांचा विकास होतो. हा आश्रम प्रेमाची आणि परोपकाराची पहिली पायरी आहे. दुसऱ्याकरिता स्वतःस विसरण्याची व दुसऱ्याच्या सुखासाठी स्वतःच्या सुखास तिलांजली देण्याची शिकवण देणारे व्रत हे एक पत्नीव्रत व एक पतीव्रतच आहे. याहीपेक्षा दुसऱ्यासाठी स्वतःस का विसरावे व दुसऱ्याच्या सुखासाठी स्वतःच्या सुखास का तिलांजली द्यावी हे शिकविणारे पत्नीव्रत व पतीव्रतच आहे. विवाहासारखी सर्वांगीण विकास साधणारी समाजव्यवस्था नसेल तर मनुष्य संयमी जीवन जगूच शकत नाही. व्यभिचार व उच्छृंखलतेस आळा घालण्याचे, मर्यादित करण्याचे एकमेव साधन म्हणजे विवाह व गृहस्थाश्रमच आहे. बाळास जन्म देताच स्त्रीच्या हृदयात मातृप्रेमाचा अपूर्व आणि निःस्वार्थ स्रोत वाहू लागतो. या शुद्ध प्रेमास इतर कशाचीही उपमा देता येत नाही. पतीसाठी केल्या जाणाऱ्या प्रेमात स्वार्थाचा व विलासाचा गंध येत असला तरी तो संतानोत्पत्तीबरोबर नष्ट होतो. याच प्रकारे गृहस्थी व्यक्ती स्वतःच्या संबंधास आपल्यापुरतेच मर्यादित न ठेवता इतर प्राण्यांपर्यंत घेऊन जाते. ती एक वर्तुळ तयार करते. त्या वर्तुळाचा ती केंद्र असते व तीची बायका-मुले व इतर नातलग परिघासारखे असतात.

गृहस्थाश्रम शास्त्रोक्त पद्धतीने चालविले तर या परिघाचा हळू हळू विकास होतो. दान देणे हा गृहस्थाचा धर्म आहे. स्वतःच्या सुखाचा त्याग करून दुसऱ्यांच्या दुःख निवारणाकरिता काही सहयोग देणे हे दान आहे. दानाचा विचार करताच आम्ही त्यागाची जी लक्ष्मणरेषा स्वतःच्या मुलाबाळांपर्यंतच आखलेली होती ती क्षुद्र आहे, असा अनुभव येऊ लागतो. ती विशाल नाही, तिची वाढ करणे आवश्यक आहे असे वाटू लागते. पत्नी, मुले यांच्याशिवाय आपल्या संबंधासाठी योग्य असणारी कितीतरी माणसे समाजात असतात. त्यांची उन्नती हीच आपली उन्नती आहे असे समजले पाहिजे. ती दुःखी असतील तोवर आम्हास सुख ते कसे मिळणार? ते दूषित आणि अधार्मिक असतील तर आम्ही यज्ञ केले तरी, देवळात जाऊन देवाचे ध्यान केले तरी शुद्ध होऊ शकणार नाही. सारांश, गृहस्थधर्माच्या इतर कार्यांबरोबर दान किंवा परोपकारसुद्धा एक कर्तव्य ठरते.

आम्हास दुसऱ्याशी काय घेणे-देणे? आम्ही स्वतः शुद्ध व धर्मात्मा झालो म्हणजे झाले, असा विचार करणारे सृष्टीच्या सुव्यवस्थेस समजत नाहीत. समुद्राच्या एका थेंबाने "मी स्वतः इतर

थेंबांच्या शुद्ध- अशुद्धतेस ग्रहण करणार नाही असे म्हटले तर चालेल का? मुळीच नाही. प्रलयावस्थेत अनंत जीव एकमेकापासून वेगळे होते. एकमेकाविषयी त्यांना ज्ञान नव्हते. त्यांचा एकमेकाशी संबंधही नव्हता. जीवांनी असंबद्ध अवस्थेत राहू नये म्हणून तर ईश्वराने सृष्टी रचली आहे. सृष्टि-रचना, शरीरांची निर्मिती ही दोन्ही जीवांना परस्परांशी जोडण्याची, संबंधित करण्याची साधने आहेत. प्रत्येक चेतनाचा इतर चेतनांशी प्रत्यक्ष संबंध होऊ शकत नाही. त्यासाठी त्यांना उन्नतीच्या शिखराकडे वाटचाल करावी लागते. आतापावेतो ज्यांनी कधीच उन्नती केली नाही पण करू इच्छितात त्यांना मानव शरीराद्वारे संबंध जोडावा लागेल. मानव उत्पत्तीच्या विशिष्ट पद्धतीचे हेच तर कारण आहे. इतर प्राण्यांशी सुद्धा आम्ही आमच्या शरीराद्वारेच संबंध जोडतो. शरीरास धष्ट-पुष्ट ठेवण्यासाठी अन्नाची आवश्यकता आहे. अन्नसंपादनासाठी शेती आवश्यक आहे.. शेतीसाठी लोहाराची, लोहारास लोखंड खोदून काढणाऱ्याची व त्यांना भूगर्भवेत्त्यांची आवश्यकता आहे. अशा प्रकारे या शृंखलेचा विकास एवढा होतो की, आमचा संबंध सृष्टीच्या प्रत्येक प्राण्याशी जुळतो. हीच सभ्यता किंवा परस्पर तंत्रता आहेः गृहस्थाश्रमात या संबंधामध्ये स्वार्थाचा लवलेश असतो. पण हाच संबंध पुढे पराकाष्ठेस पोहचतो व

'अयं निजः परोवेति गणना लघुचेतसाम् ।
उदारचरितानां तु वसुधैव कुटुम्बकम् ।।

असा व्यापक आणि उदात्त उद्घोष मनुष्याच्या हृदयातून बाहेर पडतो.

जेव्हा मनुष्याचे हृदय एवढे उदार होते तेव्हा तो कर्मकांडा (कर्तव्यपूर्ती)च्या शेवटच्या स्थितीत जाऊन पोहचतो. तो आपले संबंध जीवन परोपकारातच खर्ची घालतो. त्या वेळी तो ईश्वराचा अनुभव केवळ आपल्या आत्म्यामध्येच नव्हे तर प्रत्येकात होऊ लागतो. गीतेतील विवेचन पाहण्याजोगे आहे :

शुनि चैव श्वपाके च पण्डिताः समदर्शिनः ।

सांसारिक व्यवहार ईश्वरसाक्षात्काराची दूरस्थ साधने आहेत, असे आम्ही वर सांगितले आहे, पण हा व्यवहार सोडून आम्ही एखाद्या निकटस्थ मार्गाचा आश्रय घेऊ शकतो असा याचा अर्थ होत नाही. एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी जाण्यासाठी १०० व ५० मैलांचे असे दोन मार्ग असतील तर १०० मैलांचा मार्ग सोडला पाहिजे. पण, वस्तुतः ईश्वर साक्षात्कारासाठी एखादा सरळ असा मार्ग नाही. जो मनुष्य शिडीच्या ज्या पायरीवर आहे तिथूनच त्यास शिखराकडे वाटचाल करावी लागेल. गृहस्थी न होतासुद्धा सबंध सृष्टी हे माझे कुटुंबच आहे असा अनुभव करणारी व्यक्ती गृहस्थी लोकांच्या पुढे आहे. अशा मनुष्याने गृहस्थ होऊन मागे फिरण्याची मुळीच गरज नाही. नसता तो साध्यापासून दूर जातो. पण, जर मनुष्याचे हृदय एवढे विकसित नसेल तर 'केवळ लोकलज्जा किंवा इतर प्रलोभनामध्ये फसून गृहस्थजीवनाचा त्याग करू नये. आजकालचे हिंदू संन्यासी, बैरागी खरे पाहता ईश्वर साक्षात्काराबाबतीत सद्‌गृहस्थापेक्षा कितीतरी दूर आहेत. गृहस्थी पुरुष कमीत कमी स्वतःच्या कुटुंबासाठी तरी नक्कीच स्वार्थत्याग करतो. पण या साधूंच्या

वृत्ताचा परिघ स्वतःच्या स्वार्थाच्या एक इंचदेखील पलीकडे जात नाही. हे भोग-विलासाचे जीवन जगतात, इंद्रियांच्या सुखाच्या पूर्ततेत आकंठ बुडालेले असतात. स्वतःच्या श्रमाद्वारे धनोपार्जन किंवा इतर प्राण्यांविषयी चिंता मुळीच बाळगत नाहीत. आजच्या साधू स्त्रीपुरुषांचे चरित्र चोरांच्या, गुंडांच्या चरित्रासारखेच आहे. यांचे जीवन सांसारिक व्यक्तीपेक्षाही अत्यंत निकृष्ट अवस्थेत जाऊन पोहचले आहे. हे सर्व सुखांचा अनुभव करू इच्छितात पण सांसारिक कर्तव्यपूर्तीचे ओझे मात्र आपल्या डोक्यावर लादून घेऊ इच्छीत नाहीत. हे केवळ कर्मकांडाचे महत्त्व न समजल्यामुळे होत आहे.

भारतातील साधु-संन्यासी 'गीतेस' उत्कृष्ट धार्मिक ग्रंथ समजतात. तरी पण ते कर्माची अवहेलना करतात हे आश्चर्य आहे. गीतेचे पारायण न करणारा एखादाच साधू सापडू शकेल आणि कर्मपरायणतेस कर्तव्य समजणारासुद्धा क्वचितच एखादा साधू आढळेल. हे साधू गीतेचे केवळ पाठ मात्र करतात पण त्याच्यावर विचार करीत नाहीत. गीतेत :

कर्म ब्रह्मोद्भवं विद्धि, ब्रह्माक्षरसमुद्भवम् ।
तस्मात्सर्वगतं ब्रह्म, नित्यं यज्ञे प्रतिष्ठितम् ।। गीता : ३.१५
नियतं कुरु कर्म त्वं कर्म ज्यायो ह्यकर्मणः ।
शरीरयात्रापि च ते न प्रसिद्ध्येदकर्मणः ।। गीता : २.८

'कर्म करीतच राहावे, कर्मापासून कधीही विमुख होऊ नये अशी वेदांची आज्ञा आहे. वेद ईश्वराची वाणी आहे. म्हणून कर्म श्रेष्ठ आहे. हे अर्जुना, कर्म अवश्य केले पाहिजे. कर्म न करण्यापेक्षा कर्म करणे श्रेष्ठ आहे. कर्म न केल्याशिवाय शरीराचे सुद्धा पोषण होऊ शकत नाही' असे म्हटले आहे.

कर्मकांडा (कर्तव्य-भागा) विषयी दोन भ्रम आहेत. काही जण केवळ काही आडंबर हेच कर्मकांड आहे असे समजतात तर दुसरे काही जण ईश्वरानुभवासाठी कर्मकांडास (कर्तव्यपूर्तीस) पूर्णपणे अनावश्यक समजतात. पहिल्या विचाराने हिंदू समाजामध्ये स्वतःपुरतेच कर्तव्य सीमित करणाऱ्या अहंमन्य, मत्सरी पंडितांची संख्या वाढविली आहे. दुसऱ्या विचाराने लाखोंच्या संख्येत मूर्ख, पाखंडी व आचरणभ्रष्ट संन्यासी वाढले आहेत. अशा प्रकारे दोन मोठे गट स्वतःच्या व स्वतःच्या समाजाच्या उन्नतीसाठी सहाय्यक ठरू शकले असते ते विनाशासाठी कारणीभूत ठरत आहेत.

पंडितांनी स्वतःपेक्षा निम्न स्तरावर जीवन जगणाऱ्यांना वेद शिकविले, मूर्तिपूजा करण्यापूर्वी त्यांना जर एखाद्या अस्पृश्याने स्पर्श केला, त्यांच्या पूजास्थळी इतर जमातीची माणसे गेली तर त्यांना पाप लागते असा पंडितांचा समज आहे. यांच्याशिवाय सबंध जग असत्य, अनाचार, अज्ञानाने बरबटलेले असले तरी, यज्ञादी शुभकर्मापासून वंचित राहिल्यामुळे घोर अंधकारात वावरत असले तरी ईश्वर त्यांना स्वतःचे दर्शन देण्यासाठी आतुर झालेला असेल असे त्यांना वाटते. पण किती भयंकर मूर्खता आहे! अरे, मूर्ख मनुष्या! जगामध्ये अंधकाराचे साम्राज्य पसरलेले

असताना तुझ्यापर्यंत प्रकाश येईल असे तुला वाटते? जगामध्ये अधर्माचे कीटाणू सर्वत्र पसरलेले असताना तू स्वस्थ कसा राहशील? सबंध जग दुराचाराने भरलेले असताना त्याचा तुझ्यावर काहीच प्रभाव पडणार नाही काय? जग अवनतीच्या घोर रसातळाकडे वाटचाल करीत असताना तू उन्नतीच्या शिखरावरच बसून राहशील काय? मुळीच नाही. जो जगास अज्ञानरूपी डोहात बुडत असलेले तटस्थपणे पाहतो तो कधीच ज्ञानी होऊ शकणार नाही. अज्ञानाच्या तावडीत तोही आज ना उद्या सापडेलच. इतरांना नीच, आणि अस्पृश्य समजणारे केव्हा ना केव्हा त्याचे कटुफल अनुभवतीलच. दुसऱ्यांना जो धार्मिक बनवू इच्छीत नाही तो कधीच धार्मिक होऊ शकत नाही. इतरांना भ्रष्ट करणारा तो स्वतःच भ्रष्ट होईल. ईश्वराने, सबंध सृष्टी एका घनिष्ठ संबंधरूप दोऱ्यात ओवलेली आहे. दोरा तुटताच मणी ओघळतात. म्हणून कर्माचे मर्म प्रत्येकाने जाणावे आणि सदैव सेवा, परोपकारासारख्या कर्माचे आचरण करून मानवजातीच्या सुखात वाढ करण्याचा प्रयत्न करावा.

कर्मकांडाची अवहेलना करू नका व पाखंडास कर्मकांड समजू नका. हां, केले जाणारे प्रत्येक शुभकार्य हे ईश्वरानुभवाचे साधन आहे ही जाणीव मात्र सतत बाळगा. साधनास साध्य (उद्दिष्ट) समजल्यामुळे विकास खुंटतो व अभीष्ट फळाची प्राप्ती होत नाही. म्हणून गीतेत म्हटले आहे :

ब्रह्मण्याधाय कर्माणि सङ्गं त्यक्त्वा करोति यः ।
लिप्यते न स पापेन पद्मपत्रमिवाम्भसा ॥
कायेन मनसा बुद्ध्या केवलैरिन्द्रियैरपि ।
योगिनः कर्म कुर्वन्ति सङ्गं त्यक्त्वाऽत्मशुद्धये ॥

गीता. अ. ५-१०, ११

ईश्वर- साक्षात्काराचा उद्देश बाळगून कर्म करणारा पाण्यातील कमळाप्रमाणे कर्मामध्ये फसत नाही. योगी शरीर, मन, बुद्धी व इंद्रियांद्वारे फळाची अपेक्षा न बाळगता कर्म करीत असतात. त्यांचे लक्ष्य केवळ अंतःकरणाची शुद्धी हेच असते. अनुषंगाने लहान-सहान जी फळे (लाभ) मिळतात त्यांची ते काळजी (पर्वा) करीत नाहीत. गव्हासाठी शेती करणाऱ्यांना इतर अनेक बाबी मिळाल्याशिवाय राहत नाही. अशाच प्रकारे अंतःकरणशुद्धीसाठी कर्म करणाऱ्यांना अंतःकरणशुद्धीबरोबर सांसारिक सुखांची सुद्धा प्राप्ती होते. कर्मकांडाचे पालन करीत आम्हास आमच्या ईश्वर प्राप्तिरूप ध्येयावर दृष्टी ठेवणे आवश्यक आहे. यासाठी कर्मकांडा (कर्तव्यशास्त्रा) सोबत ज्ञानकांड व उपासनाकांड यांचीही आवश्यकता आहे.

## ज्ञानकांड

ज्ञानकांड मनुष्यास ध्येयाची आठवण करून देत असते. त्यास कर्मकांडात लिप्त होऊ देत नाही. "मी जे काही करीत आहे ते शुभ आहे, श्रेयस्कर आहे, आवश्यक आहे, पण ते साधनच आहे, साध्य नाही. शिडी आहे, शिखर नव्हे," असा निश्चय ज्ञानामुळे होतो. ज्ञान नसेल तर लोक साधनासच साध्य समजतात. रेल्वेत बसणे हेच उद्दिष्ट समजून त्यात बसून राहणारा, कुठेच

न उतरू इच्छिणारा महामूर्ख आहे. शिडीच्या पायरीस धरून बसणाऱ्याच्या बुद्धीची प्रशंसा करावी तेवढी थोडीच आहे. म्हणून ज्ञानाची वाढ सातत्याने करणे आवश्यक आहे.

**ईश्वराच्या ज्ञानप्राप्तीची साधने :**

१. सृष्टिरचनेचे ज्ञान : आम्ही मागच्या अनेक अध्यायांत अनेक ठिकाणी सृष्टीच्या रचनेद्वारे व शरीर-रचनेद्वारे ईश्वराच्या अनेक गुणांवर प्रकाश टाकला आहे. आम्ही आमच्या केवळ एका बोटाकडेसुद्धा पाहिले आणि त्यावर विचार केला तरी ईश्वराच्या अपार महिमेचे ज्ञान होते.

२. वेदादी सत् शास्त्रांचे अध्ययन : ज्या शास्त्रात ईश्वराच्या अनेक गुणांचे विस्तृत विवेचन केले आहे त्यांचे वाचन आवश्यक आहे.

३. सद्गुरूंचा उपदेश व सत्पुरुषांचा सहवास. ईश्वराचा साक्षात्कार करू इच्छिणाऱ्यांना : प्रत्येक दिवसाचा थोडा तरी वेळ या तीन साधनांच्या संपादनासाठी खर्च केला पाहिजे. आम्ही सृष्टिरचनेस दररोज पाहतो, पण ईश्वरप्रेमी ज्या दृष्टिकोनातून पाहतो त्या दृष्टीने पाहत नाही. विज्ञान सर्वजण शिकतात. पण त्यांची दृष्टी सृष्टीच्या नियमापर्यंतच वाटचाल करते. सृष्टिनियमांच्या माध्यमातून नियन्त्यापर्यंत पोहचत नाही. परदेशात जाऊन बराच काळ उलटल्यानंतर विमानाने परत येणाऱ्या मुलाच्या आईची विमानाकडे बघण्याची जी दृष्टी असेल ती दुसऱ्याची निश्चितच असणार नाही. ते विमान तिच्यासाठी अतिशय प्रिय आहे. तिचा मुलगा आला नसेल तर तिची दृष्टी तात्काळ बदलेल. ते विमान कितीही सुशोभित असले तरी त्याचे सौंदर्य व्यर्थ वाटेल. याच प्रकारे सृष्टीकडे पाहताना आपल्या प्रियकरास, परमेश्वरास दृष्टीमध्ये ठेवून पहा. पर्वतांची उत्तुंग शिखरे, समुद्रावरील तरंग, नदीचा मंजुळ प्रवाह, चंद्राचा शीतल प्रकाश या सर्वांमध्ये ईश्वरास पाहू शकतो. एक कवि म्हणतो :

> कि वचश्मानि दिल मुबीं जुज दोस्त ।
> हर्चि बीनी बिदाँ कि मजहरे ओस्त ।।

हृदय - नेत्राद्वारे तू आपल्या प्रियकराशिवाय इतरास कोणासही पाहू नकोस. तू पाहत असलेले सर्व काही त्याचीच कृती आहे. त्याचाच प्रकाश आहे' असे समज. याच विषयास माण्डूक्योषनिषदात

> "ओमित्येदक्षरमिदं् सर्वं तस्योपव्याख्यानम्" । (माण्डूक्योपनिषद)

"ही सबंध सृष्टी त्या परमेश्वराचे विविध प्रकारे गुणवर्णन करीत आहे," असे म्हटले आहे. पण प्रत्येकास हे उपव्याख्यान समजत नाही. त्यासाठी अभ्यास करावा लागतो. मुलांना लहानपणापासूनच प्रत्येक वस्तू ईश्वराशी संबंधित आहे, हे सांगत राहिले पाहिजे. ईश्वर सर्वव्यापक आहे, तो आम्हास प्रत्येक वस्तू देतो, अशा प्रकारचे संस्कार प्रारंभापासूनच त्याच्या मनावर अंकित केले पाहिजेत. वस्तुतः नित्य-अनित्य-विवेक म्हणजे तरी काय? आम्हास नित्य वस्तू कोणती, अनित्य वस्तू कोणती हे समजणेच ना! अनित्य वस्तूंच्या समूहात नित्य वस्तूचा चमत्कार जोपर्यंत पाहणार नाही तोपर्यंत आम्ही ज्ञानी बनू शकणार नाही. नामरूपाद्वारे - शब्दाभिधान आणि

आकृतीद्वारे ओळखले जाणारे जे काही आहे ते सर्व अनित्य आहे, पण मिथ्या नाही. तीसुद्धा नित्याची उत्तम अशी अभिव्यक्ती आहे. नित्यतत्त्वाचे ज्ञान आणि कर्तृत्व अनित्याच्या माध्यमातून आम्हास जाणवते. मिथ्या वस्तू सत्यवस्तूचे उपाख्यान (Definition) होऊ शकत नाही. म्हणून जगामध्ये दिसणारे सर्व काही सत्य आहे, मिथ्या (असत्य) नव्हे.

वेदादी शास्त्रांचे अध्ययन ईश्वरसाक्षात्कारासाठी सहायक ठरत नसून बाधक ठरते असे अनेकांचे मत आहे. शास्त्र- पठनाचा निषेध किंवा अवहेलना केलेल्या अनेक संतांच्या वचनांना ते उदाहरणादाखल देत असतात. शास्त्र-पठन, ईश्वरानुभवासाठी अनावश्यक आहे हे बरेच जण उपनिषदांच्या वाक्याद्वारे सिद्ध करीत असतात :

'नायमात्मा प्रवचनेन लभ्यते, न मेधया बहुना श्रुतेन ।
यमेवैष वृणुते तेन लभ्यस्तस्यैष आत्मा विवृणूते तनूं स्वाम् ॥
मुण्डक : ३.२.३.

परमेश्वराचा अनुभव व्याख्यानाद्वारे, बुद्धीद्वारे, वेदश्रवणाद्वारे होऊ शकत नाही. ईश्वर ज्या मुमुक्षूस सुपात्र समजून स्वीकार करतो तोच त्याचा अनुभव घेऊ शकतो. याच उपनिषदात दुसऱ्या एका ठिकाणी :

द्वे विद्ये वेदितव्ये इति ह स्म ब्रह्मविदो वदन्ति पराचैवापरा च। तत्रापरा ऋग्वेदो यजुर्वेदः सामवेदोऽ थर्ववेदः शिक्षा कल्पो व्याकरणं निरुक्तं छन्दो ज्यौतिषमिति । अथ परा यया तदक्षरमधिगम्यते ॥ १.१.४,५॥

विद्या दोन प्रकारच्या आहेत. वेदादींना अपरा विद्या आणि ईश्वरानुभवासाठी प्रत्यक्ष साधन असणारी जी विद्या ती 'परा' असे वर्गीकरण करण्यात आले. येथे वेदांची पराविद्येत गणना करण्यात आलेली नाही म्हणून ईश्वरानुभवाची इच्छा बाळगणाऱ्यांना वेदांचे अध्ययन करण्याची गरज तरी कोणती?

वेदामध्येसुद्धा 'यस्तन्नवेद किमृचा करिष्यति' जो ईश्वरास जाणत नाही त्याचे वेदाध्ययन निरर्थकच नव्हे काय? असे म्हटले आहे.

एक उर्दू कवी म्हणतो :

'किताबों में धरा क्या है बहूत लिख-लिख के धो डाले ।
हमारे दिल पे नक्शे कलहजा है तेरा फरमाना ॥

अशा विचारांचा अवलंब करणारे अनेक भामटे साधूचा वेष धारण करून, केस वाढवून चिमटा हलवीत इकडे-तिकडे फिरत असतात. काही शिकलात का? असे त्यांना विचारले तर 'आम्हास शिकून काय करावयाचे?' 'आम्ही तर केवळ रामनामाचा जप करतो,' असे उत्तर देतात.

पण, हा एक फार मोठा दोष आहे. वस्तुतः वेदादी सत्यशास्त्रांचे अध्ययन केल्याशिवाय यथार्थ ज्ञान होत नाही. ज्ञानाशिवाय ईश्वराचा अनुभव कसा होणार? असत्य ज्ञानाच्या आधारे केवळ 'ईश्वर ईश्वर' म्हटल्यामुळे काहीही लाभ होत नाही, हे आम्ही पूर्वीच लिहिले आहे. संतांनी अनेक

ठिकाणी जी वेदांची अवहेलना केली आहे ती त्यांची चूक तरी असेल किंवा त्याचा तात्पर्य दुसराच काहीतरी असला पाहिजे. अनेक संत असेही होऊन गेलेले आहेत, की जे स्वतः विद्वान् नव्हते. पण त्यांचे अनुयायी मात्र पुष्कळ झाले. म्हणून त्यांनी आपली योग्यता व बुद्धीनुसार वाट्टेल तसा उपदेश केला. त्यांच्या ग्रंथात किंवा त्यांच्या उपदेशात अनेक ठिकाणी परस्पर विरोध दिसून येतो. त्यांचा उद्देश चांगला असला तरी काही ठिकाणी तरी त्यांना आम्ही प्रमाण मानू शकत नाही. त्याच संतांनी वेदादी ग्रंथाचे अध्ययन केले असते तर त्यांच्या कार्यात ज्ञानदृष्टीची भर पडली असती व त्यांनाही अधिक ज्ञानाधिष्ठित आनंदाचा अनुभव झाला असता. अंध-विश्वासू अनुयायांमध्ये एक दोष आहे. ते एखाद्या मनुष्याच्या चांगल्या बाबींच्या अनुकरणाबरोबर वाइटाचेही अनुकरण करू लागतात. एखाद्या साधूस केवळ भोगविलासापासून विरक्त पाहताच त्याच्या वचनावर विश्वास ठेवू लागतात. हीसुद्धा एक चूक आहे. त्यास वैराग्य झाले असेल, ज्ञान झाले नसेल. ज्ञान असेल पण वैराग्य नसेल. वैराग्य असून ज्ञान नसेल तर जगापासून विरक्ती होईल. पण ईश्वरानुभव होणार नाही. वेदादीशास्त्रांच्या अध्ययनाद्वारे ज्ञानार्जन करून वैराग्य नसेल तरी ईश्वरानुभव होणार नाही. भोगविलासामध्ये फसलेल्या आत्म्यास वेद वाचूनही ईश्वर-साक्षात्कार होऊ शकत नाही. वेद व मुंडकोपनिषदांचे जे पुरावे आम्ही दिले आहेत त्याचे हेच तात्पर्य आहे. त्या वाक्याद्वारे वेदादिशास्त्रांचा अनादर केला गेला आहे असे समजू नये. 'जो ईश्वरानुभवासाठी प्रयत्न करीत नाही त्याची साधनांची जुळवाजुळवसुद्धा व्यर्थच आहे एखादी व्यक्ती रेल्वेमध्ये बसून उतरावयाच्या ठिकाणी उतरणार नाही तर ती मूर्खताच ठरेल. याचा अर्थ हा नव्हे की, रेल्वेमध्ये बसूच नये. वेदांच्या अध्ययनाने काय होणार? या म्हणण्याचा हाच अर्थ आहे की, वेद वाचून तसे आचरण करावे, तरच लाभ होईल. वेद दोन प्रकारे वाचले जाऊ शकतात. एक तर केवळ मंत्रपठण करणे व ईश्वरानुभवासाठी प्रयत्न न करणे असे वाचन अपरा विद्येत सामविष्ट होते. पण मंत्रपठणासोबत ईश्वराचा विचार आणि साक्षात्काराचे ध्येय बाळगून आचरण केले तर पराविद्येचा आरंभ होतो. ही स्थिती वेदाध्ययन व ईश्वर-साक्षात्कारासाठीच नसून इतर बाबतीतही अशीच आहे. एका शाळेत व्यापारासंबंधीच्या विषयाचे वाचन करणारा वाचनापुरताच मर्यादित राहिला तर ते वाचन निरर्थकच ठरते. कारण धनार्जन हे केवळ वाचनाने साधले जात नाही. तसेच वेदादी शास्त्रासंबंधीच्या वरील वाक्यात अध्ययनापुरतेच मर्यादित न राहता साक्षात्काराकडेही वाटचाल होणे आवश्यक आहे यावर भर दिला आहे.

खरे पाहता, अशा प्रकारच्या भ्रमाच्या निराकरणासाठीच तर गुरूची आवश्यकता आहे. गुरु अनुभवी असला पाहिजे, तरच तो शिष्याच्या अडचणी सोडवू शकतो. हिंदू समाजात एक प्रथा आहे. गुरू केल्याशिवाय स्वर्ग मिळत नाही, असे ते म्हणतात. म्हणून ते गुरूकडून मंत्र घेतात. एखादा संन्यासी, त्यांच्या कानात मंत्र फुंकतो. हीच 'गुरुदीक्षा' आहे असे म्हणतात. पण ही गुरुदीक्षा नसून ढोंग आहे. छळ- कपटाचा व्यवहार आहे. ज्या पाखंडी, ढोंगी माणसाने ईश्वर-साक्षात्कारासाठी स्वतः काहीच साधना केली नाही तो दुसऱ्यांना मार्ग तरी कसा दाखवू शकतो?

अशा गुरुविषयी मुंडकोपनिषदात म्हटले आहे :

अविद्यायामन्तरे वर्तमानाः, स्वयं धीरा पण्डितम्मन्यमानाः।

जङ्घन्यमानाः परियन्ति मूढा अन्धेनैव नीयमाना यथान्धाः ।। मुंडक : १.२.८.

अविद्येच्या अंधकारात वावरणारे, स्वतःस पंडित समजणारे, दुसऱ्यांना फसविणारे कधीच मुक्त होऊ शकत नाहीत. त्यांच्यामागे जाणाऱ्यांची स्थिती आंधळयाने आंधळयाचे अनुसरण करण्यासारखीच आहे.

हिंदू समाजात ढोंगी साधु-संन्याशांचा ज्याप्रमाणे आदर होतो त्याचप्रमाणे या छळी-कपटी गुरूंचाही होत आहे. ज्यांच्याकडे पैसा भरपूर आहे पण ज्ञान नाही अशी माणसे या गुरूंच्या तावडीत सापडून आपली संपत्ती, श्रम व वेळ वाया घालवतात. त्यामुळे त्यांना काही तरी लाभ होतो का? मुळीच नाही. हे गुरू नव्हेत. हे धोकेवाज, ठग आहेत. यांच्या आदरसत्कारामुळे समाजाचे अहित होते. शिष्यांचे अज्ञान दूर होत नाही. उन्नतीचा तर प्रश्नच नाही.

वास्तविक ज्ञान देणाराच गुरू होऊ शकतो. हे ज्ञान एका क्षणात किंवा एका दिवसात देण्याजोगे नाही. यासाठी शिष्यांनी गुरूजवळ बराच काळ व्यतीत केला पाहिजे. अध्ययन ही काही गारुडी विद्या नाही. ती छू-मंतर करून येणारी नाही.

## उपासनाकांड

ईश्वरानुभवाचे तिसरे साधन 'उपासना' आहे. याचा ईश्वर- साक्षात्काराशी निकटचा संबंध आहे. उपासना साधन असली तरी अनेक अंशामध्ये ही साध्यसुद्धा आहे. कारण इतर साधनांच्या संपादनानंतरच खरी उपासना केली जाऊ शकते. उपासनेसच सर्वसाधारण व्यक्ती 'पूजा' असे म्हणतात. शुभकर्मांचे आचरण आणि ज्ञानप्राप्ती ही दोन्ही उपासनेची अंगे आहेत. यामुळे मनुष्याचे अंतःकरण शुद्ध होते. त्यामुळे ईश्वराशी प्रेम होते. प्रेमामुळे आनंदाची अनुभूती होते.

व्यावहारिक दृष्टीने पाहता उपासनेची दोन अंगे आहेत. एक प्रार्थना आणि दुसरे ध्यान. ध्यान हे योगाच्या आठ अंगांपैकी एक आहे.

प्रार्थनेत स्तुती व प्रार्थना या दोहोंचा समावेश आहे. ईश्वराच्या गुणवर्णनास स्तुती म्हणतात. ईश्वरास प्रत्यक्ष अनुभवत आहोत असे समजून त्याच्याकडून सहायाची अपेक्षा करणे, मदतीची याचना करणे ही प्रार्थना आहे. अशी प्रार्थना ध्यानापूर्वी लक्ष देऊन केली तर ध्यानासाठी फार मोठी मदत मिळते. यामुळे चित्त एकाग्र होते आणि शांतीचा अनुभव होतो. मी एका महान् शक्तीशी संबंधित आहे असा अनुभव येऊ लागतो.

ईश्वरास उच्च स्वराने का बोलवावे? अशी शंका अनेकजण करतात. ईश्वर बहिरा आहे काय? त्यास ऐकू येत नाही काय? एवढ्या मोठ्याने का हाक मारतो आहेस? त्याच्या गुणांचे वारंवार वर्णन का करीत आहेस? तो स्वतःची स्तुती इच्छितो काय? तो तुझ्या स्तुतीला बळी पडून केलेल्या कर्मांचे फळ अधिक (सुख) देईल काय? अशीः शंका करतात.

अशी शंका करणारे प्रार्थनेचे तात्पर्य समजत नाहीत. ते जगात खऱ्या-खोट्या स्तुती-प्रशंसेस

बळी पडणाऱ्या राजा, महाराजांप्रमाणेच ईश्वरास समजतात. पण, असे समजणे चूक आहे. आम्ही जे काही करतो ते ईश्वरासाठी नसून स्वतःसाठी आहे. कर्मफळाच्या प्राप्तीच्या उद्देशाने नसून स्वतःच्या आत्मिक उन्नतीच्या उद्देशाने करतो.

ईश्वराच्या प्रार्थनेचाही बराच दुरुपयोग होतो यात काहीच संदेह नाही. अज्ञानामुळे इतर विषयांचा दुरुपयोग केल्याप्रमाणे प्रार्थनेचा दुरुपयोग केला तर त्यात नवल ते कसले? पण, ईश्वर - प्रार्थनेचा मूळ उद्देश हा नाही. लाच दिल्यामुळे राजा किंवा राज-कर्मचारी ज्याप्रमाणे काम करतात तसे ईश्वर- प्रार्थनेमुळेही होते असे काहीजण समजतात. 'हे ईश्वरा, मला या व्यापारात लाभ झाला तर मी तुला अमुक भाग दान देतो. हे परमेश्वरा, माझा शत्रू मेला तर मी अमुक लक्ष गायत्री जप करीन', अशी विनवणी करणे प्रार्थना समजतात. पण, प्रार्थनेचा उपयोग न समजल्यामुळे अशा चुका होतात. ईश्वर आमच्या कोणत्याही पापाची क्षमा करीत नाही. कर्माचे कमी-अधिक फळही देत नाही. त्यास धनाचीही आवश्यकता नाही, प्रशंसेचीही आवश्यकता नाही.

खरे पाहता, जेव्हा आम्ही त्याचे गुणगान करतो तेव्हा त्याच्या गुणाविषयी आमच्या मनात श्रद्धा उत्पन्न होते. अंतःकरणाची मलिनता नष्ट होते.

स्तुतीमध्ये फार मोठी शक्ती आहे, याची जाणीव एका उदाहरणाने होईल. आमच्या शरीरावर मस्तिष्काचा फार मोठा प्रभाव पडतो. आमच्या सर्व कार्यांचे उद्‌गमस्थान मस्तिष्कच आहे. मस्तिष्कामध्ये उद्‌भवलेला विचार अनेक तंतूंद्वारे आमच्या अवयवांना कार्य करण्यासाठी प्रेरणा करतो. वेगवेगळे विचार मस्तिष्कांतर्गत कोशावर (Brain cells) वेगवेगळा प्रभाव टाकतात. एक कामोत्पादक कथा किंवा गीत ऐकले तर मस्तिष्कामध्ये कामवासनेसंबंधीचे विचार उत्पन्न झाल्यामुळे आम्ही अनेक कुचेष्टा करावयास प्रारंभ करतो. यात मानसिक कुचेष्टाही समाविष्ट आहेत. जर वीररसाचे गीत ऐकिले तर बाहू स्फुरण पावतात. याच प्रकारे जेव्हा आम्ही ईश्वर-स्तुती करतो तेव्हा त्या गुणांशी संबंधित भाव आमच्या मस्तिष्कात उद्भवतात. त्यामुळे मस्तिष्ककोशाच्या रचनेत सुद्धा परिवर्तन होते. खरी प्रार्थना मनःपूर्वक केली गेली तर आमच्या मानसिक परिस्थितीत सुधार होतो यात मुळीच शंका नाही.

पण एक गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे. प्रार्थना मस्तिष्क - परिवर्तनासाठी आहे. ती तमाशा नव्हे. म्हणून प्रार्थना ईश्वराच्या वास्तविक गुणांशी संबंधिकृत असावी आणि करणाऱ्याने समजून केलेली असावी. अनेकजण ईश्वरास मनुष्य समजून त्यावर मानवगुणांचे आरोपण करतात. यासच ते 'भक्ती' असे म्हणतात. कोणी भल्या पहाटे उठून देवास 'उत्तिष्ठ नरशार्दूल कर्तव्यं दैवमान्हिकम्' 'उठा! देवा! सकाळ झाली' असे म्हणतात, तर कोणी 'चोरजारशिखामणी' (चोरांचा, व्यभिचाऱ्यांचा मुकुटमणी) म्हणून श्रीकृष्णाची स्तुती करतात. कोणी 'दुकूलचोर' -वस्त्र चोरणारा, वृंदावनविहारी' इत्यादी नावाने त्याची स्तुती करतात. अशा प्रकारच्या गुणवर्णनामुळे बुद्धीवर कोणता प्रभाव पडतो? हे बुद्धिमानांना कळेलच. आम्ही जेव्हा आमच्या 'आराध्य' व्यक्तीस दुकूलचोर वगैरे शब्दाद्वारे बोलावतो तेव्हा त्या शब्दाचा अर्थ कळाल्यास त्याचा आपल्या बुद्धीवर

काय प्रभाव पडेल? अर्थ समजत नसेल तर प्रार्थना निरर्थकच ठरते. अशा प्रकारे समजून केली तर हानिकारक, न समजून केली तर निरर्थक क्रियाकलाप होतो.

असे केल्यामुळे भक्तीची अभिव्यक्ती होतो असे काहीजण समजतात. या विचाराने भक्तिमार्गाची निर्मिती केली आहे. पण हे भक्त भक्तीचा अर्थच समजत नाहीत. ग्रीकदेशाच्या इलियैटिक तत्त्वज्ञानाचा (Eleatic School) चा संस्थापक जेनोफेनीज (Xenophanes) म्हणतो की, ईश्वराने मनुष्यास निर्माण करण्याऐवजी मनुष्यच ईश्वरास निर्माण करीत आहे. बायबलमध्ये ''ईश्वराने मनुष्यास स्वतःसारखे बनवले' असे लिहिले आहे.

'हे ईश्वरा! मी तुला धनुर्धारी पाहू इच्छितो' असे म्हणून तुळशीदास अडून बसल्याचे आम्ही अनेक अंधविश्वासू लोकांकडून ऐकले आहे. संत तुकारामांनी 'मी तुझे निराकार स्वरूप जाणू शकत नाही म्हणून तू आम्हास चतुर्भुजरूप धारण करून दर्शन दे' असे म्हटल्याचे सांगतात.

खरोखरच, प्रार्थनेचा यापेक्षा अधिक दुरुपयोग होऊ शकत नाही. प्रार्थना आत्म्यास परमात्म्यापर्यंत वर नेण्याकरिता आहे. परमात्म्यास आत्म्यापर्यंत खाली आणण्यासाठी नव्हे. ईश्वराचा अवतार मानणारे ईश्वरास स्वतःच्या स्तरावर खाली आणू इच्छितात. पण स्वतः ईश्वराकडे जाऊ इच्छीत नाहीत. यामुळेच मनुष्य अशा कल्पना करीत हळू-हळू अवनतीकडे वाटचाल करतो.

आजकाल भक्ती शब्दाचा भयंकर दुरुपयोग होत आहे. यामुळे चांगल्या आस्तिकांना सुद्धा आस्तिक शब्दापासून घृणा होत आहे. काही दिवसांपूर्वी बिहारमध्ये 'राम सखी' नावाचे एक मत निघाले आहे. रामास सीता सर्वात अधिक प्रिय होती म्हणून रामाची भक्ती करू इच्छिणाऱ्यांनी सीता व्हावे असे त्यांचे म्हणणे आहे. सीता बनण्याचा विधी म्हणजे पुरुषांनी स्त्रीचा वेष धारण करावा व स्त्रिया आपल्या पतीसमोर ज्या प्रकारे हावभाव करतात त्याच प्रकारचे हावभाव रामाच्या मूर्तीसमोर करावेत. त्यांच्या मते ही ईश्वरभक्ती आहे. या प्रार्थनेचे फळ काय मिळेल? एकच! ते म्हणजे त्यांच्या आत्म्यावर स्त्रैण संस्कार घडतील आणि दुसऱ्या जन्मामध्ये स्त्रियांचा जन्म धारण करावा लागेल.

खरे पाहता, ही भक्ती नाही. आपल्या कल्पनांच्या मागे धावणे आहे, 'भक्त' शब्द संस्कृतच्या भज = सेवायाम् धातूपासून बनला आहे. आम्ही ईश्वराचे खरे भक्त असू तर त्याच्या आज्ञेचे पालन करू. आपल्या वाट्टेल त्या कल्पनेनुसार ईश्वरास चालवणार नाही. आपल्या मालकावरच शासन करणाऱ्या नोकराप्रमाणे शक्तीच्या माध्यमातून ईश्वराकडून वाटेल त्या इच्छा पूर्ण करून घेऊ इच्छिणारे ईश्वर-भक्त स्वतःची हानी करून घेत आहेत. ईश्वर मूर्खांच्या म्हणण्यानुसार धावपळ करणारी सत्ताच नव्हे. भक्तीच्या नावावर अनेक मूर्ख फसविले जातात. धूर्त स्वतःचे पोट भरून घेतात. म्हणून अशा प्रकारच्या धोक्यापासून वाचण्याचा सदैव प्रयत्न केला पाहिजे. आत्मोन्नतीसाठी साधन बनू शकणारीच प्रार्थना केली पाहिजे.

उच्चं स्वराने प्रार्थना केल्यामुळे मनाची मलिनता दूर होते व एक प्रकारची शांती प्राप्त होते.

उच्च स्वराच्या प्रार्थनेमुळे हा लाभ होतो.

उपासनेचे दुसरे अंग 'ध्यान' आहे. उत्तम गुरूचा सहवास लाभत असेल तर त्याच्याजवळ राहून प्राणायाम शिकावा. त्यामुळे मन एकाग्र होते. मनाच्या एकाग्रतेसाठी प्राणायामापेक्षा उत्कृष्ट अशी दुसरा कोणतीच विधी नाही. मनाचा व प्राणाचा स्वाभाविक संबंध आहे. प्राणाच्या गतीचा निरोध होताच मनाची गती ही अवरुद्ध होते. ही सर्वांच्या अनुभवाची बाब आहे. एखादी आकस्मिक घटना घडताच मन थांबते आणि प्राणही थांबतो. ही स्थिती क्षणमात्र असली तरी प्राणाच्या निरोधामुळे मनाचा निरोध होतो हे स्पष्ट करण्यास पुरेशी आहे.

ध्यानावस्थेत मनाचा निग्रह का करावा? या प्रश्नाचा विचार करणे आवश्यक आहे. वस्तुतः आमचे मन अतिशय चंचल आहे. हे गतिशील असेपर्यंत आम्ही काहीच काम करू शकत नाही. अर्जुन म्हणतो :

चंचलं हि मनः कृष्ण! प्रमाथि बलवद् दृढम् ।
तस्याहं निग्रहं मन्ये वायोरिव सुदूष्करम् ।।

कृष्णा! मन हे अतिशय चंचल आहे. प्रयत्नाद्वारे सुद्धा त्यास स्थिर करणे सोपे नाही. हवा जशी सहजपणे नियंत्रित केली जाऊ शकत नाही, तसेच मनाचे आहे.

या प्रश्नाचे उत्तर देताना श्रीकृष्ण म्हणतात :

असंशयं महाबाहो मनो दुर्निग्रहं चलम् ।
अभ्यासेन तु कौन्तेय वैराग्येण च गृह्यते।

अर्जुना! मनाचा निरोध करणे अत्यंत कठीण आहे, हे तुझे म्हणणे अगदी बरोबर आहे. तरी पण अभ्यास आणि वैराग्य या दोन उपायांद्वारे मनाची गती अवरुद्ध करता येते, मनावर ताबा मिळवता येतो.

पतंजली मुनी 'योगशास्त्रात' म्हणतात.

'अभ्यासवैराग्याभ्यां तन्निरोधः'

मनाच्या स्थिरतेशिवाय कोणतेच कार्य होऊ शकत नाही. अस्थिर व मलीन आरशात आपले प्रतिबिंब दिसू शकत नाही, त्याप्रमाणेच कुप्रवृत्तींनी मलीन झालेल्या व अमर्यादित इच्छेमुळे चंचल झालेल्या मनाद्वारे ईश्वराचे चिंतन होऊ शकत नाही. ईश्वर- प्रार्थना व शुभकर्म या दोन उपायांद्वारे मनाची मलीनता व ध्यानाद्वारे चंचलता दूर होते.

प्राणायाम करताना एक बाब विसरू नये. केवळ पुस्तक वाचून वाट्टेल तसे काहीही करू नये. ढोंगी गुरूंच्या म्हणण्यानुसार प्राणायाम करणे हितकारक ठरणार नाही. आजकालच्या धूर्त, ढोंगी साधूंनी योगाच्या अनेक प्रकारच्या उलट सुलट पद्धती प्रचलित केल्या आहेत. अनेक उत्साही जिज्ञासू त्यांच्या तावडीत सापडून दुर्धर रोगामुळे अनेक प्रकारच्या दुःखांचा अनुभव करीत आहेत. उलट-सुलट प्राणायामामुळे फुफ्फुसांच्या रोगाची तरी भयंकर भीती असते. म्हणून उत्तम गुरु-मार्गदर्शक मिळेपर्यंत, सर्व शंकांचे निरसन होईपर्यंत प्राणायाम करू नये. प्राणायाम न करता ध्यान

करण्यास प्रारंभ करा. प्राणायामामुळे होणारा लाभ होत नसला तरी थोडा-फार लाभ तरी ध्यानामुळे झाल्याशिवाय राहणार नाही. यासाठी संध्या किंवा प्रार्थना-मंत्राच्या अर्थावर विचार करणे किंवा 'ओ३म्'चा जप करणे श्रेष्ठ आहे.

योगशास्त्रात :

'तज्जपस्तदर्थभावनम्' ।

'ओ३म्' चा जप करावा. त्याच्या अर्थावर विचार करावा. यामुळेसुद्धा मनास एकाग्र करण्यासाठी थोडी फार सहायता अवश्य मिळू शकते.

□□□

# परिशिष्ट

ईश्वर, जीव व परमाणू या तीन्हींचे स्वतंत्र अस्तित्व आहे. हे पदार्थ सृष्टीच्या व्यवहारासाठी परिपूरक आहेत. केवळ परमाणूद्वारे किंवा केवळ ईश्वर तत्त्वाद्वारे सृष्टी- व्यवहाराची पूर्णता साधली जाऊ शकत नाही. सृष्टि-निर्मिती, कर्मफळ-सिद्धांत, पुनर्जन्म, मोक्ष या बाबींचा सर्वंकष विचार ईश्वर, जीव व परमाणूंच्या अनादीत्वाच्या त्रैतवादाद्वारेच मांडला जाऊ शकतो.

यापूर्वी परमेश्वराला स्वीकार करणे का आवश्यक आहे याबद्दल प्राचीन शास्त्र, आधुनिक विज्ञान व तर्क या तीन्हीद्वारे पटवून देण्यात आले आहे. अनुषंगाने जीव-तत्त्वाचाही उल्लेख झालाच आहे. परमेश्वर व जीव या दोन तत्त्वांना स्वीकारणारेच आस्तिक होऊ शकतात. याचा अर्थ परमाणूंचा स्वीकार करणे आवश्यक नाही असे समजण्याचे काहीच कारण नाही.'' अस्ति इति मति यस्य स आस्तिकः'' पुनर्जन्म आहे असे स्वीकारणारे आस्तिक आहेत. पुनर्जन्माचा स्वीकार करण्यापूर्वी जन्म घेणारा जीवात्मा, जन्म देणारा परमात्मा जन्म घेण्याची कारणे आणि त्याचे परिणाम या सर्वांचा विचार करणे आवश्यक ठरते.

आधुनिक वैज्ञानिक केवळ परमाणूद्वारे सृष्टीच्या व्यवहाराची पूर्णता साधू इच्छितात. अचेतन, निष्क्रिय परमाणू सुख-दुःखाचा अनुभव कसे करू शकतात? सुव्यवस्थित दिसणाऱ्या सृष्टीची निर्मिती कशी करू शकतात? याचे उत्तर ते देऊ इच्छीत नाहीत. तरी ते स्वतःस वैज्ञानिक म्हणवून घेऊ इच्छितात.

ख्रिश्चन व मुस्लिम एकाच ईश्वरातून जीवात्मे व परमाणू उत्पन्न झाले असे मानतात. जीवांचे व परमाणूंचे स्वतंत्र अस्तित्व त्यांना मान्य नाही. ईश्वराने स्वतःतून जीव व परमाणू का उत्पन्न केले? याचे उत्तर ते देऊ शकत नाहीत. देऊ इच्छीत नाहीत. त्याचे मुख्य कारण बायबल व कुराणाच्या बाबतीत विचार करणे, तर्क करणे ते निषिद्ध समजतात, पाप समजतात.

अद्वैतवादी (नवीन वेदांती) एकाच ब्रह्मतत्त्वाचा स्वीकार करतात. माया उपाधीद्वारे ब्रह्म ईश्वर होतो, अविद्या उपाधीद्वारे ब्रह्म जीव होतो, असे म्हणतात. तसेच जग म्हणजे दोरामध्ये सापाचा भ्रम व्हावा तसे आहे असेही मानतात. दुसरीकडे, जसे कोळी जाळे विणतो तसे ब्रह्म स्वतःतून सृष्टीची निर्मिती करतो असेही मानतात. कार्यकारण संबंधाचा विचार न करता बाष्कळ बडबड म्हणजेच नवीन वेदांत आहे असे वाटण्याएवढी विसंगती इथे दिसून येते.

जैन, बौद्ध ईश्वराचा स्वीकार करीत नाहीत. ते जीवाचे व परमाणूंचे अस्तित्व मान्य करीत असले तरी जीव व परमाणूंच्या गुणधर्माबाबतीत वास्तविकतेला सोडून बरीचशी कल्पनाही त्यांनी केली आहे. जीव क्रमशः साधना करून ईश्वर होतो असेही म्हणतात. पश्चात्तापाने किंवा कर्म स्वतः फळ देण्यास पुरेसे आहे असा यांचा गोड गैरसमज आहे. कारण कर्म ज्ञानरहित व क्षणिक असल्यामुळे फळ देण्याची क्षमता त्यात नाही.

हिंदूतील शैव, वैष्णव, शाक्त, महानुभाव, वारकरी दत्तपंथी वगैरे अनेकानेक धार्मिक दिसत

असले तरी तत्त्वज्ञानाची पृष्ठभूमी या पंथियांकडे फारच कमी आहे. हे काहीही स्वीकारतात व त्यांच्या खरेपणा सिद्ध करण्यासाठी पाठपुरावाही करतात.

एकूण जगातील प्रमुख पंथोपपंथांची समीक्षा केली असता 'आस्तिक' म्हणवून घेण्यासाठी तत्त्वज्ञानाची पूर्तता यांपैकी कुणाकडेही नाही.

तर्काधिष्ठित आस्तिकता, जिचे विवेचन मागील पृष्ठात करण्यात आले आहे. तिचा स्वीकार करणे बुद्धिवाद्यांसाठी अतिशय आवश्यक आहे.

मागील पृष्ठात ईश्वरासंबंधी विवेचन विस्तृतपणे झाले आहे. जीवासंबंधी थोडेसे विवेचन करणे आवश्यक आहे असे वाटते.

आम्ही सर्व जण 'मी' या शब्दाचा वापर नेहमी करीतच असतो. पण 'मी' या शब्दाद्वारे कोणत्या वस्तूंकडे संकेत करतो याचा विचार फारसा करीत नाही. साधरणतः आम्ही शरीरासाठीच 'मी' या शब्दाचा वापर करतो. खरे पाहता, असा व्यवहार करणे योग्य आहे काय? या देहात किती प्रकारचे घटक आहेत याचा वैद्यकीय शोध घेतला जात असला तरी देह शरीरापलीकडे मानवजीवनाचे काही अस्तित्व आहे की नाही याचा फारसा विचार बुद्धिवादी दृष्टिकोणातून केला जात नाही. यापेक्षा अधिक दुर्दैव ते कोणते असणार? जे जीवन आम्ही जगतो त्या जीवनाचे प्राथमिक ज्ञानदेखील आम्हास असू नये ही खरोखरच मानव जीवनाची शोकांतिका आहे. धार्मिकांनी जीवनासंबंधी काही विचार व्यक्त केले तर ते सर्वसम्मतही होत नाहीत आणि ते हास्यास्पद ठरवले जातात. त्याचे मुख्य कारण, पंथीय तत्त्वज्ञानात पराकोटीचा परस्पर विरोध असणे हाच आहे. असे असले तरी बुद्धिवादाधारे पुढील विवेचन जीवनाबाबतीत दिशा नक्कीच देईल असे वाटते.

देह हा पांचभौतिक आहे, इंद्रियरूप आहे. पाच ज्ञानेंद्रिये, पाच कर्मेन्द्रिये असे देहाचे स्वरूप आहे. रूप, रस, गंध, स्पर्श, शब्द या विषयाचे ज्ञान करवणारी चक्षू, जिव्हा, नासिका, त्वचा, कर्ण ही ज्ञानेंद्रिये, हात, पाय, वाणी, गुदा, उपस्थ ही पाच कर्मेन्द्रियें प्रत्यक्ष दिसतातततच. याशिवाय विचार, कल्पना, स्मृती, भावना या बाबी बाह्येन्द्रियाद्वारे अनुभवास येत असलेल्या आम्हास दिसून येत नाही. म्हणून अंतःकरण-आंतील साधन असे 'मन' हे कर्मेन्द्रिय व ज्ञानेन्द्रिय - उभयात्मक आहे. इंद्रिय शब्दाचा अर्थ आहे : साधन (इन्द्रस्य साधनमिन्द्रियम्). आम्हाकडे एकूण ११ साधने आहेत. साधनांनी साधनांचा कधी स्वतः होऊन प्रयोग केला आहे का? साधने साधनासाठी असतात का? तसे नसेल तर ही साधने कुणासाठी? या साधनांचा वापर करणारा कोण आहे? ही. साधने कोणत्या उद्दिष्टाच्या पूर्ततेसाठी आहेत? याचे उत्तर शोधणे आवश्यक आहे.

दुसरे, 'मी' या शब्दाने शरीराकडे संकेत करीत असलो तरी थोडा विचार केल्यास चूक लक्षात येऊ शकेल. 'मी' म्हणजे नेमके काय? हात, पाय, डोके यांपैकी कोणता भाग? आम्ही आमच्यापेक्षा वेगळ्या व दूरच्या वस्तू व व्यक्तीसाठी 'माझा, माझी, माझे' असा षष्ठी विभक्तीचा संबंधार्थामध्ये प्रयोग करतो. दोन वेगळ्या वस्तूंचाच संबंध होऊ शकतो. आता मी म्हणजे 'शरीर' असे कुणी

म्हणतो का? आम्ही 'माझे शरीर' असाच प्रयोग करतो. माझे हात, माझे पाय वगैरे व्यवहार हेच दाखवतात की, हातापायांपेक्षा, संपूर्ण शरीरापेक्षाही 'मी' वेगळा आहे. याही पुढे "माझे मन" माझी बुद्धी हा व्यवहारही 'मी' हा मनापेक्षा, बुद्धीपेक्षा वेगळा आहे हे दाखवून देतो. निष्कर्ष हेच की, शरीर आणि मन (अंतःकरण) 'मी' नव्हे. एखाद्या अपरिहार्य कारणामुळे चिकित्सकांनी शरीराचा एखादा आवश्यक भाग वेगळा करणे आवश्यक आहे असे सांगताच आम्ही लगेच होकार देतो आणि वाट्टेल तो भाग वेगळा करा, पण 'मला' वाचवा असे म्हणतोच ना! शल्यचिकित्सेनंतर त्रास देणारा भाग वेगळा करण्यात आल्यामुळे समाधान वाटते. शरीरच 'मी' असते तर हा सर्व व्यवहार कसा घडू शकला असता? एखादा भाग वेगळा केल्यामुळे 'मी' अगोदर पूर्ण होतो; आता अपूर्ण झालो असेही कधी कुणास वाटत नाही. यावरून 'मी' शब्दाने संबोधिली जाणारी वस्तू शरीर आणि मन नसून तिसरीच एखादी आहे, ज्यासंबंधी आम्हास शब्दाने सुद्धा जाणीव नाही. अनुभव तर दूरच राहो! काही जण शारीरिक कष्ट किंवा मानसिक द्वंद्व सहनशक्तीच्या पलीकडे गेले म्हणजे आत्महत्या करतात. आत्महत्या करणाऱ्यांना असे वाटते की, या देहातून मुक्ती मिळाली म्हणजे दुःखातून सुटका होईल. याचा अर्थ हाच की, सोडला जाणारा देह आणि सोडणारा जो कोणी आहे तो या देहापेक्षा वेगळा आहे. देह हे जसे आम्ही घरामध्ये राहतो तसे घररूप आहे. म्हणून 'मी' हा देह नसून देहापेक्षा वेगळा आहे.

वाचकांच्या सहजच लक्षात आले असेल की, मानव देहात तीन घटक आहेत. बाह्यकरणसमूह शरीर व दुसरे मन, बुद्धी, चित्त, अहंकार समूहचतुष्टय अंतःकरण. तिसरे या दोन्हीचा प्रयोक्ता 'मी' पदवाच्य 'जीवात्मा' (जीव). डीकार्टे नावाच्या तत्त्ववेत्त्याने "Cogitó - मी विचारकरतो Ergo म्हणून Sum मी आहे" असा तर्क मांडला आहे. खरे पाहता मनाद्वारे विचार करणे, नेत्राद्वारे पाहणे, पायाने धावणे वगैरे सर्व कामे अचेतन, ज्ञानशून्य इंद्रिये करू शकत नाहीत.

म्हणूनच वेदांतशास्त्रात -

१. ज्ञोऽत एव । २।३।१८

जीवामध्ये ज्ञान आहे.

२. कर्त्ता शास्त्रार्थवत्त्वात् । २।३।३३

जीवामध्ये क्रियाशीलता कर्तृत्व आहे, असे म्हटले आहे.

प्रश्नोपनिषदात -

एष हि द्रष्टा स्प्रष्टा श्रोता घ्राता रसयिता मन्ता
बोद्धा कर्ता विज्ञानात्मा पुरुषः। (४- ९)

जीवात्मा पाहणारा, स्पर्श करणारा, ऐकणारा, वास घेणारा, स्वाद घेणारा, विचार करणारा, समजून घेणारा, क्रियाशील व ज्ञातृत्व बाळगणारा आहे.

न्यायशास्त्रामध्ये -

इच्छाद्वेषप्रयत्नसुखदुःखज्ञानान्यात्मनो लिंगमिति । (१।१।१०)

इच्छा, द्वेष, प्रयत्न, सुख-दुःख, ज्ञान जिथे दिसेल तिथे 'जीवात्मा' आहे असे जाणावे. यापेक्षाही वैशेषिककारांनी व्यापक लक्षण दिले आहे.

प्राणापाननिमेषोन्मेषजीवनमनोगतीन्द्रियान्तरविकाराः
सुखदुःखेच्छाद्वेषप्रयत्नश्चात्मनो लिङ्गानि । (३।२।४)

श्वास, प्रश्वास, पापण्यांची उघडझाप, शरीराची वाढ, मनाचा व्यवहार, एका इंद्रियामुळे दुसऱ्या इन्द्रियांमध्ये विकार. जसे : चिंच पाहताच तोंडाला पाणी सुटणे. सुख, दुःख, इच्छा, प्रयत्न यांपैकी एखादेही चिन्ह आढळून येत असल्यास तिथे जीवात्मा आहे असे समजावे. जीवात्मा आणि जीव दोन्ही शब्द एकाच अर्थामध्ये वापरले जातात. काही जण शरीरधारी 'जीव' जीवात्मा होतो, शरीर सोडल्यानंतर त्यास पुनः 'जीव' म्हणावे असा फरक करतात. ते त्यांचे अज्ञान आहे. कारण जीवाच्या गुणधर्मात कसलाच बदल होत नाही. तो शरीरधारी असो की नसो. इथे 'जीव एव आत्मा' असा सामासिक विग्रह करावा म्हणजे भ्रम होणार नाही. 'जीवस्य आत्मा' 'जीवाचा आत्मा' या विग्रहाचा अन्तर्यामी ईश्वर असा अर्थ होतो. दुसरे 'आत्मा' शब्द हा अल्पज्ञातृत्व, एकदेशीत्व, सुख-दुःखभोक्तृत्व वगैरे विशेषणे असतील तर 'जीवात्मा' साठी; सर्वज्ञत्व, सर्वव्यापकत्व वगैरे विशेषणे असतील तर 'ईश्वरा'साठी वापरला गेला असे समजावे. प्रकरणानुकूल अर्थ करावा.

न्यायशास्त्रकारांनी तर्काद्वारे जीवात्म्याचे अस्तित्व एका वेगळ्या पद्धतीने सिद्ध केले आहे. ज्याप्रमाणे अनेक फुलांमध्ये एकच धागा ओवलेला असतो तसे

"दर्शनस्पर्शनाभ्यामेकार्थग्रहणात् ।" ३।१।१

"मी जे फळ हाताने स्पर्शिले, जे डोळ्याने पाहिले, ते जिभेने चाखले आणि मनाद्वारे सुख अनुभवले." विविध इंद्रियांच्या या व्यवहारात जी एकसूत्रता आहे ती कोणामुळे? इंद्रिये तर वेगवेगळ्या ठिकाणी आहेत. एकाचा दुसऱ्याशी संबंधही नाही. म्हणून 'जीवात्मा' एक तिसरे तत्त्व देहात विद्यमान आहे, जे सर्व इंद्रियांमध्ये एकसूत्रता स्थापित करीत आहे. याशिवाय -

सव्यदृष्टस्येतरेण प्रत्यभिज्ञानात् । ३।१।७
.इन्द्रियान्तरविकारात् । ३।१।१२

डाव्या डोळयाने जे पाहिले ते उजव्या डोळयास 'तीच वस्तू' असे कसे समजते? 'डोळ्याने चिंच पाहतांच जिभेला पाणी का सुटावे? हा व्यवहारही इंद्रियांत एकसूत्रता स्थापित करणाऱ्या जीवाची ओळख करून देतो. म्हणून 'मी' शब्दाद्वारे शरीर व मनापेक्षा वेगळ्या जीवतत्त्वाची जाणीव होणे आवश्यक आहे.

शरीर आणि मन हे परमाणूपासून बनलेले आहेत. विज्ञानाने परमाणू हा Inert- अचेतन आहे असे स्वीकारले आहे. अचेतन म्हणजे ज्ञानरहित व स्वतः क्रियारहित. गती दिली तर गतिमान होतो. प्राण्यांच्या देहात गती आणि ज्ञान दोन्ही दिसतात. यावरून शरीर व मनापेक्षा वेगळ्या जीवतत्त्वामध्येच गती आणि ज्ञान दिसून येतात. एखादा मनुष्य वारला म्हणजे 'अमुक गेले' असा शब्दप्रयोग सहजच करतो. शरीर तिथेच असते. तरी पण शरीरात राहणारा गेला' असेच

म्हणावयाचे असते. मृतशरीरात गती, ज्ञान दिसून येत नाही. गुणावरूनच वस्तूची ओळख होते. शरीराची जाडी, रंग, आकार जिवंतपणी किंवा मृतावस्थेत दिसून येतात. पण मृत शरीरात गती, ज्ञान दिसून येत नाहीत. कारण हे जीवाचे गुणधर्म त्यासोबतच निघून गेले. निष्कर्ष हाच की, गती (क्रियाशीलता) आणि ज्ञान हे चेतनाचे लक्षण (गुणधर्म) आहेत.

ज्ञातृत्व - कर्तृत्व - भोक्तृत्वानणुः ।

जाणण्याची, कर्म करण्याची , सुख-दुःख अनुभवण्याची क्षमता बाळगणारे जे तत्त्व आहे त्यास 'जीवात्मा' (जीव) असे म्हणतात. इथे जीवात्मा चांगले, वाईट करण्यास किंवा काहीच न करता बसून राहण्यास (कर्तुम्, अकर्तुम् अन्यथा कर्तुम्) पूर्णतः स्वतंत्र आहे. ईश्वरासंबंधीच्या विवेचनात हे दाखवून देण्यात आले आहे की, ईश्वर सर्वशक्तिमान्, न्यायकारी असल्यामुळे सर्व परमाणू व जीव त्याच्या आधीन आहेत. परमाणू व जीवांची निर्मिती तो करीत नाही. जीव कर्म करण्यास स्वतंत्र असले तरी ईश्वराच्या न्यायव्यवस्थेत सुख-दुःखाचा अनुभव करण्यात पूर्णतः परतंत्र आहेत. जीवाचा देहाशी संयोग 'जन्म' व वियोग 'मृत्यू' आहे. कोणत्या देहात कोणत्या जीवात्म्याने प्रवेश करावा हे जीवात्म्याने केलेल्या कर्माच्या साररूप संस्कारावरून ठरत असते. हे संस्कार अंतःकरणामध्ये हळू-हळू एकत्रित होत असतात. या संस्काराधारेच ईश्वर जीवांना देह-अंतःकरण देत असतो. या जीवनात केलेल्या ज्या कर्माचे फळ मिळत नाही त्या सर्वांचे साररूप फळ देहाच्या माध्यमातून नक्कीच मिळते. उदाहरणादाखल एखाद्या मुलाने योग्य वर्तन केले नाही म्हणजे त्यास कडीकुलपात बंद केले जाते किंवा शासनही चोरांना जेलमध्ये ठेवते. तसे परमेश्वर अशुभकर्म करणाऱ्या जीवांचे हात, पाय, डोळे काढून घेतो. आपण पाहता, काही जण जन्मतः लुळे, पांगळे, बहिरे, मुके, आंधळे, दुर्धर रोगाने पीडित असतात. काही जणांची बुद्धी जन्मतः अतिशय मंद असते. या सर्वांचे कारण मागील जन्माचे कर्मच आहे. म्हणून कुणीही असे समजण्याचे कारण नाही की, "मी शक्तिसंपन्न असल्यामुळे मला समाज किंवा राजा शिक्षा ठोठावू शकणार नाही. परमेश्वर हा सर्वांचा सर्वज्ञ, सर्वव्यापक असा न्यायकारी नियंता आहे. त्याच्या शिक्षेतून कुणीही सुटू शकणार नाही. त्याच्या विविध प्रकारच्या शिक्षा अनुभवण्यासाठीच मनुष्य, पशु-पक्षी, कृमी-कीटकादींचे विविध शरीर आम्ही पाहतोच. जीवात्मा अनादी-कारण रहित व प्रारंभ रहित असल्यामुळे जन्म-मरणाचे चक्र मोक्षावस्था मिळे तोवर असेच चालू राहते. मोक्षावस्थेच्या प्रदीर्घ कालानंतर हे चक्र पुनः सुरू होते.

श्रीकृष्णांनी गीतेत अर्जुनास मोहमुक्त करण्यासाठी जीवस्वरूपाचे यथार्थ विवेचन केले आहे.

न त्वेवाहं जातु नासं, न त्वं नेमे जनाधिपाः ।
न चैव न भविष्यामः, सर्वे वयं अतः परम् ॥

अर्जुना! तू, मी, हे राजे कधी नव्हते असे कधी झाले नाही, पुढे कधी राहणार नाही असे कधीच होणार नाही. आम्ही सर्वजण नेहमीच राहत आलेले आहोत, नेहमीच राहणार आहोत, तू क्षत्रिय आहेस, कर्तव्यावर अढळ राहा. अनंत कालप्रवाहात क्षणिक, क्षुल्लक अशा नात्या-गोत्यांचा

विचार करू नकोस.

अच्छेद्योऽयमदाह्योऽयं अक्लेद्योऽशोष्य एव च ।
नित्यः सर्वगतः स्थाणुरचलोऽयं सनातनः ॥

शरीर आणि मनापेक्षा वेगळे असे जे मी - जीवतत्त्व आहे. त्याचे विभाग केले जाऊ शकत नाहीत. अग्नी जाळू शकत नाही. पाणी भिजवू शकत नाही. वारा उडवू शकत नाही. हे जीवतत्त्व नित्य, सनातन, आपल्या चैतन्याद्वारे सबंध शरीराद्वारे अभिव्यक्त होते. असे जीवतत्त्व तू आहेस. म्हणून कर्तव्याचा विचार कर. मृत्यूचा विचार करू नकोस.

वरील विवेचन 'जीवात्मा' अनादी, अनंत, अमर, एकदेशी आहे असे दाखवून देते. हे जीवनासंबंधीचे मूलभूत असे तत्त्वज्ञान आहे. आधुनिक विज्ञानाने या बाबतीत विचार करण्याची अजूनही तयारी दर्शविली नाही. म्हणून जीवनाबाबतीत आधुनिक विज्ञान पूर्ण, यथार्थदृष्टी देऊ शकत नाही.

भारतातील 'चार्वाक' व यूरोपमधील 'एपिक्यूरियन' यांनी देहात्मवादाचा सिद्धांत जगासमोर मांडला.

चैतन्य एव आत्मा । देहातिरिक्त आत्मनि प्रमाणाभावात् ।

गती आणि ज्ञानयुक्त दिसणारे शरीर हेच 'आत्मा' आहे. कारण, देहाशिवाय आत्म्याच्या अस्तित्वाचे प्रमाणच नाही. यामुळे यांची जीवनदृष्टी दैहिकसुखाच्या पलीकडे जाऊ शकली नाही. म्हणूनच –

अंगनालिंगनाजन्यसुखमेव पुमर्थता ।

असे जीवन - उद्दिष्ट यांनी ठरवून टाकले. स्त्रियांच्या आलिंगनाद्वारे सुख मिळविणे हीच जीवनसार्थकता असे यांचे मत आहे. याशिवाय,

ऋणं कृत्वा घृतं पिबेत, भस्मीभूतस्य देहस्य पुनरागमनं कुतः?

माणसाने इतरांच्या सुख-दुःखाचा विचार न करता कर्ज काढावे, खूप तूप प्यावे, मौज-मजा करावी. एकदा माणूस मेला म्हणजे कर्ज देणारा कोण आणि घेणारा कोण? म्हणजे कर्जाची परतफेड करण्याची काही गरज नाही.

जे देहासच आत्मा समजतात, त्यांचे वर्तन किती निकृष्ट असू शकते, हे वरील विवेचनाद्वारे लक्षात येईल.

काहीजणांचे मत असे आहे की, जसे हळद आणि चुना मिश्रित केला म्हणजे लाल रंगाचा आविर्भाव होतो. तसेच विविध परमाणू एकत्रित आले म्हणजे चैतन्याची (ज्ञान व क्रियाशीलता) उत्पत्ती होते. म्हणून शरीरापेक्षा वेगळे असे आत्मतत्त्व स्वीकारण्याची गरज नाही.

परंतु हळदीच्या कोंबामध्ये लाली दिसून येते. म्हणून यांचा युक्तिवाद तर्कसंगत नाही.

'नासतो विद्यते भावो, नाभावो विद्यते सतः'। गीता.

जे कारणरूपातही नसते ते कार्यरूप धारण करू शकत नाही. ज्याचे अस्तित्व आहे तो पूर्णपणे

कधीच नष्ट होऊ शकत नाही. नाश म्हणजे कार्यरूप कारणरूपात विलीन होणे एवढेच. म्हणून ज्या परमाणूमध्ये गतिशीलता व ज्ञान नाही तसे अनेक परमाणू एकत्र केले तरी परमाणू समूहात ज्ञानाचा अविर्भाव होणे मुळीच शक्य नाही. एखाद्या शाळेत एका बी. एड. शिक्षकाची आवश्यकता असेल आणि तिथे पाच डी.एड. शिक्षकाद्वारे एका बी. एड. ची पूर्तता करून घ्यावी असे म्हणणे जेवढे हास्यास्पद आहे तेवढे पाच महाभूतांद्वारे शरीरात चैतन्य उत्पन्न होते म्हणणे हास्यास्पद आहे. म्हणून नास्तिकांच्या तर्कामध्ये काही तथ्य नाही हे सहजच कळून येते.

आम्ही कोणत्याही देशाचे, कोणत्याही जाती-जमाती-वंशाचे, कुठल्याही विचाराचे असलो तरी सर्वांसाठी एकच असे जे जीवनाचे तत्त्वज्ञान आहे ते स्वीकारणे आवश्यक आहे. परमेश्वर व जीव यांसंबंधी सैद्धांतिक विवेचन करण्यात आले. आम्ही वारंवार 'आध्यात्मिकतेचा' उल्लेख करताना 'परमेश्वर, जीव, परमाणू' या त्रैतवादाचास्वीकार करण्यावर भर दिला आहे.

पण केवळ शब्दज्ञान झाले म्हणून 'आस्तिक' होता येते का? जगात शब्दज्ञानी आस्तिकांची संख्यासुद्धा बोटावर मोजण्याएवढीच असली तरी, अशी आस्तिकता नास्तिकांच्या जीवनशैलीपेक्षा फारशी पुढे जात नाही. जसे जीवन नास्तिक जगतात तसेच जीवन आस्तिकही जगत असलेले आम्ही पाहतो.

काही जण शरीरसुखापर्यंत वाटचाल करतात. काही जण मानसिक तर काही जण बौद्धिक सुखापर्यंत वाटचाल करतात. आस्तिकता म्हणजे शरीर, मन, बुद्धीच्याही पलीकडे जे आत्मिक सुख आहे त्यापर्यंत वाटचाल करणे. मानवजीवनात सर्वोत्कृष्ट व अतिसूक्ष्म असे जे आत्मिक सुख आहे त्याचा अनुभव घेणे हीच मानव जीवनाची सार्थकता आहे. दुर्दैवाने आत्मिक सुखाचा शोध घेणाऱ्या आध्यात्मिकांनी शरीर व अंतःकरणाच्या सुखांची अवहेलना, तिरस्कार, उपेक्षा केली. म्हणून अध्यात्म हे भौतिक साधनसमृद्धीच्या विरोधात राहिले. त्याचप्रमाणे कौटुंबिक व सामाजिक संबंधांशी निगडित कर्तव्याची उपेक्षा झाल्यामुळे इहवादाचाच अव्हेर झाला. असे घडावयास नको होते. बुद्धिवादी दृष्टी ही आहे की, शरीर, मन, बुद्धी, आत्मा या चारही स्तरांवर संतुलनाद्वारे सर्वच प्रकारच्या भौतिक समृद्धीकडे वाटचाल करीत, सर्व प्रकारच्या संबंधांचा निर्वाह करीत सर्व प्रकारची कर्तव्ये पूर्ण करीत, विज्ञान, तंत्रज्ञान, तत्त्वज्ञान, सर्व प्रकारच्या कलांचा आस्वाद घेत जीवन जगत आत्मसुखाकडेही वाटचाल करावयाची आहे. एवढी जाणीव असली म्हणजे पुरेसे आहे.

आम्ही जे जीवन जगतो ते तीन अवस्थांत विभागले गेले आहे. जागृतावस्था, स्वप्नावस्था, सुषुप्ती-अवस्था. जागृतावस्थेत सर्व इंद्रिये कार्यरत असतात. विविध सुखांचा अनुभवही होतो. स्वप्नावस्थेत अर्धचेतनमनाद्वारे अपूर्ण कामना पूर्ण करत असतो. या अवस्थेत मनाद्वारे कार्य सुरू होते. या दोन्ही अवस्थांच्या पलीकडे जेव्हा आम्हास शरीर व मनाचे भान राहत नाही, अशा अवस्थेतून सकाळी गाढ झोपेतून उठून आम्ही म्हणतो, 'वा! काय छान झोप लागली. साखरझोप होती.' थोडा विचार करणे आवश्यक आहे. ही गोडी, हा आनंद कुठून आला? शरीर व मनाशी

संबंध संपुष्टात आल्यामुळे बाह्य वस्तूद्वारे हे सुख मिळाले असे म्हणताच येणार नाही. निश्चितच ही गोडी आंतरिक आहे. जीवात्मा सुख-दुःखाचा अनुभव करू शकतो. जीवात्मा स्वरूपतः (By Nature) सुखस्वरूप नाही. जीवात्मा हा आनंद कुणाच्या सान्निध्यातून अनुभवतो? वेद, उपनिषद्, षट्शास्त्रामध्ये परमेश्वरास आनंदस्वरूप म्हटले आहे. सुषुप्ती-अवस्थेत जेव्हा अंतःकरण पूर्णतः निष्क्रिय अवस्थेत असते तेव्हा सर्वान्तर्यामीरूपाने आत्म्यातच जो परमात्मा आहे त्याच्या सहवासामुळे हा आनंद जीवाला अनुभवता येतो. परमेश्वर जरी सदैव आत्म्यात सर्वव्यापकरूपाने व्याप्त असला तरी जागृत व स्वप्नावस्थेत इंद्रिय तादात्म्यामुळे जीवाला बहिर्मुख होतो म्हणून तो आनंदाचा अनुभव घेऊ शकत नाही.

वाचकमित्र हो! आमच्याकडे कितीही ज्ञानसंपन्नता व साधनसंपन्नता असेल, कितीही नातलग असले तरी व्यवस्थित झोपेच्या अभावी जगणेसुद्धा नकोसे होते. याचा अनुभव दोन-चार दिवस झोप आली नाही म्हणजे सहजच होईल. आई जशी तान्हे मूल कुशीवर घेऊन अंगाई गीत म्हणत त्यास झोपवते, तसा परमेश्वर सर्व जीवांना त्यांचे जीवन किमान सुखाचे व्हावे म्हणून सुषुप्ती अवस्थेत आपल्या आनंदास्वरूपाचे सान्निध्य मिळवून देतो. एखाद्या क्लोरोफॉर्म दिलेल्या व्यक्तीची गुंगी उतरल्यावर त्याच्या चेहऱ्यावर ताजेतवानेपणा दिसणार नाही. उलट तो म्लान, थकलेला दिसेल. वैदिक तत्त्ववेत्त्यांनी मोक्षाची संकल्पना व्यवहाराच्या आधारावरच मांडली आहे. परमेश्वरात 'आनंद' आहे याचा अनुभव आम्हा सर्वांना दररोजच येतो. पण त्याची जाणीव आम्हास नाही. सुषुप्ती अवस्थेत अनुभवला जाणारा 'आनंद' हा नकळत अनुभवला जातो, समाधी अवस्थेत जाणीवपूर्वक अनुभवला जातो. एवढाच फरक आहे.

कपिल महर्षींनी सांख्यशास्त्रात -

समाधिसुषुप्तिमोक्षेषु एकरूपता ॥

असे म्हटले आहे. समाधीमध्ये शरीरसहित, ज्ञानसहित, आनंद, सुषुप्तीमध्ये शरीरसहित, ज्ञानरहित आनंद; मोक्षामध्ये शरीररहित, ज्ञानसहित आनंद असा सूक्ष्म फरक आहे.

जी व्यक्ती परमेश्वराच्या 'आनंदस्वरूपाचा' अनुभव करण्याच्या उद्देशाने जीवन जगते, तशी वाटचालही करते तीच खरी ''आस्तिक'' आहे.

आस्तिकतेचा दुसरा पक्ष : पशूपक्ष्यांना स्वतःच्या अस्तित्वाची जाणीव नसते. कोणत्याही गायीला, म्हशीला मी गाय, म्हैस आहे हे कळते का? ते न कळणेच पशुता आहे. आम्हा सर्वांना 'मनुष्य' आहोत हे कळत असले तरी जोपर्यंत ''आत्मत्वाची'' जाणीव होणार नाही· तोवर मनुष्यत्वाची कर्तव्ये पार पाडणे सहजपणे जमत नाही. अनेक तत्त्ववेत्त्यांनी कर्तव्यावर भर दिला आहे. आत्मत्वाच्या शोधात कालापव्यय त्यांना नकोसा वाटतो. पण ज्या व्यक्तीला स्वतःच्या अस्तित्त्वाची जाणीव नाही ते कर्तव्य तरी कसे पूर्ण करू शकेल? म्हणून शरीर, अंतःकरणापलीकडे जे तिसरे मी-जीवात्मतत्त्व (आत्मतत्त्व) आहे त्याचा अनुभव करण्याच्या उद्दिष्टाने जीवन जगणारे, तशी वाटचाल करणारेच खरे ''आस्तिक'' होऊ शकतात.

वैदिक, हिंदू, मुस्लिम, खिश्चन यांनी परमेश्वर साक्षात्कारावर भर दिला आहे. जैन, बौद्धांनी आत्मानुभवावर भर दिला आहे. पण मार्ग एकच आहे. उद्दिष्ट वेगवेगळे दिसत असले तरी साध्य एकच आहे. मार्ग एकच आहे. तो म्हणजे मनाचे अतिक्रमण - अंतःकरणाच्या पलीकडे जाणे, मनाची पूर्ण निष्क्रियता साधणे. ठराविक वेळेसाठी. आत्म आणि परमात्म साक्षात्कार वेगवेगळे आहेत काय? नाही. मुळीच नाही. एकदा मन जागरूकपणे निष्क्रियतेपर्यंत येऊन पोहचले म्हणजे जीवात्मतत्त्वाचा, चैतन्याचा अनुभव येऊ लागतो. हा अनुभव अधिक दृढ होत गेला म्हणजे जीवामध्ये जो व्याप्त आनंदरूप परमेश्वर आहे त्याचाही अनुभव येऊ लागतो. महात्मा बुद्ध प्रभृती महापुरुषांनी आत्म्याचाच विचार केला असला तरी आत्म्यात व्याप्त परमेश्वराच्या सान्निध्याशिवाय त्यांनाही आनंदानुभव झाला नाही. एखादा अनुभव आम्हास कळून होवो की न कळत, ज्या वस्तूद्वारे तो अनुभव होतो त्याचे अस्तित्व असावेच लागते. बुद्ध असो की महावीर, या बाबतीत अज्ञानीच आहेत.

आम्ही जे जीवन जगतो ते 'बहिर्मुख' आहे. याचा अर्थ हाच की, आम्ही सतत बाह्य वस्तूंच्या संपादनाद्वारे किंवा बाह्य व्यक्तींच्या संपर्काद्वारे सुखी होऊ इच्छितो. निष्कर्ष इंद्रियांच्या माध्यमातून मिळणाऱ्या सुखासाठीच धडपड करतो आणि त्यातच जीवनाची सार्थकता समजतो. यापलीकडे काही जाणावयाचे, मिळवावयाचे आहे असे आम्हास वाटत नाही. 'आस्तिकता' ही अंतर्मुख होण्याशी निगडित आहे. अर्थ हाच की, इंद्रियांच्या सहाय्याशिवाय आत्म-परमात्म संबंधाने मिळणाऱ्या सुखाचा शोध घेणे. जीवन-दृष्टी 'अंतर्मुख' नसेल तर आम्ही शब्दपांडित्य कितीही संपादन केले तरी आस्तिकतेची व्यावहारिकता साधली जाऊ शकणार नाही.

थोडा विचार करा. साधन आणि साध्य ही दोन वेगवेगळी आहेत. सायकल, बस, रेल्वे, विमान या वाहनात सातत्याने बसून राहणाऱ्यास आपण काय म्हणणार? कुठे तरी पोहचण्यासाठी साधने ठीक आहेत. जिथे जावयाचे तिथे गेलो म्हणजे ती साधने एवढ्या सहजपणे सोडतो की, सोडणे हाच आनंद असतो. मागे वळूनही पाहत नाही. निश्चितच रेल्वेत बसून प्रवास करणे सुखदायक आहे. पण मुंबई आल्यावरही त्या सुखाचा विचार करून त्यात बसून राहतो का? मुळीच नाही. तसेच आहे इंद्रिय-सुखाचे. बहिर्मुखतेत आणि अंतर्मुखतेत विरोध नाही. जी बाह्य सुखे आहेत तीही अनुभवावीत. या दोन्हीतही संतुलन साधले जावे म्हणजे जीवन बाह्य व आंतरिक दृष्ट्या समृद्ध होते.

आंतरिक जीवनाच्या समृद्धीसाठी, आत्म-परमात्म साक्षात्कारासाठी (अनुभवासाठी) उत्तम गुणांचे वाचन, श्रेष्ठ व्यक्तींचा सहवास अत्यंत आवश्यक आहे. ज्या ईश्वराने भोग्य पदार्थांनी समृद्ध असे ब्रह्मांड व देह, अंतःकरणरूप सुखाची साधने दिली आहेत त्या परमेश्वराच्या उपकाराचे चिंतन करावे. त्याचे विस्मरण होऊ देऊ नये. सद्‌गुण धारण करण्यासाठी, विकारांना दूर सारण्यासाठी सहायता मागावी. स्वतःचे गुण ईवराप्रमाणे करण्याचा प्रयत्न करावा, दयाळूता, न्यायप्रियता वगैरे गुणांची वाढ करावी, परमेश्वराच्या उपकाराचे स्मरण करीत करीत त्याच्या

उपस्थितीचा अनुभव करावा. हळू-हळू मनाची चंचलता कमी होत जाऊन हृदय भक्तिभावनेने भरले जाते. त्याहीपुढे भक्तीच्या वृत्तीतूनही मुक्ती मिळाली म्हणजे समाधी अवस्थेचा अनुभव येऊ लागतो.

ईश्वरसाक्षात्काराची दृष्टी बाळगणाऱ्यांनी भक्तिमार्गाचा अवलंब केला. परंतु भक्ती ही निराशेपोटी नसावी. भक्ती ही निष्क्रियता किंवा पलायनवादी नसावी. देवाच्या ठिकाणी एखाद्या व्यक्तीची, मूर्तीची कल्पना करून कोणत्याही पद्धतीने पूजा करणे भक्ती नव्हे. मागील ईश्वर विवेचनात ज्या ईश्वराचे विवेचन केले आहे त्याचाच स्वीकार करून त्याच्या सर्व गुणांना जाणून घेऊन डोळसपणाने भक्ती करावी. भक्तीसाठी शरीर हेच मंदिर आहे. म्हणून सर्व प्रकारच्या दुर्व्यसनातून धूम्रपान, मद्यपान, मांसाहार, स्वैराचार यांपासून कसोशीने दूर राहावे. तसेच योग्य आहाराद्वारे स्वस्थ व बलसंपन्न होण्याचा सदैव प्रयत्न करावा. पवित्र मनाद्वारेच भक्ती होऊ शकते. म्हणून अमर्यादित कामना, परनिन्दा, तिरस्कार, घृणा, द्वेष, लोभ, मोह, अहंकार या मानसिक दुर्गुणांना सत्संग, स्वाध्याय व विवेकाद्वारे दूर सारण्याचा प्रयत्न करावा. बुद्धी ज्ञानसंपन्न असणे आवश्यक आहे. कार्यकारणसंबंधाद्वारे सर्व प्रकारच्या अंधश्रद्धा, अंधविश्वासातून मुक्त होऊन ज्ञानार्जनाद्वारे बुद्धीची पवित्रताही साधावी. शरीर, मन, बुद्धी ही तीन साधने उपयुक्त झाली म्हणजे भक्तीचा अविर्भाव होतो. जीवनात मिळणाऱ्या सर्व सुखांचे प्रत्यक्ष अप्रत्यक्ष कारण परमेश्वरच आहे. जशी सुख देणाऱ्याविषयी आम्हास आपुलकी वाटते तशी परमेश्वराविषयी वाटणे हीच भक्ती आहे. भक्ती म्हणजे याचना, दीनता नव्हे. ती कृतज्ञतेची अभिव्यक्ती आहे. देवाने जे दिले त्याबद्दल धन्यवाद द्यावेत. जे मिळवायचे आहे ते विवेकाद्वारे, प्रयत्नाद्वारे मिळविणे योग्य आहे. देवाची भक्ती केल्याने अलभ्य लाभ होईल किंवा सर्व दुःखे, सर्व कष्ट दूर होतील अशा भ्रमात राहण्याचे काहीच कारण नाही. भक्तीमध्ये मनाच्या सर्व प्रकारच्या वृत्तींचा निरोप आपोआप होतो. हृदय भरल्यासारखे वाटते. किमान ४० मिनिटे तरी एका आसनात बसावे. गायत्री मंत्राचे अर्थसहित दोन-चार वेळेस उच्चारण करावे. आतून होणारा जो आनंदानुभव आहे तोच साक्षात्कार आहे.

बुद्ध व महावीरासारख्या अनेकांनी ईश्वराचा विचार केला नाही. त्यांनी आत्मतत्त्वाचा शोध घेतला. भक्तीची मनःस्थिती नसणाऱ्या व्यक्तींनी 'ध्यान' मार्गाने वाटचाल करणे हिताचे ठरेल. महर्षी कपिल यांनी आपल्या सांख्यशास्त्रात 'साक्षीभावा'चा उल्लेख केला आहे. प्रकृतीपुरुषविवेकख्यातीवर त्यांनी भर दिला आहे. जीव (पुरुष) व प्रकृती (चित्र) यांचे पृथकत्व जाणून घेणे हेच मानवजीवनाचे उद्दिष्ट आहे. योगशास्त्रातही-

दृग्दर्शनशक्त्योरेकात्मतेवास्मिता ।

म्हणजे जीव व प्रकृती यांची एकरूपता हीच अस्मिता आहे. हे तादात्म्य नाहीसे करणे आत्मानुभवासाठी आवश्यक आहे.

यासाठी प्रथम साधन प्राणायाम आहे. प्राणायामाचे अनेक प्रकार आहेत. रेचक, पूरक, कुंभक

हे जाणकाराकडून शिकावेत. याशिवाय नाभिकेपर्यंत संथगतीने श्वास-प्रश्वास घेणे व सोडणे, ही क्रिया सकाळ - संध्याकाळ अर्ध्या तासापर्यंतच चालू ठेवली तरी अमर्यादित लाभ होतो. श्वास-प्रश्वास चालू असताना मी श्वास घेत आहे, सोडीत आहे याचे भान पूर्णतः असणे आवश्यक आहे. ही प्रक्रिया फावल्या वेळी, रिकाम्या वेळीही करीत जावे मनाची चंचलता या प्राणायामाने निश्चितच कमी होते.

दुसरे, सूर्योदयापूर्वी एक तास 'ध्यान' प्रक्रियेचा अवलंब करावा. स्वतःच्या आस्तित्वाच्या अनुभवासाठी 'ध्यान' आवश्यक आहे. पद्मासन, सिद्धासन किंवा स्वस्तिकासन किंवा एखाद्या सुखासनात बसावे. मन हे प्राकृतिक आहे. सत्त्वरजतमोगुणांनी युक्त आहे. 'ध्यान' करीत असताना झोप येणे, अंधकार दिसणे तमोगुणामुळे घडते. त्यासाठी दूध, फळे यासारखा सुपाच्य आहार घ्यावा. शरीर उत्साही राहण्यासाठी आसने अवश्य करावीत. दुसरे रजोगुणामुळे मनात चंचलता असते. मनाची पूर्ण निष्क्रियता साधवयाची आहे. त्यासाठी तटस्थ राहून मनाचे खेळ पाहण्याची दृष्टी, क्षमता विकसित करावी. मनाच्या कुठल्याही कामात रस घेऊ नये. मनासोबत वाहत जाऊ नये. दोन व्यक्तींच्या भांडणात 'साक्षी' तटस्थ होऊन पाहतो तसे मनाचे सर्व क्रियाकलाप 'साक्षी' होऊन पाहत राहावे. हळू-हळू 'साक्षी'ची प्रगाढता मनाच्या चंचलतेस विसर्जित करील. योगशास्त्रात -

वितर्कबाधने प्रतिपक्षभावनम् ॥

म्हणजे जगातील एखादी बाब मनास चंचल बनवत असेल तर त्याच्या क्षणभंगुरतेवर विचार करावा. जगातील वस्तू व व्यक्तींचा तिरस्कार, द्वेष न करता विवेकाने मनाला समज देऊन चंचलतेपासून मुक्त करणे आवश्यक आहे. आधुनिक सिद्धपुरुषांनी "Total Inactivity of Mind with Total Awarenessे" पूर्ण निष्क्रियता व पूर्ण जागरूकता'' ध्यान आहे असे दाखवून दिले आहे. आत्म, परमात्म साक्षात्कारामध्ये सर्वात मोठी अडचण मनाची गती आहे. मी माझ्याजवळच आहे. परमेश्वरही माझ्यात व्याप्त आहे. म्हणून जवळच्या वस्तूच्या अनुभवासाठी साधनाची काय गरज? मन हे जगातील सुखांच्या अनुभवासाठी साधन होऊ शकते. आत्म-परमात्म- अनुभवासाठी मनातून पूर्ण सुटका होणे आवश्यक आहे. जाणीवपूर्वक मनाला गतिशून्य करणे हेच साधावयाचे आहे. हीच साधना आहे. हे साधले म्हणजे ध्यानावस्था सत्त्वगुणाची स्थिती प्राप्त होते. या अवस्थेत स्वतःचा अनुभव येऊ लागतो. ही स्थिती प्रगाढ होत गेली म्हणजे समाधी अवस्था प्राप्त होते. ध्यानावस्थेपर्यंत आम्ही वाटचाल करू शकतो. समाधी अवस्था जेव्हा आम्ही पात्र होऊ तेव्हा मिळेलच.

जगातील सर्व धार्मिकांनी व कर्मवाद्यांनी शुद्ध आचरणावर भर दिला आहे. पण, कर्म ज्या अस्तित्वातून उगम पावते त्याचा त्यांनी फारसा विचार केला नाही. म्हणून समाजाच्या दडपणामुळे, भीतीमुळे किंवा शास्त्रमयदिमुळे मनुष्यास संयमाचे जीवन जगण्यास भाग पाडले जात आहे. यामुळे एक सतत संघर्षाचे, द्वंद्वाचे जीवन जगावे लागते. एवढेच नव्हे तर कुठलेही कार्य सहजपणे,

आनंदाने केले जात नाही. आम्ही पाहतोच की, 'कर्तव्य' म्हणून, करणे आवश्यक आहे म्हणून कामे केली जातात. आनंदाची अभिव्यक्ती म्हणून केली जात नाहीत. एवढेच नव्हे तर, केल्या जाणाऱ्या कार्यात तृप्तीची जाणीव ही फार कमी वेळा होते; कार्यामध्ये समग्रता (Totality) दिसून येत नाही. याचे एकच कारण, ते म्हणजे अस्तित्वाचा अनुभव नसणे. कर्म हे मनाशी निगडित आहे. आणि मन हे द्वंद्वात्मक आहे. या कर्मामध्ये परिपूर्णता साधण्यासाठी आंतरिक तृप्ती, आनंदाचा शोध आवश्यक आहे. तो शोध घेणे हीच आस्तिकता आहे.

दुसरे, साधुसंतांनी जगाचा- इहलौकीक सुखाचा अतिशय तिरस्कार केला आहे, पाऊलोपाऊली निन्दाही केली आहे. या नकारात्मक दृष्टीमुळे आत्मत्वाची ओळख तर झालीच नाही, दारिद्र्यामध्ये मात्र भर पडली. यामुळे शारीरिक आवश्यकतेच्या पूर्ततेतच श्रमाचा आणि वेळेचा अपव्यय होत असलेला आपण पाहतो. जो देश भौतिकदृष्ट्या समृद्ध आहे तोच शरीर, मन, बुद्धीच्या सर्व सुखांचा अनुभव करतो. आणि ही आत्मत्वाची पायरी आहे. म्हणून आध्यात्मिकता दरिद्रतेची समर्थक व भौतिक समृद्धीचा विरोध करणारी आहे असे समजण्याचे कांहीच कारण नाही. जगातील सुखे क्षणभंगुर असली तरी अनुभवण्याजोगी आहेत. हा सुखानुभाव आत्मिक सुखानुभवाची संवेदनशीलता विकसित करतो. म्हणून जगाविषयी प्रतिकूलता बाळगणे आत्म-परमात्म-अनुभवासाठी बाधकच ठरणारे आहे.

काम, क्रोध, लोभ, मोह, ईर्ष्या, द्वेष, अहंकार या विविध विकृतीपासून दूर राहण्यासाठी सामान्यतः शास्त्रपठन, महापुरूषांच्या जीवन-चरित्राचे वाचन व दमन (संयम) या मार्गांचा अवलंब केला जातो. पण, पोहण्यासंबंधी भाराभर पुस्तकें वाचली तरी पोहता येते का? तसेच या मानसिक विकारांना केवळ वाचनाने दूर सारणे शक्य नाही. या साठी मनाची गती सातत्याने कशी कमी करता येईल, याकडे विशेष लक्ष देणे आवश्यक आहे. खरे पाहता, हे विकार आंतरिक अतृप्तीमुळेच आहेत. म्हणून अतृप्ती आणि विकार या दोन्ही बाबी गती-निरोधामुळे दूर सारता येतात. म्हणून 'Awarness' म्हणजे जागरुकता साधणे आवश्यक आहे. शरीर आणि मनाच्या क्रिया जाणीवपूर्वक होतात याकडे विशेष लक्ष द्यावे लागेल. कोणतेही कार्य करीत असताना, ते एकच कार्य समग्रतेने करणे आवश्यक आहे. जसे : जेवणाच्या वेळी संभाषण टाळणे. कुठलेही कार्य असो, एकावेळी एकच होईल याबाबतीत दक्षता बाळगणे मनाचे अतिक्रमण साधण्यासाठी आवश्यक आहे. तसेच श्रमाची कामें करून थकल्यानंतर शवासनात संथगतीने नाभिकेंद्रापर्यंत जाणीवपूर्वक श्वास-प्रश्वास चालू ठेवावेत. फावल्या वेळीही श्वास-प्रश्वासाची लय साधणे लाभदायक राहील.

पहाटेच्या वेळी केलेले ध्यान हे जीवन पूर्णतः सुखी होण्यासाठी पूर्ण सहायक ठरते. तमोगुण म्हणजे जडता, निष्क्रियता, अंधार; रजोगुण म्हणजे मनाची धावपळ, या दोन्हींचे अतिक्रमण ध्यानाद्वारे करता येते. तमोगुण आणि रजोगुण यांमुळेच जीवनामध्ये अपूर्णता आहे. सत्वगुणाच्या अवस्थेत आनंदपूर्ण सहज अवस्था असते, ज्यामुळे प्रत्येक कार्य आनंदपूर्ण होतेच. आशे-अपेक्षेच्या

तावडीतून सुटकाही होते. वेदांनी, श्रीकृष्णांनी, साधुसंतांनी निष्काम कर्माचा उपदेश केला आहे. पण जोवर आंतरिक सुखाचा अनुभव येत नाही तोवर कितीही शास्त्रपठन आणि संयम साधला तरी आशे-निराशेच्या द्वंद्वातून मुक्ती साधली जाऊ शकत नाही.

जीवन सार्थक व्हावे म्हणून आम्ही निरंतर धडपडतो. पण सार्थकतेचा शोध कुठे घेत आहोत? एक तर जड (अचेतन) वस्तूंच्या संपादनाद्वारे, दुसरे विविध-व्यक्ती-संबंधातून, तिसरे यश, पद, प्रतिष्ठेद्वारे. हीच आमची जीवनशैली.

एका उदाहरणाने या जीवनशैलीची निरर्थकता दिसून येईल. कवितेत एक अर्थ भरलेला आहे. या कवितेतून कांही ओळी वेगळ्या केल्या तर त्या तेवढा अर्थ देऊ शकणार नाहीत. ओळीतून शब्द, शब्दातून अक्षर वेगळे केले तर ते शब्द, ते अक्षरही अर्थ देणार नाहीत. याचा अर्थ हाच की, अक्षर, शब्द, ओळी हे आपल्यापेक्षा मोठ्याच्या संदर्भानेच अर्थ देतात तसेच मानवजीवनाचे आहे. आम्ही आमच्यापेक्षा ज्ञान, सामर्थ्याच्या दृष्टीने अल्प अशा जडवस्तूंच्या संपादनाद्वारे अर्थ शोधतो. संदर्भ मोठा पाहीजे. अल्प नव्हे. तसेच विविध व्यक्ती आणि आम्ही,सुखाची आकांक्षा एक सारखीच बाळगतो. चैतन्याचे हे स्तर सुद्धा एकसारखेच आहे. संदर्भ मोठा पाहीजे, समान नव्हे. म्हणून जोपर्यंत आमच्या जीवनशैलीत अल्प आणि समानाच्या आधारे अर्थवत्ता शोधण्याची दृष्टी संपुष्टात येणार नाही तोवर आम्ही खरे आस्तिकता बनू शकणार नाही, जीवनवादीही बनू शकणार नाही.म्हणून जडचेतनापेक्षा वेगळा तिसरा पूर्णचेतनरूप जो परमेश्वर आहे त्याचा संदर्भ शोधणे जीवनाच्या अर्थवत्तेसाठी आवश्यक आहे.पण याचा अर्थ असा नाही की, परमेश्वराचा शोध मनाद्वारे किंवा बुद्धीद्वारे घ्यावयाचा आहे. मागील अध्यायांमध्ये जे ईश्वरविवेचन केले आहे ते समजून घेऊन अर्ध्या-एक तासासाठी तरी मनाच्या सर्व क्रियाकलांपासून मुक्त होण्यासाठी प्रयत्न करावा. एकदा मनाचा व्यवहार जागरुकपणे थांबवला गेला म्हणजे आम्ही 'जीवरुपात' स्थित होतो आणि जीवामध्ये जो 'अंतर्यामी' रूपाने ईश्वर व्याप्त आहे, त्याचाही अनुभव येऊ लागतो. म्हणून आजकाल मंत्रोच्चारण जप वगैरे बाबीवर जो अत्यधिक भर दिला जातो तो पूर्णतः चुकीचा आहे. कारण व्यवहारात एखाद्या वस्तूचे शब्दज्ञान झाले म्हणजे त्या शब्दाची पुनरावृत्ती करीत बसत नाही. ती वस्तू कुठे आणि कशी मिळते हे जाणून घेऊन त्या वस्तूच्या साक्षात अनुभव घेतो. म्हणजे शब्दातून निःशब्दात जातो. तसेच ईश्वरानुभवाबाबतीतही समजावे, शास्त्रपठन आणि उपकाराचे चिंतन, विविध प्रकारचा जाप या सर्व प्राथमिक बाबी आहेत. त्या सहायक ठरत असल्या तरी त्यातच 'ईश्वरानुभव' आहे असे न समजता, सर्व प्रकारच्या शब्दातून, वृत्तीतून मुक्त होणे, अंतःकरणातून वर उठणे ईश्वरानुभवासाठी आवश्यक आहे.

आत्म-परमात्म-अनुभवाकडे वाटचाल करणारी व्यक्ती सर्व प्रकारच्या द्वंद्वातून मुक्त होऊन एक सहज, शांत, आनंदपूर्ण जीवन जगते. आपल्या सर्व प्रकारच्या कर्तव्यांची पूर्तताही सहजपणे तिच्याकडून होते. म्हणून भौतिक समृद्धीबरोबर आत्म-परमात्म अनुभवाची आंतरिक समृद्धी असणे आवश्यक आहे. तेव्हाच आस्तिकतेची परिपूर्णता साधली जाते.

❑❑❑

तावडीतून सुटकाही होते. वेदांनी, श्रीकृष्णांनी, साधुसंतांनी निष्काम कर्माचा उपदेश केला आहे. पण जोवर आंतरिक सुखाचा अनुभव येत नाही तोवर कितीही शास्त्रपठन आणि संयम साधला तरी आशे-निराशेच्या द्वंद्वातून मुक्ती साधली जाऊ शकत नाही.

जीवन सार्थक व्हावे म्हणून आम्ही निरंतर धडपडतो. पण सार्थकतेचा शोध कुठे घेत आहोत? एक तर जड (अचेतन) वस्तूंच्या संपादनाद्वारे, दुसरे विविध-व्यक्ती-संबंधातून, तिसरे यश, पद, प्रतिष्ठेद्वारे. हीच आमची जीवनशैली.

एका उदाहरणाने या जीवनशैलीची निरर्थकता दिसून येईल. कवितेत एक अर्थ भरलेला आहे. या कवितेतून कांही ओळी वेगळया केल्या तर त्या तेवढा अर्थ देऊ शकणार नाहीत. ओळीतून शब्द, शब्दातून अक्षर वेगळे केले तर ते शब्द, ते अक्षरही अर्थ देणार नाहीत. याचा अर्थ हाच की, अक्षर, शब्द, ओळी हे आपल्यापेक्षा मोठ्याच्या संदर्भानेच अर्थ देतात तसेच मानवजीवनाचे आहे. आम्ही आमच्यापेक्षा ज्ञान, सामर्थ्याच्या दृष्टीने अल्प अशा जडवस्तूंच्या संपादनाद्वारे अर्थ शोधतो. संदर्भ मोठा पाहीजे. अल्प नव्हे. तसेच विविध व्यक्ती आणि आम्ही,सुखाची आकांक्षा एक सारखीच बाळगतो. चैतन्याचे हे स्तर सुद्धा एकसारखेच आहे. संदर्भ मोठा पाहीजे, समान नव्हे. म्हणून जोपर्यंत आमच्या जीवनशैलीत अल्प आणि समानाच्या आधारे अर्थवत्ता शोधण्याची दृष्टी संपुष्टात येणार नाही तोवर आम्ही खरे आस्तिकता बनू शकणार नाही, जीवनवादीही बनू शकणार नाही.म्हणून जडचेतनापेक्षा वेगळा तिसरा पूर्णचेतनरूप जो परमेश्वर आहे त्याचा संदर्भ शोधणे जीवनाच्या अर्थवत्तेसाठी आवश्यक आहे.पण याचा अर्थ असा नाही की, परमेश्वराचा शोध मनाद्वारे किंवा बुद्धीद्वारे घ्यावयाचा आहे. मागील अध्यायांमध्ये जे ईश्वरविवेचन केले आहे ते समजून घेऊन अर्ध्या-एक तासासाठी तरी मनाच्या सर्व क्रियाकलांपासून मुक्त होण्यासाठी प्रयत्न करावा. एकदा मनाचा व्यवहार जागरुकपणे थांबवला गेला म्हणजे आम्ही 'जीवरुपात' स्थित होतो आणि जीवामध्ये जो 'अंतर्यामी' रूपाने ईश्वर व्याप्त आहे, त्याचाही अनुभव येऊ लागतो. म्हणून आजकाल मंत्रोच्चारण जप वगैरे बाबीवर जो अत्यधिक भर दिला जातो तो पूर्णतः चुकीचा आहे. कारण व्यवहारात एखाद्या वस्तूचे शब्दज्ञान झाले म्हणजे त्या शब्दाची पुनरावृत्ती करीत बसत नाही. ती वस्तू कुठे आणि कशी मिळते हे जाणून घेऊन त्या वस्तूच्या साक्षात अनुभव घेतो. म्हणजे शब्दातून निःशब्दात जातो. तसेच ईश्वरानुभवाबाबतीतही समजावे, शास्त्रपठन आणि उपकाराचे चिंतन, विविध प्रकारचा जाप या सर्व प्राथमिक बाबी आहेत. त्या सहायक ठरत असल्या तरी त्यातच 'ईश्वरानुभव' आहे असे न समजता, सर्व प्रकारच्या शब्दातून, वृत्तीतून मुक्त होणे, अंतःकरणातून वर उठणे ईश्वरानुभवासाठी आवश्यक आहे.

आत्म-परमात्म-अनुभवाकडे वाटचाल करणारी व्यक्ती सर्व प्रकारच्या द्वंद्वातून मुक्त होऊन एक सहज, शांत, आनंदपूर्ण जीवन जगते. आपल्या सर्व प्रकारच्या कर्तव्यांची पूर्तताही सहजपणे तिच्याकडून होते. म्हणून भौतिक समृद्धीबरोबर आत्म-परमात्म अनुभवाची आंतरिक समृद्धी असणे आवश्यक आहे. तेव्हाच आस्तिकतेची परिपूर्णता साधली जाते.

❑❑❑



**पं. श्री. गंगाप्रसादजी उपाध्याय**

**जन्म : ६ डिसेंबर १८८१** **मृत्यू : २९ ऑगस्ट १९६८**

प्रयाग विद्यापीठातून एम.ए. (इंग्रजी) १९१२; एम.ए. (तत्त्वज्ञान) १९२३; १९१८-१९३९ डी.ए.वी. हायस्कूलचे मुख्याध्यापक, १९०८ पासून लेखन- प्रारंभ, १९१३ पासून गद्य कथा व निबंध, हिंदी शेक्सपिअरचे लेखन, तत्त्वज्ञानाशी निगडित 'आस्तिकवाद' या पुस्तकामुळे हिंदी साहित्य सम्मेलन प्रयाग तर्फे मंगलप्रसाद पुरस्काराचे मानकरी (१९३१), शतपथ ब्राह्मण व ऐतरेय ब्राह्मणचे हिंदी भाषांतरकार (१९५० - ६७), आर्योदय काव्यम् (१९५०), वैदिक कल्चर, कम्युनिज्म, जीवन - चक्र, अद्वैतवाद, जीवात्मा, फिलोसोफी ऑफ दयानन्द, दर्शिप, रीझन अँड रीलीजन, सुपरिस्टिशन, वारी ताला (उर्दू), शांकर भाष्यालोचन, सायण आणि दयानन्द, राममोहन राय - केशवचन्द्र- दयानंद, शंकर- रामानुज- दयानन्द, सर्वदर्शनसंग्रह, धम्मपद, बुद्धा अँड दयानन्दा, सत्यार्थप्रकाशचे इंग्रजी भाषांतर 'लाईट ऑफ ट्रुथ', मनुस्मृती व मीमांसाशास्त्राचे हिंदी रुपांतर, इस्लाम के दीपक, आर्यसमाज व इस्लाम, १०० पेक्षाही अधिक ट्रॅक्ट (लघुपुस्तिका) इत्यादी अनेक ग्रंथाचे लेखन केले आहे.

इंग्रजी, हिंदी, उर्दू आणि संस्कृत भाषेचे सिद्ध-हस्त-लेखक, उदात्त-वक्ते आणि थोर विचारक, विदेशामध्ये वैदिक धर्म आणि संस्कृतीचे प्रचारक, साहित्य क्षेत्रात अनेक पारितोषिकांचे मानकरी. १९४६-५१ सार्वदशिक आर्यप्रतिनिधी सभा (दिल्ली), १९४१-४४ आर्यप्रतिनिधी सभा उत्तरप्रदेश (लखनौ) अनुक्रमे मंत्री व प्रधान. ब्रह्मदेश, थायलैण्ड, सिंगापूर येथे प्रचार. हिंदी, संस्कृत, उर्दू, फारसी, अरबी, इंग्रजी वर प्रभुत्व. एक शतपैलू व्यक्तिमत्त्व.